# भारतामृत

( श्रीमन् व्यासांचें महाभारत व मोरोपंतांचें आर्याभारत यांची तुलना )

लेखकः---

**गणेश रामकृष्ण हवलदार,** बी. ए., एल्‌एल्. बी.

होमरकृत इलियडचें कविताबद्ध भाषांतर, रावसाहेब विश्वनाथ
नारायण मंडलिक यांचें विस्तृत चरित्र, श्रीगणेश पुराणसार,
निर्जनग्राम ( गोल्डस्मिथकृत डेझर्टेड व्हिलेज या
काव्याचें भाषांतर ) व वृत्तिसंशोधन या
ग्रंथांचे कर्ते यांनीं केलें.



**आवृत्ति पहिली**

श्री

# भारतामृत

## प्रस्तावना

आमच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य ग्रन्थ भागवत व तत्त्वज्ञान व व्यवहारशास्त्र यांची सांगड घालून देणारा मुख्य ग्रन्थ महाभारत. भागवतांतील तत्त्वज्ञानाचा प्रसार महाराष्ट्रामध्यें करण्याचें काम पुराणिक करतात अथवा करीत होते असें म्हटलें तर चालेल. त्यांच्या दुःस्थितीचें वर्णन करणारें एक पद प्रस्तुत लेखकाच्या कानीं चाळीस वर्षांपूर्वी पडलें होतें. त्यांतील एक कडवें जसें आठवत आहे तसें दिलें आहे.

समया बांका। कुणिकडे दडाला पैका ॥ स० ॥
शास्त्रिपुराणिक मारमार फिरती, म्हणती
भागवत ऐका,
नको नको म्हणतां बळेंचि वाचिती, सप्ता
करिती बायका ॥ स० ॥ १ ॥

हें पद जेव्हां लिहिण्यांत आलें असेल, त्या वेळीं पुराणिकांची स्थिति कशीही असो, आतां मात्र पुराणिकांचा ऱ्हास होऊन त्यांचें कार्य थांबत आलें आहे. भारतांतील ज्ञानाचा प्रसार करण्याचें काम जुन्या पिढीच्या मण्डळींत हरिदासांनीं आर्याभारताच्या द्वारें चांगलें केलें व अद्यापिही ते करीत आहेत. पण पुराणिकांप्रमाणें हरिदासांचीही स्थिति दिवसानुदिवस अनुकंपनीय होत चालली आहे. कांहींस वेळ नाहीं म्हणून, कांहींना इच्छा होत नाहीं म्हणून, व कांहींची अभिरुचि बदलली म्हणून हरिदासांचीं कीर्तनें ऐकणें अगर समग्र आर्याभारत वाचणें हल्लींच्या नवीन पिढीच्या मण्डळीस सोईचें नसतें, म्हणून त्यांच्या सोयीचा असा आर्याभारताविषयीं एक लघु ग्रन्थ तयार करण्याचें मनांत येऊन आर्याभारत वाचतांना ज्या आर्या कर्णसुख अशा आढळल्या, ज्यांत नयनरम्य असें शब्दचित्र दिसलें, ज्यांत कांहीं हृदयप्रीति उत्पन्न करणारा अर्थ सांपडला, ज्यांत कांहीं पंतांचें असें वैशिष्ट्य उमगून आलें, त्या घेऊन त्या समजण्यापुरताच संदर्भ देऊन हा भारतामृत ग्रंथ प्रस्तुत लेखकानें तयार केला आहे. तो तयार करतांना आर्याभारताचें वाचन मूळ महाभाराताबरोबर करण्यांत आलें आहे. त्यामुळें सत्यवतीपुत्र व्यासांची व लक्ष्मीपुत्र मयूरपंतांची कोठें बरोबरी झाली, कोठें कोणाची कोणावर सरशी झाली, तें सोदाहरण या ग्रंथांत सांगतां आलें आहे. *

हा ग्रंथ व्यासांचा व पंतांचा एक सामान्य वाचक या नात्यानें लिहिला आहे. त्यांचा अभ्यासक या नात्यानें नव्हे, एवढें सांगितलें म्हणजे कोणीही यांतील दोषांकडे लक्ष देणार नाहीं अशी आशा आहे.

---

* असें उभयकृतींचें वाचन न केलें, तर व्यासांच्या कल्पना पंतांच्या नांवावर-क्वचित् प्रसंगीं कां होईना-विकल्या जाण्याचा संभव आहे. ( उदाहरणार्थ पहा कर्णपर्व अध्याय ११ आर्या २२ व तीवरील काव्यसंग्रहकारांची टीका ).

तूणीर, चाप, तद्गुण, भुज, कर, उर, वदन, लोचन, घ्राण! । कर्ण, शिर, अंग, लोमें, कवच रथ, ध्वजाहि वर्षती बाण! ॥

नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

ज्या नर व नारायण मुनींच्या रूपानें परमेश्वरानें पहिला अवतार धारण केला, त्या मुनींना नमस्कार करून व्यासांनीं जय नांवाच्या महाभारतेतिहासाचा जसा आरंभ केला, तसा न करतां " श्रीपाण्डव सहायो भगवानरविन्दाक्षो जयति " या अठरा अक्षरांच्या मंत्रानें मोरोपंतांनीं आपल्या आर्याभारताचा आरंभ केला. आर्याभारताच्या प्रत्येक पर्वाचीं पहिलीं अक्षरें एकापुढें एक मांडिलीं असतां वरील मंत्र सिद्ध होतो. याचा इंगितार्थ असा होतो कीं, श्रीकृष्णानें सर्व महाभारत व्याप्त आहे. सर्वत्र त्याच्याच कृतीचा जय झाला आहे. महाभारताचा नायक कोण, या प्रश्नाचें उत्तर कित्येकांच्या मतें अर्जुन, कित्येकांच्या मतें भीष्म असें आहे; पण पंतांच्या मतें श्रीकृष्ण आहे असें वरील मंत्रावरून अनुमान काढण्यास जागा आहे.

नंतर " ॐ नमः सर्व विघ्नविनायकेभ्यः " इतक्याच शब्दांत व्यासांनीं गणपतीचें नमन केलें आहे. त्याकरितां पंतांनीं एक आर्या रचली आहे.

नमिला गजमुख, ज्याचे सेवुनियां मृदु मधुर बोल कानांहीं ॥
चुम्बुनि शंभु म्हणे बा ! तुजसम आम्नाय बोलका नाहीं ॥ ( आदि. अ. १ ) ॥३॥

शेवटीं हा भवसागर तरून जाण्याच्या हेतूनें ज्या पाण्डवांचें चरित्र पंतांनीं गावयाचें मनांत आणलें, त्यांस त्यांनीं वंदन करून कथेला आरंभ केला आहे.

गरुड अमृत हरण करण्यास येत आहे असें कळतांच इंद्र देवांना म्हणाला " सुरांतील वीर हो ! अमृताचें रक्षण करा. " याचा विस्तार पंतांनीं एक आर्या घालून केला आहे.

हें ऐकुनि इन्द्र म्हणे " सुर हो ! पक्षी हरो न सोमातें ! ॥
रक्षा; खग-कृत-परिभव-नूत्न- मषीलेप हा नसो मातें " ॥ १३८ ॥ ( आदि० अ. ४ )

गरुडाच्या हातून होणाऱ्या पराभवाची नवीनच मस माझ्या तोंडाला लागण्याचा प्रसंग माझ्यावर न यावा असा भरदार अर्थ पंतांनीं या आर्येत आणिला आहे. शिवाय तींत लांब पण सरळ अर्थाचा समास व साधें यमक हीं साधलीं आहेत. " तोंडाला काळें

---

आचार्यपुत्र अश्वत्थाम्यानें अर्जुनावर जें शरसंधान केलें, त्याचें वर्णन ही आर्या करीत आहे. तीसंबंधें काव्यसंग्रहकार म्हणतात, "वर वर्णिलेला प्रत्येक पदार्थ म्हणजे द्रौणीच्या शरीराचा प्रत्येक भाग जणों काय बाणांचा वर्षाव करीत होता. बाणांचा होत असलेला संतत वर्षाव व त्यांचा अतिशय वेग इ० या उत्प्रेक्षेनें सुरेख वर्णिलीं आहेत. बाणविमोचनशीघ्रता दर्शविण्याकरितां तुणीरांतून बाण निघत नाहीं तर ज्याच बाणांस प्रसविते कीं काय अशी उत्प्रेक्षा पुष्कळ कवींच्या वर्णनांत आढळते. या उत्प्रेक्षेसही मागें हटविणारी पंतांची वरील उत्प्रेक्षा आहे. हींत बाण फारच शीघ्र निघत आहेत एवढेंच नव्हे, तर सर्व दिशांकडे पसरत आहेत असें दर्शविलें आहे." महाभारताच्या कर्ण पर्वातील सोळाव्या अध्यायांत या आर्येचे मूळ श्लोक सांपडतात ते असेः—

ततः शरसहस्राणि प्रयुतान्यर्बुदानिच । संसृजे द्रौणिरायस्तः संस्तंभ्यच रणेऽर्जुनम् । ३३
इषुधेर्धनुषश्चैव ज्यायाश्चैवाथ मारिष । बाह्वोः कराभ्यामुरसो वदनघ्राणनेत्रतः ॥ ३४
कर्णाभ्यां शिरसोङ्गेभ्यो लोमवर्मभ्य एवच । रथध्वजेभ्यश्च शरा निष्पेतुर्ब्रह्मवादिनः ॥ ३५ ॥

हे वाचल्यावर असें दिसून येईल कीं, आचार्यपुत्रांच्या शरसंधानवर्णनकौशल्याचा भाग पंतांकडे उत्कृ भाषांतरापुरताच येतो; उत्प्रेक्षेपुरता येत नाहीं. असलीं उदाहरणें आणखी हवीं असल्यास पाहा (१) काव्यसंग्रह कर्णपर्व अ. ११, आर्या ४३ व तीवरील टीका व महाभारत कर्णपर्व, अ. १७ श्लोक १—२; (२) काव्यसंग्रह कर्णपर्व अ. १३, आर्या २८ व तीवरील टीका व महाभारत कर्णपर्व अ २०, श्लोक ४८. येथें अश्वत्थामा व अर्जुन हे युद्ध करीत असतां त्यांस विमार्गगामी लोकत्रासकर ग्रहांची उपमा पंतांनीं दिली आहे, तशीच पाण्ड्य राजाच्या धरणीवर पडलेल्या शिराला विशाखा मध्यगत पूर्ण शशीची उपमा दिली आहे. त्यावरून काव्यसंग्रहकार पंतांना ज्योतिःशास्त्राची माहिती होती असें अनुमान काढतात. पण तें चुकीचें आहे. कारण त्यांच्या पंतांच्या आर्यांत व्यासांच्या श्लोकांचें नुसतें भाषांतर आहे. असो. मूळ महाभारतांतील श्लोक चित्रशाळेंतील प्रतीवरून घेतले आहेत व आर्या काव्यसंग्रह ग्रंथमालेंतून घेतल्या आहेत.

लागणें" या लोकांतील उक्तीचा अनुवाद येथें असल्यामुळें लोकोक्तिनामक अलंकार साधला आहे.

"तुम्हीं जनमेजयकृत सत्रांत जळाल" असा शाप कद्रूनें ( सर्पाच्या मातेनें ) त्यांना दिला, त्याच्या निवारणार्थ सर्प विचार करीत बसले, त्याचें वर्णन करतांना पंतांनीं मुळांत नसलेली सुंदर उपमा योजिली आहे.

वासुकिहि करि चिंता; न सुचे कांहींच शाप-
परिहार।
झाला म्लान, फिरविला पुष्पांचा जेविं अग्निवरि
हार ॥१२॥
( आदि० अ. ५ )

सर्पाची आकृति हारासारखी असते. शंकरानेंही सर्प हारांप्रमाणेंच गळ्यांत बाळगिले आहेत. हाराप्रमाणेंच सर्पाचें शरीर नाजुक असतें. जशी हाराला, तशी सर्पाला अग्नीची उष्णता सोसणार नाहीं. तेव्हां आपण पुढें जळणार या नुसत्या विचाराची धग लागून अग्नीवर फिरवलेल्या हाराप्रमाणें वासुकी म्लान झाला या म्हणण्यांत औचित्य पुष्कळ आहे.

जरत्कारूला प्रसन्न ठेवण्यांत नागकन्येनें योजलेले उपाय श्वेतकाकीय होते इतकेंच म्हणून तिचा दक्षपणा व्यासांनीं नुसता सूचित केला आहे; पण पंतांनीं त्याचें वर्णन फार मार्मिकतेनें केलें आहे. पंत म्हणतातः ती साध्वी

भयचकितता मृगाची, शुनकाची जागरूकता
शिकली।
ती इंगितज्ञताही काकाची, म्हणुनि सेवनीं
टिकली ॥ ९६ ॥

एवढा दक्षपणा ठेवून निमित्तावर टपलेले पतिराज रुसावयाचे ते रुसलेच. एकदां स्त्रीच्या मांडीवर शिर ठेवून जरत्कारू गाढ निजला असतां रवि अस्तास जावयास निघाला. पतीचा कोप पुरवेल पण आवश्यक क्रियालोप पुरवणार नाहीं, या समजुतीनें त्या साध्वीनें त्यास उठविलें.त्याबरोबर पतिराज खवळले व ओंठ फुरफुरवून म्हणाले "हे भुजंगमे ! तूं माझा अपमान केलास; मी आतां जातों." या कोपवचनाचें वर्णन पंतांनीं जें विस्तृतपणें केलें आहे, त्यांत दाटून दोष देणारें, दयेचा ओलावा नसणारें, साध्वी पत्नीच्या हृदयाला घरें पाडणारें, लहरी पतिराजाचें अनेक प्रकारचें बोलणें कसें असतें तें आपल्या कल्पनेनें किंवा मनुष्यस्वभावाच्या निरीक्षणानें पंतांनीं दाखविलें आहे.

कां गे ! भुजंगमे ! त्वां मजला निद्राभरांत
जागविलें ? ।
काय करशील ? अंकीं शिर ठेवुनि, तुज
उदण्ड भागविलें ! ॥ १०१ ॥
जातों; न साहवे मज ऐसा अवमान, पळहि,
हा कांहीं ।
गृहसुख पुरे; कळविलें; शूळचि उठले शिरांत
हांकांहीं ॥ १०२ ॥

यानंतर धैर्याचें अवलंबन करून, निश्चयानें

नमुनि जरत्कारि म्हणे "नसतां अपराध
टाकितां दासी ।
द्विजराज तुम्हीं, या अपवादें कें द्याल हर्ष
चांदासीं ॥ १०७ ॥

या आर्येंतील दुसरा चरण मुळांत नाहीं. यांत शालीनता किती आहे तें रसिकांस सांगावयास नको. आपल्या पतीला, त्याचें करणें किती अन्यायाचें आहे तें मोठया शालीनतेनें अगदी मऊ मऊ शब्दात जरत्कारीनें नुसतें ध्वनित केलें आहे. द्विजराज म्हणजे ( १ ) ब्राह्मण व ( २ ) चंद्र. जरत्कारी म्हणते "अहो द्विजराज, तुम्ही चंद्र अहांत व निष्कलंक अहांत; चंद्र मात्र सकलंक आहे, म्हणून तो आजपर्यंत मनांत खिन्न होऊन राहिला होता. परंतु या अन्यायाच्या वर्तनानें 'हा पहा तुझ्या जोडीला मीही आहे ! तूं एकटाच कलंकित नाहींस असें चंद्राला दाखवून त्याला हृष्ट होण्याला कारण

देण्याची तुमची तयारी आहे काय ?'' उत्तम काव्याचें लक्षण '' ध्वनि '' आहे. या कसोटीला पंत उतरले आहेत. असें वरील व दुसऱ्या अनेक उदाहरणांवरून सिद्ध आहे. कोणी त्यांस नुसते भाषांतरकार म्हणत असतील, त्यांनीं या पंतांच्या गुणांकडे लक्ष द्यावें.

आपल्या मनासारखें करतां आल्यामुळें पतीनें जरा शान्त होऊन जें उत्तर दिलें आहे, त्याचें पंतकृतवर्णन असें आहे

विप्र म्हणे त्वद्गर्भी आहे गुणमणिकरण्ड,
कवि शिष्ट, ॥
शापव्याकुळ-मातुळ-कुळ-विपदर्णवतरण्डक
विशिष्ट ॥ १०९ ॥

हें वर्णन मुळाला साधारणतः धरून आहे. यांत सहा अक्षरी यमक साधून सहा शब्दांचा लांब पण सरळार्थ समास आहे.

भगिनीच्या पुत्राचें नामकरणवर्णन करणाऱ्या पुढील आर्येत पंतांचें आवडतें यमक दिसून येत आहे.

आस्तीक नाम त्याचें ठेवुनि मानूनि लाभ
लाभाचा, ।
वासुकिनें स्वप्राणाहूनि सदा रक्षिला भला भाचा
॥ ११५ ॥

जनमेजयाच्या सर्पसत्रांत मातुलकुलाचें रक्षण करण्यास आस्तिक तेथें गेला व जनमेजयाची प्रशंसा करतांना म्हणालाः

द्युतिनें नारायण तूं, यद्यपि नाहीं तुझे करीं
चक्र ॥ २५ ॥ (आदि. अ. ७)

या चरणांतील पहिला भाग मुळांत आहे. पण जातां जातां कांहीं तरी अलंकार योजण्याची आपली इच्छा पंतांनीं दुसऱ्या भागांत व्यतिरेक नामक अलंकार घालून सफल केली आहे.

पंतांनीं विस्तारभयास्तव सांगून अथवा न सांगून पुष्कळ ठिकाणीं अध्यायांवर अध्याय गाळले आहेत. उदाहरणार्थः—

वैशंपायनानें जनमेजयाला प्रथम सांगितलेले संक्षिप्त भारतकथा व भारतप्रशंसा हे अध्याय. त्यांतील पुढील श्लोक ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत.

धर्मशास्त्रमिदं पुण्यमर्थशास्त्रमिदं परम् ॥
मोक्षशास्त्रमिदं प्रोक्तं व्यासेनामितबुद्धिना ॥२१॥
(आ. प. अ. ६२)
श्रव्यं श्रुतिसुखं चैव पावनं शील वर्धनम् ॥ ४९ ॥
यदि हास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित्॥५३॥

२१ व ५३ हे श्लोक भारतांतील प्रतिपाद्य विषयांचें महत्त्व व त्यांची व्यापकता दाखवितात. ४९ वा श्लोक गाळण्यानें ''भारत हा ग्रन्थ शील वाढविणारा आहे '' असें त्यांत सांगितलेलें भारतपठणाचें जें खरें मर्म, त्यास पंतांचे वाचक आंचवले. मनुष्याला मुख्यतः शीलच पाहिजे असतें.

संजीवनी विद्या मिळविण्याकरितां कचानें शुक्राचार्यांचें शिष्यत्व पतकरिलें. हें कपट दानवांस कळतांच त्यांनीं कचाचे तुकडे करून ते लांडग्यांस खावयास दिले. संध्याकाळ झाली तरी कच आढळला नाहीं. शुक्रसुता घाबरली.

शुक्रसुता गहिंवरली; न्हाणी तदुरस्थलासि
अश्रु तिचे ।
कवणाला न प्रिय तें गुणमणिमय केलिमंदिर
श्रुतिचें ॥ १६ ॥ (आ. अ. ९)

या आर्येचा दुसरा चरण मुळांत नाहीं. यमक साधण्याकरतां तो घातलेला आहे. त्यांतील कचाला उद्देशून घातलेले शब्द त्याच्या वर्णनाला अनुपम शोभा आणीत आहेत.

राक्षसांनीं कचाला मारावें व कचाशिवाय मी जगणार नाहीं असें देवयानीनें म्हणावें व आचार्यांनीं संजीवनी विद्येच्या प्रभावानें त्याला जीवंत करावें. असा तिसरा प्रसंग आला असतां '' असंशय माझा असुर द्वेष करतात'' एवढेच शब्द व्यासांनीं आचार्यांच्या तोंडीं घातले आहेत. तथापि त्या शब्दांतील अर्थाचा विस्तार पंतांनीं केला आहे तो असा ;

ब्राह्मण कणसे खुपती तुमच्या नेत्रीं
न सोसवे काढा ।
युक्तचि मरणाराला हितपरिणामहि
न सोसवे काढा ॥ ३९ ॥

ही आर्या अमर झाली आहे.

पुढें विद्येनें, तपानें व दमानें विभ्राजमान अशा कचाला तूं माझें पाणिग्रहण कर अशी प्रार्थना देवयानीनें कचाला केली. ती अमान्य करतांना कच म्हणाला, " ज्या उदरांत तुझा वास होता, त्याच उदरांत माझा वास होता; तुझें-माझें भाऊबहिणीचें नातें आहे. तुझें पाणिग्रहण करणें अधर्म आहे." हें वाक्य ऐकून यानें प्रेमाचा भंग केला; आग्रहानें याला ताताकडून सजीव करून घेण्यानें दाखविलेलें सौहार्द हा कृतघ्न स्मरत नाहीं; याच्यावर केलेलें प्रेम फुकट गेलें असें वाटून देवयानीला क्रोध आला व कचाची तिनें निर्भर्त्सना केली. तीविषयीं पंतांनीं एक आर्या रचिली आहे तींतील अर्थ स्वतंत्र आहे.

मलिन, कुटिल, नीरस, जड,
अजड पुनर्भवपणेंहि कच साच ।
धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण
त्यजसी, नाम कच साच ॥ ६३ ॥

कच शब्दांत व त्याला लावलेल्या विशेषणात्मक शब्दांतही जो श्लेष आहे,त्याच्यावर जोर देऊन रचलेल्या या आर्येत देवयानीच्या क्रोधाचा आवेश पंतांनीं उत्तम प्रकारें भरला आहे. ही आर्या अमर झाली आहे.

असुरसुता शर्मिष्ठा व देवयानी या दोघी जलाशयावर स्नानाला गेल्या होत्या. परत आल्यावर चुकून शर्मिष्ठा देवयानीचें वस्त्र नेसली, शर्मिष्ठेनें आपली पायरी सोडली म्हणून देवयानी तिला टाकून बोलली; तिला म्हणून जें उत्तर शर्मिष्ठेच्या मुखीं पंतांनीं घातलें आहे, तें मुळांत नाहीं. शर्मिष्ठा म्हणते

राजसुतेचें यश जें, तुज येइल काय गे दरिद्रे तें ।
पाहसि विकावया तूं केसरमूल्यें कसें हरिद्रेतें ?
॥१८॥

ही आर्या निदर्शना अलंकाराचें सर्वमान्य उदाहरण आहे,

शर्मिष्ठेनें केलेलें भांडण देवयानीनें शुक्राचार्यांना सांगितलें, तेव्हां तिची समजूत करतांना आचार्य म्हणाले,

अज्ञ मुलें कलह करिती न वदावें
तेंचि बोलती स्वैर ।
तें चित्तांत धरुनियां प्राज्ञें पुरुषें
करूं नये वैर ॥ १२ ॥
( आ. अ. १० )

ही पंतांची आर्या अमर झाली आहे. ही मुळाशीं ताडून पाहातां सरसच आहे. मूळ श्लोक असा आहे

यत्कुमाराः कुमार्यश्च वैरं कुर्युरचेतसः ।
नतत्प्राज्ञोनुकुर्वीत न विदुस्ते बलाबलम् ॥७ ॥
( आ. अ. ७९ )

शर्मिष्ठेला यौवन प्राप्त झालें असतां मातृपदालाभाची जी तिला आंतून लालसा झाली,तिचें पंतांनीं केलेलें वर्णन फार सरस आहे.

शिशु पाळण्यांत घालुनि, हालवितां,
निजवितां सुखें जो जो ।
धात्री म्हणति सखीला अमृतरसचि तो
निघे मुखें जोजो ॥ ३ ॥
(आ. अ. ११)

या आर्येत वत्सलता फार भरली आहे.

एक दिवस शर्मिष्ठेचे तीन सुंदर मुलगे "श्रीचे जसे काय संकेतकुंजच" असे पाहून त्यांचें नामाभिधान विचारतांना देवयानी म्हणाली

अंकीं तुम्हांसि घेउनि आलिंगुनि हृष्ट
कोण होतात ? ।
कोणासिं माय म्हणतां ? तुमचा कृत
सुकृत कोण हो तात ? ॥ ३२ ॥

हें पंतांचें स्वतःच्या पदरचें वर्णन आहे.

"तुमचीं मातापितरें कोण ?" असें सरळ न विचारण्याची ही पद्धति कालिदासादि कवींच्या वळणाची असून फार अभिजात आहे. शकुन्तलेच्या सख्यांनीं दुष्यन्ताला "तुम्ही कोण ? कुठील ?" इत्यादि प्रश्न विचारले ते याच धाटणीचे आहेत.

शर्मिष्ठा माझी दासी असून तिच्यावर माझ्या पतीचें ( ययातीचें ) प्रेम अधिक आहे अशी तक्रार देवयानीनें शुक्राचार्याकडे केल्यावरून त्यांनीं ययातीला शाप दिला कीं तुला आतांच जरा ग्रासील. तेव्हां ययाति म्हणालाः–

भूप म्हणे शाप दिला उग्र विपत्पात हेतु,
म्हातारा ।
झालों पहा अहा जी जोडितसें हात हे
तुम्हां तारा ॥ ५५ ॥

या आर्येतील यमक पंतांच्या आवडत्या यमकांपैकीं एक आहे.

पुढें ययातीच्या स्वर्गगमनाचें वर्णन करतांना पंत म्हणतातः

गेला स्वर्गासि अमित सुकृतें जोडोनि
राय; तें नाकीं ।
होय सुदुःसह शक्रा जैसें बाळास
रायतें नाकीं ॥ ७५ ॥

येथें यमक साधण्यास मुळांत नसलेल्या अगदीं साध्या पदार्थाची म्हणजे रायत्याची उपमा पंतांनीं योजिली आहे. हें रायतें, पंत म्हणतात त्याप्रमाणें जसें बाळकाच्या नाकांत जाऊन दुःसह होतें, तसें तें धाकट्या चिपळुणकरांच्याही नाकांत शिरून त्यांस अश्लील म्हणजे ग्राम्य म्हणून दुःसह होऊन बसलें. ( पहा निबंधमाला. मोरोपंतांवरील निबंधाचीं शेवटलीं पानें )

दुष्यन्त राजाच्या मृगयेचें वर्णन पंतांनीं संक्षिप्त केलें आहे, तें असेंः

वधिले व्याघ्र, वृक, खग, श्वापद;
धरिले प्रमत्त गज रानीं ।
चिरिले किरि; लेशाहि धृति मृगयूथीं
नुरविलीच गजरांनीं ॥ ४ ॥
( आ. अ. १२ )

ही आर्या उत्तम स्वभावोक्ति अलंकाराचा मासला आहे.

उग्र तपाच्या सामर्थ्यानें विश्वामित्र आपलें पद हरण करील अशी काळजी इंद्रास पडून त्याचा तपोभंग करण्याकरितां त्यानें मेनकेची योजना केली;तेव्हां इंद्र तिला म्हणालाः

' भ्रूधनु ओढुनि कज्जलविषदग्ध
कटाक्षशर वरारोहे ! ।
सोडुनि लुटीं तपोधन सौभाग्यश्री
तुझी भरारो हे ॥ २० ॥

येथें सांग रूपक साधून पंतांनीं शृंगार रसाचें चांगलें परिपोषण केलें आहे. ही आर्या अमर झाली आहे. मुळांतील श्लोक अगदीं साधा आहे, तो असाः

रूपयौवनमाधुर्यचेष्टितस्मितभाषणैः
लोभयित्वा वरारोहे ! तपसस्तं निवर्तय ॥२६॥
( आ. अ. ७१ )

जेव्हां दुष्यन्त राजा शकुन्तलेला म्हणतो "तूं माझी भार्या हो ! माझें सर्व राज्य तुझें आहे." तेव्हां शकुन्तला म्हणते "पिता माझें दैवत आहे;तो मला ज्यास देईल तो माझा पति होईल." या म्हणण्याला ती शेवटीं न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ( पहा श्लोक ७ अ. ९४, आदिपर्व. महाभारत कुंभकोण प्रत ) या मनुवचनाचा आधार देते.हा प्रकार पंतांनीं निराळ्या प्रकारें वर्णिला आहे.

हांसुनि तीहि म्हणे हो ! प्रार्थावें
प्रणत पारिजातातें ।
देवा स्वयें वहावें या निजकारुण्य-
वारिजातातें ॥ ३९ ॥
मज करवीं न तुम्ही गुरुमर्यादातिपात
करवा हो ।
सत्पात्रीं स्वधनातें चिंतामणि कण्व-
तात कर वाहो ॥ ४० ॥

माझा तात, जे लोक प्रणत असतील त्यांस कल्पवृक्षाप्रमाणें आहे. माझ्या ताताच्या कारुण्यजलांत वाढलेलें कमळ देवावर त्यानें स्वतः वहावें. माझ्याकडून तुम्हीं मर्यादेचा अतिक्रम करवूं नका. येथें

शकुन्तला ही कमळाचें फूल आहे, असें जें रूपक आहे तें ध्वनित असल्यामुळें फार खुलत आहे. व्यासांची शकुन्तला आपली अशरण स्थिति वर्णन करीत आहे, तर पंतांची शकुन्तला मर्यादशीलपणानें आपला आत्मविश्वास दाखवीत आहे.

कण्व मुनींनीं आज्ञा केल्यावरून शिष्य शकुन्तलेला पुत्रासह दुष्यन्ताकडे घेऊन आले त्याचें वर्णन पंतांनीं अलंकारिक भाषेंत केलें आहे, तें असें:

दुष्यन्त सद्मपद्मीं, ते स्त्री श्री, कण्व-
भानुशिष्यकरीं ।
नेली पुत्रसुगन्धासह धर्मनयाम्बुपूर्ण
नगरसरीं ॥ ६१ ॥
( आ. अ. १२ )

या आर्येत सावयव किंवा सांगरूपक चांगलें साधलें आहे.

धर्मनयनगर, दुष्यन्त, सद्म, स्त्री (शकुन्तला) व तिचा पुत्र हीं अनुक्रमें जल, सरोवर, पद्म, श्री व सुगंध आहेत असें म्हटलें आहे. तसेंच शिष्य हे भानु आहेत. त्यांच्या करीं (पक्षीं) किरणांनीं या धर्मनयपुरींतील दुष्यन्त गृहलक्ष्मीचें कमळ फुलून त्याचा सुगन्ध सुटला आहे असें दाखविलें आहे. ही घोसदार आर्या पहिल्या प्रतीच्या आर्योंपैकीं एक आहे.

राजाच्या पुढें पुत्र ठेवून शकुन्तला म्हणाली "हा तुझा पुत्र आहे. त्याला यौवराज्यपद दे." तेव्हां राजा म्हणाला

राजा म्हणे कवण तूं ? कोणाचा पुत्र ?
काय गे ? वदसी ? ।
काच स्मृतिरपि तापसि ! मैवं प्रलपात्र
भूभुजः सदसि ॥ ६३ ॥

पंत हे पण्डित कवि असल्यामुळें कधीं कधीं आपल्या कवनांत त्यांनीं संस्कृत वाक्यें गुंफून ठेविलीं आहेत.

दुष्यन्ताच्या बोलण्याची शकुन्तलेवर छाप बसण्याकरितां अशीं मिश्र वाक्यें त्याच्या तोंडांत पंतांनीं घातलीं असावीं. मग शकुंतला म्हणाली:

क्षितिपति ! मत्सुतचि असो ! तेजाचा
मूर्तिमंत हा निकर[1] ।
हा निकर मांडिला तूं देशील कर
स्वकीर्ति हानिकर[3] ॥ ७८ ॥

येथें पंतांनीं दाम यमक म्हणजे दोन चरण जोडणारें यमक योजिलें आहे. तें तिच्या वाक्योच्चारास जोर आणीत आहे.

हा दुष्यन्त-शकुन्तला संवाद फारच कडाक्याचा झाला. त्याचें रूप संक्षिप्त करतांना मूळ महाभारतांतील कांहीं चांगल्या श्लोकांचा पंतांनीं आदर केला नाहीं. ते येथें दिले आहेत:

राजन् सर्षपमात्राणि परच्छिद्राणि पश्यसि ।
आत्मनो बिल्वमात्राणि पश्यन्नपि न पश्यसि
॥ ८२ ॥ (आ. अ. ७४)

भावार्थ:- हे राजा ! दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ तुला दिसत आहे, पण आपल्या डोळ्यांतील मुसळ दिसत नाहीं.

विरूपो यावदादर्शे नात्मनो वीक्षते मुखम् ।
मन्यते तावदात्मानमन्येभ्यो रूपवत्तरम् ॥८७॥
यदा स्वरूपमादर्शे विकृतं सोऽभिवीक्षते ।
तदान्तरं विजानीते आत्मानं चेतरं जनम् ॥८८॥

भावार्थ:-आपलें मुख जोंपर्यंत कुरूप मनुष्य आरशांत बघत नाहीं, तोंपर्यंत तो दुसऱ्यापेक्षां आपणाला अधिक रूपवान समजतो; पण जेव्हां तो आपलें कुरूप आरशांत पाहातो, तेव्हां त्याला अन्तर कळतें आपण कसा व दुसरा कसा !

गंगा आपल्या आठव्या मुलाचें वर्णन करतांना शन्तनूला म्हणाली:

हा शिष्य वसिष्ठार्शी, भृगुरामार्शीहि सम;
न वेदांत ।
शास्त्रांत उणा, आधीं या आले वेद
मग नवे दांत ॥ ६७ ॥
( आ. अ. १३ )

दुसऱ्या ओळींत अतिशयोक्ति अलंकार स्पष्ट आहे. तो मूळांत नाहीं.

---

१. पुंज. २. करर. ३. सरकार देणें.

" हा तुझा मुलगा तुला देत आहे तो घरास घेऊन जा " असें म्हणून गंगा अंतर्धान पावली. असें मुळांत आहे. त्याचा विस्तार पंतांनीं एका आर्येत केला आहे तो असाः

देऊनि सुतरत्न करीं घेउनि पतिचित्तवित्त,
ती गेली ।
नेत्रोदकें तिघांच्या गंगा गंगातटीं
नवी केली ॥ ७० ॥

या आर्येच्या पहिल्या चरणांत् परिवृत्ति व दुसऱ्या चरणांत अतिशयोक्ति हे अलंकार योजून वर्णनाला पंतांनीं सौन्दर्य आणलें आहे.

सत्यवतीचें अद्भुत रूप पाहून शन्तनु राजा " तूं कोण आहेस ?" असें तिला विचारतो. ती म्हणते, मी दाशपतीची कन्या असून पित्याच्या आज्ञेवरून या तरीवर काम करीत असतें. तें ऐकून राजा म्हणतोः

चित्तीं म्हणे नृप अहा ! चवरीची
झाडणीच कीं केली ।
मोळविक्यानें काष्ठां फोडाया असिलता
वनीं नेली ॥ ७८ ॥

येथें विषम अलंकार साधला आहे, तो मुळांत नाहीं.

आपल्या गृहीं दुभतें नाहीं म्हणून गाय मागून आणण्याकरितां द्रोण द्रुपदराजाकडे गेला व तूं माझा बाळपणाचा सखा आहेस असें म्हणाला. त्याबरोबर द्रुपदानें त्याची निर्भर्त्सना केली व सख्य कोणाकोणाचें होऊं शकतें त्यावर मोठें व्याख्यान दिलें.

पार्षत म्हणे दरिद्रा ! तूं राजाचा सखा
कसा मुग्धा ॥
मित्र सधन सधनाचें साजे ! गोदुग्ध
मित्र गोदुग्धा ! ॥ २ ॥
न करुनि विचार वदतां पडतें शोकांत
मानस, ख्यातें ।
विद्वत्त्वें, सधनत्त्वें तुल्यें लोकांत मान
सख्यातें ॥ ३ ॥
झालें जीर्ण विसर जें, कोण तया
मंदनायका ! पुसतो ।
मतरंग सुगंध जुना पावे सन्मान
काय कापुस तो ॥ ४ ॥
श्रोत्रियसख अश्रोत्रिय, शूरसख क्लीब
सुकविसख अकवि ।
आम्हा नसे असें श्रुत; हंस सख न
मानसस्थ ही बक वि ! ॥ ५ ॥
आ. अ. २३

हें भाषण मुळाप्रमाणें बहुतेकांशीं आहे. चवथ्या आर्येत पंतांचें आवडतें यमक आहे. जीर्ण झालेल्या स्नेहाला जीर्ण म्हणून विटलेल्या रंगाच्या कापसाशीं पंतांनीं फार खुबीनें तोलिलें आहे.

आपली पूजा करून हात जोडून उभा राहिलेल्या आपल्या एकलव्य नामक शिष्याजवळ द्रोणांनीं वेतन मागितलें—

द्रोण म्हणें तूं माझा जरि शिष्य दिजे
मदीय वेतन हो ।
केवळ विफलचि दावुनि नम्रत्व-ऋजुत्व
वेत न हो ॥ ४३ ॥
(आ. अ. २४)

यदिशिष्योसि मे वीर वेतनं दीयतां
मम ॥ ५४ ॥
(आ. अ. १३२)

या मुळांतील वेतन शब्दावरून यमक साधण्याकरितां दुसऱ्याचरणांत पंतांनीं सुंदर दाखला दिला आहे. वेत जसा नम्र व सरळ असतो, पण फलप्रद नसतो. तसा तूं वर्तनानें सरळ व नम्र असून विफल होऊं नकोस.

एकदा कौरवपाण्डवांची अस्त्रशिक्षणांत रंगणात परीक्षा चालली असतां कर्ण अनाहूत येऊन म्हणाला. " मला अर्जुनासी द्वंद्वयुद्ध करावयाचें आहे." तेव्हां

जिष्णु म्हणे न बहातां जाताति
महाजनांत दाटूनी ।
बोलतिहि न बोलवीतां ते घडिले
मूर्ख कोटि वांटूनी ॥ ३३ ॥
आ. अ. २५

यांतील अर्थ उघड आहे; पण तेथें अनौचित्याचें माप म्हणून पंतांनीं मुर्खाला हाताशीं धरलें आहे.

पुढें असलेंच एक उदाहरण आहे. दुर्योधन म्हणतो, जसें नदीचें तसें शूराचें कूळ पाहत बसूं नये. कार्तिक-स्वामीचा जन्म सहा मातांपासून झाला, म्हणून त्याचा प्रताप फुकट गेला असें कोण म्हणेल ?

मंद प्रताप त्यांचा समजे तो मूर्खताल्ता-कंद ।६४।

आणखी असलेंच उदाहरण देण्यासारखें आहे. कुशल प्रश्नरूपानें नारदानें धर्माला राजनीति शिकविली आहे. या विषयींच्या प्रत्येक श्लोकाचा आरंभ कच्चित् (कीं काय) या शब्दानें झाला आहे, म्हणून या राजनीतीला कच्चित् प्रश्न म्हणतात. या श्लोकांतील एक चरण मूर्खांना हाताशीं धरणारा आहे तो असा

कच्चित् सहस्त्रैर्मूर्खाणामेकं क्रीणासि
पण्डितम् ।

( सभा. अ. ५ श्लो. ३५ )

रामदासांनीं मूर्खांचे वर्ग लावण्यांत अनेक ओव्या खर्ची घातल्या आहेत. ग्रीक कवि होमर यानेंही मूर्खांचें सुन्दर लक्षण देऊन त्यास हाताशीं धरलें आहे

तो एक मूर्ख समजा उमजे जो सगळ
अर्थ मागून ॥ १५ ॥

( इलियड सर्ग १७ भाषांतर स्वकृत )

यावरून असें दिसतें कीं, मूर्ख लोक देवांना प्रिय असतात तसे ते कवींनाही असतात.

याच मुद्याचा विचार करतांना दुर्योधन कर्णाला म्हणतो,

कथमादित्यसदृशं मृगी व्याघ्रं
जनिष्यति ॥ १६ ॥

( आ. अ. १३७ )

या एका चरणाचा विस्तार पंतांनीं याच सुरांत चार चरणांत केला आहे तो असा

प्राकृत योषा याची जननी,
हें तो नव्हेच युक्तीत ।
पिकतें मौक्तिक मुक्ताशुक्तींतच्चि तें
न अन्य शुक्तींत ॥ ६९ ॥

प्रसवे व्याघ्रास मृगी काय उकिरड्यांतही
हिरा पिकतो ? ।
जरि वाढिला कुळींही काकाच्या
काक काय रे पिक तो ? ॥ ७० ॥

( आ. अ. २५ )

अर्जुनानें द्रुपद राजाच्या सैन्याचा नाश केला. त्याचें वर्णन करतांना पंत म्हणतात:

वेदान्तीसा अर्जुन, रिपुभट
गौतमनयज्ञसे, नाशा ।
तद्बळ पावे ...... ॥ १८ ॥

( आ. अ. २६ )

गौतम मुनींनीं न्यायशास्त्र केलें. त्या शास्त्रांत प्रवीण असलेले लोक ज्याप्रमाणें वेदांतशास्त्रांत प्रवीण असलेल्या लोकांपुढें टिकत नाहींत, पराभूत होतात, तसे द्रुपदाचे वीर अर्जुनापुढें पराभूत झाले. पंत पण्डित कवि, तेव्हां पंडिताच्या भाषणाला उचित अशा उपमा त्यांच्या काव्यांत आढळतात.

"पाण्डवांचा मला हेवा वाटतो. माझ्या मुलाचा उत्कर्ष जिनें होईल ती युक्ति सांगा," असें धृतराष्ट्रानें कणिकाला विनविलें. त्यानें शत्रूचा मुळांत उच्छेद कपटानें करावा अशी नीति सांगितली. तीविषयीं पंतांनीं असें म्हणून ठेवलें आहे:

तत्कथित जम्बुक-कथा मात्र कथिन
कौतुकें, न मी अणिक ॥ ६ ॥

( आ. अ. २७ )

याप्रमाणें जम्बुककथा तेवढी त्यांनीं सांगितली. परंतु ती नीति कशी असावी याविषयींची वाचकांची जिज्ञासा अतृप्त राहते एवढेंच नव्हे, पण नुसती जम्बुककथा वाचून ती वाढते म्हणून येथें त्या नीतींतील कांहीं मुळांतले श्लोक दिले आहेत

अमित्रो न विमोक्तव्यः कृपणं बह्वपि ब्रुवन् ।
कृपा न तस्मिन् कर्तव्या हन्येदेवापकारिणम् ॥२३॥
प्रहरिष्यन् प्रियं ब्रूयात् प्रहरन्नपि भारत ।
प्रहृत्यापि प्रियं ब्रूयात् शोचन्निव रुदन्निव ॥५६॥

आशां कालवतीं कुर्यात् कालं विघ्नेन योजयेत् ।
विघ्नं निमित्ततो ब्रूयात् निमित्तं वापि हेतुतः ८८
(आ. अ. १४०)

भीमावर लुब्ध असलेल्या हिडिंबेचा स्वीकार भीमानें धर्माज्ञेनें केल्यावर तिनें कृतज्ञतापूर्वक आण वाहिली आहे.

खचरी म्हणें चुकेना गुरुभजनीं
देह हा निभावोजी ।
वचनातिक्रम करतां क्षिप्र घडो
देहहानि भावोजी ॥ ६२ ॥
(आ. अ. २९)

यांत सात अक्षरी यमक सहज गतीनें आर्येत साधलें आहे, व तसेंच क्षणार्धापूर्वी तिचें धर्माशीं जडलेलें भावोजीचें नातें तितक्याच सहज गतीनें तिच्या तोंडीं पंतांनीं आणलें आहे. त्यामुळें ही आर्या फार खुलत आहे.

बकासुर आख्यानांत कुन्तीसह पाण्डव प्रवासांत असतां ज्या गरीब ब्राह्मणाच्या पडवींत आश्रयाला होते, त्याच्या माणसांचें रडणें कुंतीनें ऐकलें. तेव्हां आम्हाला आश्रय देणाऱ्यांचें दुःख हरण करणें आमचें कर्तव्य आहे, असें ती भीमाला म्हणाली; त्यावर

भीम म्हणे शोध करीं जा स्वमुखें
विप्रनायका पूस ।
घारीन दुःख सर्वहि दहना
अतिभार काय कापूस ॥ १२ ॥
( आ.अ. ३० )

या आर्येचे तीन चरणार्ध मुळांत आहेत. चवथ्यांत पंतांचें आवडतें यमक आलें आहे. हें बकासुर आख्यान मुळांतच करुणरसानें ओथंबलेलें आहे. आपल्यापैकीं स्त्री, पति, कन्या व बालक यांतून बकासुराला कोणी बलि जावयास सिद्ध व्हावें, याविषयीं एका गरीब पण प्रेमळ ब्राम्हण कुटुंबांत चर्चा चालली आहे. तिच्याकडे व्यासांनीं अडीच अध्याय (१५७-८-९) व सुमारें शंभर सवाशें श्लोक लावले आहेत. त्यांचें सार देण्यांत पंतांनीं अवघ्या एकोणीस आर्या लावल्या आहेत. त्या मुळाशीं ताडून पाहिल्या असतां व्यासांशीं पंत सामनाच करीत आहेत असें वाटतें. म्हणून त्या सर्वच दिल्या आहेत.

"जाये ! वदलीस ' परस्थळगमन विचार
सर्वथा राहो ।
माहेर येथ आहे, वोळखती लोक
सर्व, थारा हो' ॥ १५ ॥
गेलों असतों तरि कां पडतें हें
प्राणसंकट प्रमदे ? ।
स्वकुटंबव्यसन जसें देतें न तसें
बुधा विप्र भ्रम दे ॥ १६ ॥
जरि दान तुझें द्यावें, कांते !
मज भासतें तसें तरि तें ।
सिन्धूदरीं विकावें स्वहितार्थ
तितीर्षुनें जसें तरितें. ॥ १७ ॥
पुत्रचि अधिक, न कन्या, अन्यास
गमे, मला न लोभ्याला ।
नयन–युगांतुनि एकहि द्याया स्वप्नीं
न कोण तो भ्याला ? ॥ १८ ॥
देतों निज वपु परि तूं भीरु !
कशी साहशील विरहातें ? ।
स्वर्गींहि दुःसहचि जें म्हणसील मज
स्मरोनि चिर " हा " ! तें ॥ १९ ॥
प्राणांचा त्याग बरा, तुमचा न बरा,
कसा न तो पापी ! ।
कूपांत बळें अबळा, घालुनि ठकवूनि
दोर जो कापी "॥ २० ॥
तों ब्राह्मणी म्हणे "हो ! कवि साधु !
तुम्हीं करूं नका शोक ।
यन्मूलमापदर्थे तो शंकर साचि
आठवा श्लोक ॥ २१ ॥
अजि आत्मानं सततं रक्षेद्दारै
र्धनैरपि श्लोकीं ।

तेंचि करा हो ! न बुडों द्या हो !
मज निजमतीसही शोकीं ॥ २२ ॥
पतिपूर्वी स्त्रीस मरण तें लग्नाहुनि
काय हो ऊन ? ।
न रहावेंचि सतीनें पळभरही
विरूप काय होऊन ! ॥ २३ ॥
रक्षाल तुम्हींच मुलें, अबला वाहील
फार जीवा हे ।
रक्षील कशी आल्या नवपूरीं
भीरु फार जी वाहे ॥ २४ ॥
जाईन मीच राक्षस जरि करकर
सर्व मानवां चावे ।
देवें स्त्री म्हणुनि दया येतां,
मत्प्राण कां न वांचावे ? ॥ २५ ॥
मज भक्षीलचि तो तरि,
विधुरपणें सर्वथा नका राहूं ।
ती स्त्री मीच म्हणा जी ! मागें
सारोनियां नकारा हूं ! "॥ २६ ॥
ऐसें म्हणतां स्त्रीच्या कंठीं घालुनि
मिठी म्हणे "अयिते !
कथमेव मुक्तमदयं तदयं किमनुष्ठितुं
क्षमो दयिते ?" ॥ २७ ॥
परिसे असें पृथा जों तोंचि म्हणे
त्यासि कन्यका "मातें ।
द्या, द्यायाचीच सुता. हे किमपि नयेचि
अन्य कामातें ॥ २८ ॥
आत्मा पुत्र, सखा, स्त्री, कन्या
चिंताचि सर्व काळ जिला ।
प्रसवोनि वाहती मनिं श्रीमंतहि
पितर सर्व काळजिला ॥ २९ ॥
कन्या रक्ष्य तिघांतुनि एका तुज
हो म्हणेल कां टाकीं ? ।
बापा ! कांट्यानेंचि प्राज्ञ सुखें
काढितातति कांटा कीं" ॥ ३० ॥

ऐसें वदोनि कन्या रडवूनि रडे
तशांत जवळून ।
खवळूनि उठे बालक बोले हस्तें
तृणासि कवळून ॥ ३१ ॥
समजावुनि त्यांसि म्हणे "ऐसें
लालिंचलासि मालीन
कां ललतां आललतां पलतां मीं
सांगलांत तालीन "॥ ३२ ॥
हासविलीं हर्षविलीं व्यसनार्त
तिघेंहि बाळ शब्दानें ।
अब्दानें ग्रीष्मदवाकुळ बर्हिकुळें
जशींच अह्लानें ॥ ३३ ॥
(आ. अ. ३०)

यांत करुणरस वाढतां वाढतां त्याला एवढा मोठा पूर आला आहे कीं, नयनमार्गातून अश्रुमिषानें ओसरून जाण्याशिवाय त्याला दुसरें गत्यंतर नव्हतें. मातेच्या भाषणानंतर कन्या आपल्या भाषणानें दुसऱ्यांना रडवून आपण स्वतः रडली. हें जणूं काय वाचकांसही असह्य होईल म्हणून बालकाच्या भाषणानें व्यासांनीं त्या समग्र कुटुंबास हसूं आणवून हर्षविलें आहे. हा भाग जितक्या वेळां वाचावा तितक्या वेळां तो अधिकाधिक सौंदर्य दाखवितो. मीं तुला सांगितलें, पण तूं ऐकलें नाहींस; म्हणून हें कुटुंबव्यसन प्राप्त झालें अशी पत्नीला खेदकारक आठवण देऊन कुटुंबाच्या कल्याणाकरितां मींच बलि जावें हेंच उचित आहे अशा पतीच्या योजनेबरोबर या ब्राह्मण कुटुंबाच्या उपाख्यानास आरंभ झाला आहे. त्यांतील स्त्रीला संबोधून पतीनें जे विशिष्ट शब्द घातले आहेत त्यांत औचित्य फार आहे. जाये ! (आ. १५) कान्ते (आ. १७) भीरु, अबला व दयिते (आ. १९, २४ व २७) वरील एकोणीस आर्यांतील अलंकार फार सुन्दर आहेत. कन्या, सनाथ सधवा स्त्री, अथवा अनाथ विधवा स्त्री

पतीपूर्वी मरण लग्नासमान मानणारी पतिव्रता स्त्री, या सर्व स्थितींतील स्त्रियांचीं सामाजिक चित्रें पंतांनीं डोळ्यांपुढें उभीं केलीं आहेत. त्या-शिवाय पुत्र अधिक कीं कन्या अधिक याविषयीं मायाळू पित्याचे उद्‌गारही दिले आहेत. ही बका-सुराची आपत्ति ग्रंथिक सन्निपाताच्या आपत्तीप्रमाणेंच ओढवली होती. तींत स्थलान्तर करण्याचें महत्त्व, स्वजनपरित्याग, प्रथमपत्नीनिधनानंतर आपद्‌धर्म म्हणून दुसरी पत्नी करण्याची इष्टता इ० प्रश्नांची मार्मिक चर्चा या उपाख्यानांत आली आहे. स्त्रीला तरीची उपमा ( आ. १७ ), पुत्र व कन्या यांस नयनयुगलाची उपमा ( आ. १८ ) या नवीन आहेत. बालकाचें बोलणें ( आ. १७ ) हें मूळ श्लोकाचें सुन्दर भाषांतर आहे. व्यासकृत वर्णनांत ' बालक अव्यक्त शब्दांत असें असें म्हणालें ' असें आहे तें पंतांनीं अव्यक्त म्हणजे बोबड्या शब्दांतच दिलें आहे;तें प्रत्यक्षवत् अधिक परिणामकारक झालें आहे. विधवा स्त्रीचे व पोरक्या पोरांचे हाल मुळांत फार सरस प्रकारें व्यासांनीं वर्णन करून स्त्रीला पति कसा प्रिय तें एका अमर श्लोकांत दाखविलें आहे. तें असें

मितं ददातिहि पिता, मितं माता, मितं सुतः ॥
अमितस्यहि दातारं का पतिं नाभिनन्दति ॥२८॥
( अ. १७२ कुंभकोण प्रत )

( आ. २७ ) येथें दुसरा चरण संस्कृतांत आहे. तसा अर्धे अथवा सगळे, भावना प्रदीप्त झाली असतां वापरण्याची पंतांना संवय होती.

पांचालपुराला पाण्डव जात असतां, ते गंगा-तीरावर प्राप्त झाले. तेथें जलक्रीडा करीत असलेल्या चित्ररथ गन्धर्वासह युद्ध झालें. त्यांत अर्जुनानें चित्ररथाला पकडून धर्मराजापुढें उभें केलें. पण चित्ररथाच्या स्त्रीनें प्रार्थना केली व धर्मानें आज्ञा केल्यावरून अर्जुनानें चित्ररथाला सोडून दिलें.

जिष्णु म्हणे गन्धर्वा देतों तुज
अभय आर्य·जा वांचें ।
न सरो त्वदायु, न सरे जेविं
विवाहांत कार्य जावांचें ॥ २३ ॥
( आ. अ. ३२ )

दुसऱ्या चरणांतील उपमा मुळांत नाहीं. लग्न-कार्यामध्यें बायकांचें काम आटपतां आटपतां कितीही घाई केली, तरी थोडें तरी शिल्लक राहतें; विशेषतः मुहूर्त साधावयाचा असतांना. ही उपमा घरगुती आहे. तशा पंतांच्या काव्यांत पुष्कळ आढळतात.

विश्वामित्र आश्रमांत प्राप्त झाला असतां वसिष्ठ त्याला भोजनाचा आग्रह करीत आहे त्या प्रसंगाची पुढील आर्या आहे.

स्वपद-नत-गाधिजातें सत्कारुनि
मुनि म्हणे अगा राया ।
जावें न क्षुधितें त्वां, येउनियां
आमुच्या अगारा या ॥ ४ ॥
(आ. अ. ३३ )

या आर्येंत पंतांचें आवडतें यमक आहे.

विश्वामित्रानें कामधेनु आश्रमांतून बलानें ओढून नेली. त्याच्या हातून सुटून " माझी तुम्हीं उपेक्षा कां करिता" असें तिनें वसिष्ठाला विचारलें. तेव्हां वसिष्ठ म्हणाला, " क्षत्रियांचें बळ, तेज आहे व ब्राह्मणाचें क्षमा आहे. ती क्षमा आड येत आहे. तुला रुचलें तर जा. " या मूळ वाक्यावर पंतांची अमर झालेली एक सुन्दर आर्या आहे ती अशीः—

सन्मति दरींत न शिरे मत्तमतंगज
विवेक हरि जागे ।
त्यां न त्यजितां नेतो भूप बळें
तुज रुचेल तरि जा गे ! ॥ २३ ॥

अनुज्ञा मिळतांच कामधेनूनें आपल्या अंगांतून म्लेच्छयवनादि उत्पन्न केले. ते विश्वामित्राच्या सैन्यावर तुटून पडतांच तोंडानें म्हणत सुटले

पकडो लियो हकालो ! बे ! बिसवामितर
भागजावेगा ! ॥ ३१ ॥

म्लेच्छादिकांची भाषा त्यांच्याच तोंडीं पंतांनीं घातली आहे ती उचितच आहे. ही आर्या शाळें-तील मुलांची आवडती आहे.

पुढें विश्वामित्र तप करून राजर्षीचा विप्रर्षि झाला ( ब्राह्मणत्वमवाप्तवान् ४८ ) आ. अ. १७५ असें सांगून व्यासांनीं वसिष्ठोपाख्यान संपविलें आहे. तरी पंत म्हणतात.

झाला नृपति वसिष्ठस्पर्धेनें
विप्र तें असो आतां ।
विस्तर भय दे, नाहीं तरि
काळाचेंहि भय नसे आतां ॥ ४० ॥
(आ. अ. ३३)

पण या आर्येच्या दुसऱ्या भागांतील विस्तरभय कोठून आलें? आपल्या मानेस भूत बसलें म्हणजे त्याला सर्वत्र भूत जसें दिसतें, तसें पंतांच्या मानेस अक्षय्य बसलेलें हें विस्तरभय येथें एरव्हींच पंतांपुढें उभें राहिलें आहे.

मोरोपंतांना मधून मधून लहान लहान चांगल्या उक्ति पदरच्या गोवून देण्याची हौस होती. यांतील कित्येक, चरण लांब आहेत. कित्येक अर्धचरण लांबीच्या आहेत. कित्येक दोन शब्दांत पूर्ण होणाऱ्या आहेत. सुतशोकानें मरण इच्छिणारा वसिष्ठ नदींत बुडी घेतो. पण नदी पाश तोडून त्याला मरूं देत नाहीं.

बद्ध करुनि करचरण बुडतां तोडी
महानदी पाशा ।
कोणा नको सुतेजा ! काय पतंगीं
लहान दीपाशा ॥५४ ॥
(आ. अ. ३३)

चतुर्थ चरणांतील सूक्ति मुळांत नाहीं. पुन्हा दुसरा प्रयत्न वसिष्ठानें केला.

निधनार्थ मुनिहि म्हणे "यत्नीं फळ"
आंवरूं स्वमन कामीं ॥ ५६ ॥

यांतील सूक्ति दोन शब्दांचीच असून पंतांच्या पदरची आहे.

स्वयंवर प्रसंगीं द्रौपदीला मंगल स्नान घालून अलंकृत करून हातांत धरून भावानें रंगांगणीं आणलें. तेव्हां तिच्या रूपाचें वर्णन पंतांनीं केलें आहे. त्याची पद्धति अगदीं स्वतंत्र आहे. पृथ्वींतील प्रमाणभूत उपमानें शोधून त्यांशीं द्रौपदीच्या एक एक अवयवाची तुलना करीत मोरोपंत बसले नाहींत. तिला पाहून मोठमोठ्या कवींना काय वाटलें त्याचें चित्र कल्पनेनें रेखून एका आर्येत पंतांनीं काढिलें आहे. पंत म्हणतात-

कर वळविला अजें जें विष्णुधृत
स्त्रीस्वरूप कित्ता तें ।
चित्र तसेंचि उतरलें चतुरें
वाटे कवींद्र चित्तात ॥ १६ ।
(आ. अ. ३४)

समुद्रमंथनसमयीं अमृताचा कुंभ प्रकट होतांच त्याच्या प्राप्त्यर्थ देवदानवांत स्पर्धा उत्पन्न झाली. त्या प्रसंगीं दानवांना अव्हेरून देवांनाच अमृत पाजण्याकरितां श्रीविष्णूनें जें मोहिनीचें रूप धरिलें, तें कित्त्याप्रमाणें पुढें ठेवून सुंदर स्त्रीनिर्मितिरूप अक्षर वळवीत बसणाऱ्या अजाचा ( ब्रह्मदेवाचा ) जेव्हां हात वळला, जेव्हां त्या हाताला वळण लागलें, तेव्हांच ही द्रौपदी निर्माण झाली. हें वर्णन मूळ महाभारतांत नाहीं. असलीं वर्णनें अधिक खुलून दिसतात. त्याचें एक उदाहरण रामायणांत आहे. जेव्हां मारूतिनें लंकेंत जाऊन सीतेला पहिल्यानें पाहिलें, तेव्हां त्यानें उद्गार काढले ते

यदि रामः समुद्रान्तां मेदिनीं परिवर्तयेत् ।
अस्याःकृते जगच्चापि युक्तमित्येव मे मतिः ॥

( भावार्थ ) मी तर हिच्याकरितां कांहीं समुद्र, कांहीं भू क्रमून आलों; परंतु राम जरी समुद्रांता मेदिनी नव्हे, सर्व जगही हिच्याकरितां उलथेंपालथें घालील तरी तें योग्यच होईल असें मला वाटतें.

हुबेहुब असेंच वर्णन होमरच्या इलियडनामक काव्यांत आढळतें.

त्रोजन-युवा पारीस यानें मेनिलास नामक एका ग्रीक वीराची पत्नी जी प्रख्यात हेलन तिला पळवून नेली. तिची परत प्राप्ति करून घेण्याकरितां ग्रीकांनीं त्रायपुरीला नऊ वर्षें वेढा दिला होता. महायुद्धाचा प्रसंग टाळण्याकरितां पारिस व मेनिलास या दोघांनीं द्वंद्वयुद्ध खेळावें, त्यांत जो जयी होईल त्याची हेलन व्हावी, असें ठरून रणांगणीं सर्व उभयपक्षींचे वीर

बसले. तेथें हेलनला आणून बसविण्यांत आलें. तिला पाहतांच वृद्ध ग्रीक आपसांत कुजबुजले:

हेलन येतां बघुनी कुजबुजती
सर्व एकमेकांत !
हिजसाठीं नउ वर्षें जग लढतें
काय नवल हो यांत ॥ ५६ ॥
मधुर किति रूप अहा ! खचितचि
तनुसौष्ठवा नसे तुलना ।
वच कैसें ? गति कैसी ? वा ! वा !
दुसरी नसे अशी ललना ५६ ॥
भूवरती अवतरली रंभा ही
काय मोहिनी वाटे ।
ईशा ! शिशुंचा अमुचा नाश न हो !
लाव कीं हिला वाटे ॥ ५८
( इलियड सर्गस्वकृत भाषांतर )

द्रौपदीला पणानें जिंकल्यावर पाण्डव कुलाल शाळेंत जाऊन कुन्तीला म्हणाले " भिक्षा आणली आहे. " कुन्ती म्हणाली सर्वांनीं मिळून सारखी वांटून घ्या. या आज्ञेप्रमाणें पाण्डवांनीं द्रौपदीची वांटणी केली. तीविषयीं पंत म्हणतात:

जनकेंचि चुंबिली जी, चुंबावी
नंदनेंहि नलिनी ती ।
धरिली त्या कृष्णारतमतिनीं
अति नीचसीच अलिनीति ॥९२॥
( आ. अ. ३४ )

हें प्रवचन मुळांत नाहीं.

पाण्डवांनीं द्रौपदीशीं लग्न केलें हा वृतान्त कौरवांना कळल्यावर पुढें काय करावें याचा विचार त्यांनीं चालविला. ' पाण्डवांना मारावें ' या तऱ्हेचा अनेकांनीं उपदेश केला. विदुर म्हणाला, हें शक्य नाहीं; कां तर

धर्मीं युधिष्ठिर निरत, युधिष्ठिरीं
सबळ, वृष्णिवर शौरी ।
त्या शौरीच्या ठायीं विजयश्री;
जेविं शंकरीं गौरी. ॥ ४६ ॥
( आ. अ. ३६ )

युधिष्ठिराची धर्माच्या ठायीं रति आहे; युधिष्ठिराच्या ठायीं बळरामासह यदुकुळवर कृष्णाची आहे व कृष्णाच्या ठायीं विजयश्रीची आहे; जशी शंकराच्या ठायीं गौरीची. ही विदुरोक्ति मुळांतील सात आठ श्लोकांची गोळा बेरीज आहे. वरील आर्येंत, एकावलि नामक सांखळीच्या स्वरूपाचा अलंकार साधला आहे. तरी

यतः कृष्णस्ततः सर्वे यतः
कृष्णस्ततोजयः ॥ २६ ॥
( आ. अ. २०५ )

या सर्वोमुखीं असलेल्या मुळांतील चरणाचा जोर वरील आर्येंत आला नाहीं. कारण वाचकाचें लक्ष उपमेयावरून उठून उपमानावर जाऊन बसतें.

सुन्दोपसुन्द हे बंधु एकराज्य, एकगृह, एकशय्या एकासन भोगणारे, बिंबप्रतिबिंबभावाप्रमाणें नांदत होते. त्यांना दोघांना तिलोत्तमा हवी लागली. तीवरून ते युद्ध खेळले. त्यांतही एक करी तसेंच दुसरा करी

सुंद जसा उपसुंदहि दे, देत्यातें
जसे गगन गाळी ॥ २१ ॥
( आ. अ. ३७ )

येथें एकानें गाळी दुसऱ्याला दिली, तो त्याला उलट तीच कशी देई, त्याचें वर्णन पंतांनीं सृष्टींत जो गगनाच्या ठायीं ध्वनिपासून प्रतिध्वनि उपजण्याचा धर्म आहे, त्याविषयींची मुळांत नसलेली उपमा योजून मार्मिकपणें केलें आहे. येथें त्यांची सृष्टिनिरीक्षणशक्ति दिसून येते. एका बन्धूनें गदा घेतली, तेव्हां दुसऱ्यानें गदा घेतली व एकमेकांच्या डोक्यांत गदा घालून दोघे कसे प्राणास मुकले त्या हसूं आणण्याऱ्या प्रकाराचें वर्णन पंतांनीं अकल्पित प्रकारानें केलें आहे.

सुंदाची उपसुंदीं उपसुंदाची गदा पडे सुंदीं ।
तन्मरणमुदुध्दासें गणपतिच्या
कळ नुठेल कां तुंदी ॥ २३ ॥

गणपतीला पोटांत कळ येईतों हंसूं आणणारें वर्णन व्यासांनीं करणें शक्य नाहीं. कारण व्यासांनीं भारत मुखानें सांगावें व गणपतीनें तें लिहावें, हा जो क्रम चालला होता, त्यांत विघ्न आलें असतें; पण मोरोपंताला गणपति लेखक मिळाला नसल्यामुळे गणपतीच्या पोटांत कळ उठली, तर पंतांचें कांहीं नडत नव्हतें. म्हणून ते या भानगडींत पडले.

प्रत्येक पेरांत गोड असणाऱ्या उंसाप्रमाणें महाभारत 'प्रतिपर्व रसावह' आहे. त्याची सर दुसऱ्याला कशी येणार ? तरी पंतांनीं रचलेलें आदिपर्व त्यांचें त्यांनाच इतकें चांगलें वाटलें कीं 'आम्हीं वाल्मीकिप्रभृतीच्या पंक्तीला बसलों असतां त्यांनीं तें सहन केलें असें त्यांनीं म्हटलें आहे.

पंत म्हणतात

ऐका सज्जन हो ! भवद्वच खरें,
आश्चर्य म्यां पाहिलें ।
वाल्मीकिप्रभृति स्वबंदिनिकरीं
दीना मला बाहिलें ॥
केलें प्राकृत काव्य, ईश्वरपदीं
धत्तूरसें वाहिलें ।
सांगूं काय वरप्रसाद ? अजि जें
व्यासें हि कीं साहिलें ॥

ही योग्यता वरप्रसादानें शक्य झाली असें पंतांनीं म्हटलेंच आहे. तेव्हां ही गर्वोक्ति किंवा आत्मश्लाघा नसून कृतज्ञतापूर्वक आपल्या यशाचें श्रेय परमेश्वराला देऊन आपल्या प्रिय वाचकांस आपल्या संतोषाचें गुज सांगितलें आहे.

## सभापर्व

राजसूय यज्ञ करण्याचा निश्चय धर्मानें कृष्णाला कळवितांच कृष्ण म्हणतात, "बाबा रे ! जरासन्धाचा वध केल्याशिवाय तुला हा यज्ञ साध्य नाहीं. त्याच्या भयानें मी माझी मथुरा जिला भूलोकींची अमरावतीच ( इंद्रपुरी ) म्हणतात तीही सोडली; कारण

करिति वतन जतन, पतन मत न
भल्याला तथापि ते वरिती ।
त्यजिली स्वराजधानी मथुरा
अमरावतीच भूवरि ती ॥ ६७ ॥
( स. अ. १ )

म्हणजे आपल्या वतनाचें जतन करण्याकरितां आपल्याला पतन जरी मत न (आवडत नसलें) तरी भले लोक तेंच पत्करतात. या आर्येचा दुसरा चरण मुळांत आहे. पहिला नाहीं. तथापि यांत भारती युद्धाच्या मुळाशीं असलेलें तत्त्व अंतर्भूत झालेलें आहे. रामायण सांगतें, दुसऱ्याच्या स्त्रीचें हरण करूं नये. महाभारत सांगतें हेंही खरेंच; पण कोणाचें वतन हरण करूं नये ? वतनावरची प्रीति आम्हां भारतीय जनांत अद्यापिही दिसून येते. धृतराष्ट्राला शकुनीनें कळविलें कीं, तुझा ज्येष्ठ पुत्र कृश झाला आहे. त्यावरून धृतराष्ट्र दुर्योधनाला विचारतो " वत्सा ! तूं एवढें वैभव भोगून फिकट कां दिसतोस ?" दुर्योधन उत्तर देतो, " मयसभेंत मला निर्जल भाग सजल व सजल निर्जल वाटला. मी पुढें सरतांच वापींत पडलों. उघडया दाराच्या आकारासारखी भिंत पाहून आंत शिरूं लागलों, तों मीं आपटलों. असले भ्रमाचे प्रकार पाहून अर्जुन, भीम इ. भ्राते हंसले " असें मुळांत आहे; पण पंतांनीं दुर्योधनाला तें हसें किती असह्य झालें तें ध्वनित केलें आहे.

धृतराष्ट्र सुता ! ये ! मी दाखवितों,
द्वार हें, न वापा हें ।
वदला असें वृकोदर जें तद्वाक्यार्थ
तूंचि वा पाहें ॥ ३८ ॥
( स. अ. ३. )

भीम म्हणतो तूं धृतराष्ट्राचा मुलगा (आंधळ्याचा पोर) तुला कसें दिसेल ? ये, तुला हात धरून दाखवितों. येथें परिकर अलंकार धृतराष्ट्र हा शब्द हेतूनें वापरल्यामुळें साधला आहे. धृतराष्ट्रात्मज (धृतराष्ट्रसुत) हा शब्द व्यासांनीं मुळांत हेतूनें वापरला आहे, हें वाचकांच्या लक्षांत आणून देण्याकरतां वाक्यार्थाकडे पाहा, असें पंतांनीं आर्येच्या शेवटीं म्हणून ठेविलें आहे.

शकुनि म्हणे खेळोंया; धर्म म्हणे
अधिक काय याहून ? ॥१॥
(स. अ. ४)

द्यूताशिवाय आणखी हिताची गोष्ट कुठली ? याच्याहून अधिक पराक्रम तो कोणता ? हें द्यूतावरचें प्रेम भारतीय लाकांत पुरातन काळापासून आहे.

" अक्षैर्मादीव्यन् । कृषीमत्कृषस्व " ।

फांशांनीं खेळूं नका, कृषिकर्म करा असें ऋग्वेद सांगत आहे.

( ऋग्वेद संहिता १० मण्डळ सूक्त ३४ )

कपटद्यूत विलोकन करून, विदुरानें दुर्योधनाची उघडपणें निन्दा केली. म्हणून दुर्योधनानें त्यावर तोंड सोडलें. "तुला कांहीं कळत नाहीं, तरी आम्ही तुझी दुरुक्ति सहन करतों. पण तूं आम्हांस मऊ पाहून दडपडतोस," या अर्थाचा पंतांनीं पुढील चरण घातला आहे तो मुळांत नाहीं.

जों मृदु लागे तों तों दडपी शिशु
फार ऊन भातातें ॥ ३७ ॥
( स. अ. ४ ) ॥

हा चरण सुभाषितांत मोडतो.

शेवटीं द्यूतांत सुत, बन्धु. इ० हरविल्यास ' तुझें काय उरलें आहे' असें शकुनीनें विचारतांच

धर्म म्हणे मीं द्यूतीं बुडविन सर्वस्व
आपणांसहित ॥ ( ६८ )

या निश्चयाप्रमाणें स्वतःला हरवून बसल्यावर शकुनि त्याला म्हणाला "अरे, तुझ्याजवळ तुझी स्त्री असून पण लावावयाला शिल्लक आहे. तिचा पण लाव." द्रौपदीची खरी योग्यता काय होती, तिचें वर्णन धर्मानें केलें तें वाचनीय आहे. व्यासाचे मूळ सात श्लोक व मोरोपंतांच्या त्याविषयींच्या सात आर्या यांतील अधिक सरस कोणतें तें सांगतां येणें कठीण आहे.

नैवऱ्हस्वा न महती न कृशा नातिरोहिणी ।

या शब्दांत जो प्रारंभ झाला आहे, तो फारच सरस आहे. वाचकाची मति गुंग करून सोडणारा आहे. साऱ्या जगाच्या सारस्वतांत याला तोड पाहूं गेलें असता खिस्तापूर्वी तीन शतकें होऊन गेलेल्या एका चिनी कवीकडे वळल्याशिवाय ती मिळणार नाहीं. शेजारींच वसत असलेल्या बालेचें वर्णन करतांना संग यू म्हणतो ' तिच्या उंचींत एका इंचाची भर घाला, ती फार उंच ठरेल. बरें, एक इंच तिची उंची कमी करा, ती फार ठेंगणी ठरेल.' इ० व्यासांची ही पहिली ओळ पंतांनीं गाळली आहे. पंत म्हणतातः

धर्म म्हणे शकुने ! जी रूपें श्रीला,
क्षमागुणें महिला ।
साजे सखी अखिन्ना कृत्यभरें सुमति
आमुची महिला ॥ ७२ ॥

शरदुत्पलपत्राक्षी शरदुत्पल—
पुण्यगंधसमगंधा ।
अस्खलित चालवी गृहधर्मी मज
यष्टि तशि पथीं अंधा ॥ ७३ ॥

आली मखवेदीच्या जी द्रुपदसुकृत—
भरास्तव कुशीला ।
वाटो बरा सुशीला; वाटेल न हा बरा
स्तव कु-शीला ॥ ७४ ॥

आधीं जिणें उठावें, पाहुनि
निजलों असें मग निजावें।
रागेजणें सुदुर्मिळ तेंहि जिचें
ज्वालसें गगनिं जावें ॥ ७५ ॥

धौम्यापासुनि गोपांपर्यंत
जिणें स्वयें समाचार।
ध्यावा श्रिततापहर श्रीगंगेचा
जिचा समाचार ॥ ७६

ती देवी आता म्यां या द्यूतीं
लाविली अहाहा ! रे।
छळिशी द्यूतींच कसा हारे ! अन्यत्र
कां न हा हारे ॥ ७७ ॥

व्यासांची आरंभींची फार झोकदार ओळ पंतांनीं सोडली आहे. तरी ७५ व्या आर्येंत अन्त्य यमक साधण्याकरितां एक नवीनच उपमा घालून द्रौपदीच्या पतिनिष्ठ स्वभावाची पूर्णता केली आहे.पंत म्हणतातः ती रागावली असें दुर्मिळ, रागावलीच तर अग्नीच्या ज्वाळेप्रमाणें तिचा राग वरच्यावर कोणाला ताप दिल्याशिवय निघून जातो. राग हा मनाचा तप्तपणा खरा, म्हणून त्याला अग्नीच्या ज्वाळेची उपमा दिली आहे, ती समर्पकच आहे. आर्य स्त्रीच्या शीलाचें हें खरें खरें चित्र आहे. अशी द्रौपदी पुढें द्यूतांत जिंकली गेली; तेव्हां धृतराष्ट्राचा खरा खरा स्वभाव बाहेर पडला. त्याविषयीं पंत म्हणातात.

किं जितमिह ? किं जितमिह ? ऐसें
असकृत् पुसे अचक्षु रसें।
रडले सभ्य तयांच्या हृदयीं तें
लागलें वच क्षुरसें ॥( ८० )॥
( स. अ. ४ )

जिथें सर्व सभा रडली, तिथें हा आंधळा "रसें" म्हणजे फार आवडीनें म्हणाला " काय हो ! कोण जिंकलें ? कोण जिंकलें ? " पण हे शब्द सभ्यांच्या हृदयांत नापिताच्या शस्त्राप्रमाणें लागले. ही उपमा पंतांच्या पदरची आहे.

यानंतर दुर्योधन म्हणाला "आतां दासीकर्म करावयास द्रौपदीला सभेंत आणा." तेव्हां विदुर म्हणाला

हरिच्या पुन्हां पुन्हां कां
काडया नाकांत घालिसी शशका !।
यश काय पक्षिपतिचें येइल हें
चार करुनि तुज मशका ! ॥८४॥

ही आर्या पंतांची पदरची आहे. येथें धर्माला हरि व पक्षिपति म्हटलें आहे व दुर्योधनाला शशक व मशक म्हटलें आहे. हींत दोन रूपकें साधलीं आहेत.

विदुर म्हणाला
ब्रूयात् क्षमी गभीरोऽसीति बत
युधिष्ठिरं प्रभु की न !।
निज नीचपण प्रकटविसी, तूं
श्वान भल्याहरीहि भुंकोन ॥८५॥

ही आर्या स्वतंत्र असून हिचा दुसरा चरण अमर झाला आहे. आपलें कवन लोकांस आवडून तें त्यांनीं मुखांत वागवावें अशी कवीची इच्छा असते व तें तसें लोकांनीं मुखांत वागविलें आहे कीं नाहीं ही एक कवित्वाची कसोटीच आहे. तिला वरीलप्रमाणें पुष्कळ अमर कविता करून पंत उतरले आहेत.

मग दुर्योधन आपल्या दूताला म्हणालाः—
सूता ! जा कृष्णेला घेउनि ये !
भय नसे तुला लेश, ।
सर्वज्ञ न, किंचिद्ज्ञ क्षत्ता;
ब्रह्मा नव्हे कुलालेश ! ॥ ८९ ॥

पहिली ओळ मूळांत आहे. यमक साधण्यास नवीन घातलेली दुसरी ओळ दुर्योधनाच्या तोंडीं या विजयप्रसंगीं उचितच आहे. दुर्योधन म्हणतो " जा ! तूं कृष्णेला घेऊन ये. तुला पाण्डवांपासून

भय पोंचणार नाहीं. विदुराला थोडेंसें ज्ञान असलें म्हणजे तो सर्वज्ञ होत नाहीं. कुंभार लहानमोठीं मडकीं निर्माण करतो, म्हणजे तो सर्व सृष्टीचा निर्माणकर्ता ब्रह्मदेव नव्हे ! समजलास ! ''

तो दूत द्रौपदीला आणावयास गेला. पण तिच्या मनांत एक शंका अशी होती कीं, स्वतःचा पण लावून स्वतःला हरवून बसलेल्या धर्माला तिचा पण कसा लावतां येईल? ती म्हणाली 'जा जाऊन धर्माला विचार

"राजेंद्रा ! हारविली प्रथम द्यूतीं
स्वमूर्ति कीं भार्या ? ॥ ९५ ॥

दूतानें हा प्रश्न विचारला असतां धर्म विगतसत्त्व होऊन उत्तर देईना. सभ्यही देईनात. तेव्हां दुर्योधन म्हणाला, " जा, तिला घेऊन ये. तिनें स्वतः येऊन हा प्रश्न विचारावयास काय हरकत आहे ? "

सभ्यांनीं प्रश्नोत्तर योजावें
नीट कीं न योजावें ।
आतें वैद्यगृहाला, गुण यो,
कीं प्राक्तनें न यो ! जावें ॥ १०९

या आर्येतील दुसरी ओळ नवीन असून अमर झाली आहे. हा निरोप द्रौपदीला परत सांगावयास जाण्याच्या कामीं दूत कचरत आहे, हें जाणून दुर्योधन म्हणाला, " दुःशासना, तूं स्वतः तिला जाऊन घेऊन ये." मग काय ? दुःशासनच तो ! तो जाऊन तिला बलात्कारानें केश धरून आणूं लागला. " मी रजस्वला आहें, एकांबरा आहें." ही तिची विनवणी व्यर्थ गेली.

देवी म्हणे अनार्या ! नाहीं तूझ्या
मनांत पापदर ।
ओढूं नको फरफरां, घेऊंदे
सांवरून हा पदर ! ॥ ७ ॥
(स. अ. ५)

ही आर्या सर्वतोमुखीं बसली आहे. द्रौपदीला पाहून भीष्म म्हणाले, " तुझ्या प्रश्नाचें विवेचन मला स्पष्टपणें करतां येत नाहीं. धर्म सूक्ष्म आहे. धर्म स्वतःपणांत हरल्यावर तुझा पण त्याला लावतां येत नाहीं; याअर्थी तूं अजिता आहेस. परंतु स्त्रिया भर्तृवश असतात. भर्त्याची गति तीच स्त्रीची, या अर्थानें तूं जिता आहेस." असा न्याय तज्ञाकडून मिळाल्यावर द्रौपदीनें सभ्यांपुढें तोच प्रश्न टाकला. "मला स्पष्ट न्याय हवा. भीष्मांनीं दिला तसा संदिग्ध न्याय नको." हें सागतांना द्रौपदीनें सभेचा जो गौरव केला आहे, तो न्यायगृहांत कोणत्याही ज्यूरीला (सभ्यांला) उद्देशून भाषण करणाऱ्या उत्कृष्ट वकिलाच्या तोंडीं शोभण्यासारखा आहे. द्रौपदी म्हणतेः

न सा सभा यत्र न सन्ति वृद्धाः
न ते वृद्धा ये न वदन्ति धर्मम् ॥
नासौ धर्मो यत्र न सत्यमस्ति ।
न तत् सत्यं यच्छलेनानुविद्धम् ॥ ६५
(कुंभकोन प्रत) महाभारत सभा प.अ.८९

हा श्लोक मोरोपंतांना घ्यावासा वाटला नाहीं. येथें ही एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. द्रौपदीचा प्रश्न कायद्याचा आहे. तरीही तो महाभारतकाळांतील ज्यूरीपुढें (सभ्यांपुढें) येऊं शकला. हल्लींच्या ज्युरीपुढें अमुक अमुक गोष्ट घडून आली किंवा आली नाहीं हें सिद्ध झालें आहे कीं नाहीं, एवढाच प्रश्न येऊं शकता. द्रौपदीचा पण लावण्यांत आला कीं नाहीं, एवढाच प्रश्न हल्लींची ज्यूरी सोडवील. असा पण लावतां येईल कीं नाहीं हा कायद्याचा प्रश्न हल्लींचा न्यायाधीश सोडवील.

पाण्डव दुःखित बसले आहेत असें पाहून नयनिपुण विकर्ण सभासदांना उद्देशून म्हणालाः—

बोला हो ! बोला हो ! बोला हो !
सर्व सभ्य बोला हो ! ।
असमयमौनें तुमच्या सुज्ञत्वाच्या
न हानि मोला हो ॥ ४६ ॥

येथें दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, हल्लींच्या ज्युरींत सभासदांची जी निवड होते, तींतील तत्त्व असें आहे कीं, साधारणपणें जनांत आढळून येणारें व्यवहारज्ञान ज्या मनुष्याच्या अंगांत आहे, तोच ज्यूरीचा सभासद होण्यास लायक होतो. तेंच तत्त्व या महाभारतकाळांतील सभ्यांना लागू होतें असें या विकर्णाच्या भाषणावरून दिसून येतें. म्हणूनच विकर्ण सभ्यांना पुन्हा पुन्हा बजावून सांगत आहे! "अहो तुम्हीं बोला! बोला! बोलण्याचा हा समय आहे! जर आतां बोलणार नाहीं तर केव्हां बोलणार? या मौनानें तुमच्या अंगीं असलेल्या सुज्ञपणाचें मोल नाहींसें होईल." ही आर्या अमर झाली आहे. दुसरे कोणीं बोलले नाहींत, पण विकर्णानें मात्र ही अजिता आहे असें मत दिलें. तरी पाण्डवांचीं व द्रौपदीचीं वस्त्रें हिरावून घे, असें कर्णानें दुःशासनास सांगितलें. पाण्डवानीं वस्त्रें आपण होऊन काढून दिलीं. द्रौपदीनें कृष्णाचा धांवा आरंभिला तो उत्कृष्ट आहे. विस्तृत आहे, म्हणून त्यांतील चार आर्या दिल्या आहेत.

हे नाथ! रमानाथ! व्रजनाथ!
हरे! मुकुंद! कंसारे!
गोविंद! कृष्ण! केशव!
दीनार्तिहरस्त्वमेव संसारे! ॥६९॥

× × ×

बा ढळतां तिळहि पदर
भावी व्यजनासि साग रामा जी
ती खळसभेंत उघडी
पडल्ये न पडोनि सागरामाजी ॥७७॥

× × ×

अवतरला उतराया
जो दुःसह दुष्ट भार महिवरला।
अहिवरलास्यपटु प्रभु
करुणोक्तें द्वारकेंत गंहिवरला! ॥८०॥

परमेश्वर रूप धरी
स्वपरिजनहितोदया लुगडियांचें
निववाया सभ्यांसह मन नयनहि तो
दयालु गडियांचें ॥८१॥

पहिली आर्या मूळांत अर्थतः आहे. दुसरी व तिसरी ह्या पंतांच्या नवीन आहेत. पहिलींत भक्तिरस, दुसरींत करुणरस व तिसरींत भक्तवत्सलता हीं साधलीं आहेत. पंख्याच्या वाऱ्यानें पदर हलला तर पंख्यानें मोठा अपराध केला असें जिला वाटतें, ती आज खळसभेंत उघडी पडल्ये. याहून सागरांत बुडती तर उत्तम होतें. या भक्ताच्या करुणोक्तीनें श्रीकृष्णाला द्वारकेंत गहिंवर आला व द्रौपदीला वस्त्रें पुरविण्याकरितां त्यानें वस्त्ररूपि अवतार धारण केला. याला अंबरावतार म्हणतात. चवथ्या आर्येंत पंतांचें आवडतें यमक साधलें आहे. याशिवाय तिसरींत दामयमक आलें आहे. त्यामुळें वरील आर्या अधिकना गोडी आली आहे.

अत्यद्भुत अंबरावतराचा परिणाम सभासदांवर काय झाला त्याचें वर्णन करतांना पंत म्हणतातः

आर्येला मानियलें बहु पाहुनि
सज्जनीं चमत्कृतिला।
खळचि न मानिति तैसें बहुदूषणसज्ज
नीच मत्कृतिला ॥११५॥

या आर्येचे तीन पाद मूळांत आहेत. चवथ्या पादांतील उपमा पंतांची पदरची आहे. या आर्येंत आर्या व चमत्कृति या शब्दांत श्लेष आहे त्याचा फायदा घेऊन पंतांनीं आपल्या नीच टीकाकारांचा समाचार घेतला आहे.

वस्त्रें पुरवून कृष्णानें जी चमत्कृति (अत्यद्भुत कृति) दाखविली, ती पाहून जेवढे सज्जन होते तेवढयांनीं आर्येची (द्रौपदीची) वाहवा केली. पण खलांनीं केली नाहीं. कशी केली नाहीं? तर शब्द व अर्थ यांच्या चमत्कृतीला म्हणजे अलंकारांना पाहून (त्यांनीं भूषित झालेल्या आर्येला) म्हणजे पंतांच्या

आर्यावृत्तांतील कवितेला सज्जनांनीं मान दिला ( तिची वाहवा केली ); पण दूषण ठेवण्यास सज्ज असलेल्या नीच टीकाकारांनीं मात्र मान दिला नाहीं ( वाहवा केली नाहीं ) तरी. येथें असेंही उलट म्हणतां येईल कीं, पंतांनीं आपल्या आर्येलाच द्रौपदीची व रसिक वाचकांना सज्जन सभासदांची व नीच टीकाकारांना खल सभासदांची उपमा पर्यायानें दिली आहे.

नंतर द्रौपदीनें पुन्हा सभ्यांस विनंति केली:

सांगा यांची दासी ? कीं मी दासी
नव्हे ? मता निवडा ।
श्रवणीं धरूनि सूक्ता राजसभा शोभते
न तानिघडा ॥ १२४ ॥

दुसरा चरण सुभाषितरूप नवा आहे. या विनंतीचा उपयोग झाला नाहीं. मग "हे द्रौपदी ! अगदीं मोजके पांच पति देणाऱ्या या पत्नीपणापेक्षां अमित पति देणारें हें दासीपण चांगलें ! तें तूं घे !" या अर्थाचें कर्णानें भाषण केलें; त्यावर पंत म्हणलात:

ऐसें ऐकुनि सोडी अहिपतिसा
भीमसेन सुसकारा
बहुधा गुरुसंकोच ग्रासी तन्नामवर्ति
सु-सकारा ॥ २३ ॥
( स. अ. ६ )

पहिला चरण मूळांत आहे. दुसरा नवीन आहे. त्यांत पंतांनीं भीमसेन या नांवावर मोठी कोटी केली आहे.

भीमसेन नुसता सुसकाराच टाकून स्वस्थ बसला; कारण त्याला ( भीमाला ) गुरुसंकोचानें जसें ग्रासलें, तसेंच त्याच्या नावांतील सु-सकाराला ग्रासलें. भीमसेनाला गुरुसंकोचानें ग्रासलें म्हणजे त्याचा मोठा बन्धु जो धर्मराज त्यानें ग्रासलें; भीमसेनाला धर्मराजाची भीड पडली. तसेंच भीमसेन या नांवांत सुसकार आहे. म्हणजे चांगला सकार आहे, त्याच्या योगानें भीमसेन या नांवाचा भीम (भयंकर) आहे सेना ज्याची असा पराक्रमी पुरुष हा अर्थ होतो, त्या सु-सकाराला गुरुसंकोचानें म्हणजे मोठ्या संकोचानें ग्रासलें, त्या सु-सकराचा अत्यन्त लोप झाला. अर्थात् भीमसेन या नांवाचें भीम एन या नांवांत रूपान्तर झालें. भीम एन याचा अर्थ भीम म्हणजे भयंकर आहे एन ( पाप ) ज्याचें असा मोठा पापी मनुष्य हा अर्थ होतो. एवंच द्रौपदीचें रक्षण धर्माची भीड पडून न केल्यामुळें भीमसेन वास्तविक महापराक्रमी पुरुष असून आतां व्यवहारांत महापापी पुरुष ठरला. या आर्येचा अर्थ समजण्यास मोठे क्लेश होतात, म्हणून असल्या रचनेला क्लिष्ट म्हणतात. या रचनेंत अर्थ कमी, पांडित्य जास्त. परंतु असली रचना पंतांच्या काव्यांत फार क्वचित् प्रसंगीं आल्यामुळें चमत्कृतिजनक वाटते. असल्या नांवावरील कोटया सरळ असल्या तर आनंददायक होतात.उदाहरणार्थ पुढील श्लोकार्थ पहा:

भारें तो थकला गमेचि चढतां
सह्याद्रिचा उत्तट ॥
टाकी यास्तव भट्टशब्दगत
ट–द्वंद्वातुनी एक ट ॥ १८ ॥

(राजकवि थोरले बापूसाहेब कुरुंदवाडकरकृत भट्टवंश काव्य ) बाळाजी विश्वनाथ हा मूळचा भट्ट (म्हणजे विद्वान् ब्राह्मण ) तो कोंकण सोडून देशावर येण्याकरितां घाट चढूं लागतांच त्याच्या भट्ट या उपनावांतील ट्ट हें जोडाक्षर त्याला जड झाल्यामुळें त्यांतील एक ट त्यांनीं गाळला म्हणजे तो भट्ट होता तो भट ( वीर ) झाला.

द्रौपदीचा पुढील छळ पाहून अर्जुन युगाग्नीप्रमाणें संतप्त झाला. त्याचें धर्मानें सांत्वन केलें. पण धृतराष्ट्रगृहांत उत्पात झाले; त्यांना भिऊन धृतराष्ट्रानें द्रौपदीची स्तुति केली व तिला वर माग. असें तो म्हणाला:

सुमति म्हणे जरि देतां वर वचनें
स्तवुनियांहि मामाजी

धर्म अदास असो हा वरपट द्या आजि ।
या हिमा माजी ॥ ३९ ॥ (अ. ६)

दुसऱ्या चरणांतील रूपक नवीन आहे. दास्यरूप हिमापासून संरक्षण करणाऱ्या वराला पट म्हटलें आहे. याची समर्पकता १९३१ व ३३–३४ या सालच्या थंडीचा ज्यांना अनुभव आला असेल त्यांना पटेल.

धृतराष्ट्रानें द्रौपदीला वर दिले व पाण्डवांना दास्यत्वांतून सोडविलें. धृतराष्ट्राच्या अनुज्ञेनें पाण्डव शक्रप्रस्थाला गेले.

आणखी या गोष्टीचा प्रतिकार म्हणून दुःशासनानें असें सुचविलें कीं, आपण पुन्हा द्यूत खेळून पाण्डवांना बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावयास लावूं. तेराव्या वर्षी ज्ञात झाल्यास पुन्हा वनवास असा क्रम चालता ठेवूं. मध्यंतरीं द्यूतांत जिंकलेल्या द्रव्यानें समस्त नृप आपलेसे करून घेऊं व पाण्डव जर या त्रयोदश वार्षिक व्यसनांतून तरले तर त्यांना खावूं. याच्या समर्थनार्थ पंतांनीं पदरची एक आर्या घातली आहे.

व्यसनीं सरन्ध्रहि उरे, जोंवरि राहे
धरूनि तळ उगला ।
भक्ष्यचि इतर सुवृत्तहि वटक कटाहीं
तरोनि जो फुगला ॥ ७९ ॥

सरंध्र ( भोंक पाडलेला ) वडा जोंपर्यंत तळाशीं उगा असतो, तोंपर्यंत तो उरतो. तसे पाण्डव सरन्ध्र ( त्रयोदश वार्षिक ) व्यसनांत तळ धरून ( स्वस्थ असतील ) तोंपर्यंत ते उरतील (सुरक्षितपणें वांचतील.) पण जर तो सुवृत्त ( वाटोळा ) वडा फुगून कढईंत वर आला तर जसा खाण्यांत येतो, तसे पाण्डव सुवृत्त (चांगल्या वर्तनाचे) असले तरी फुगून वर आले म्हणजे तेरा वर्षांनीं आम्हांला दृश्य झाले तर ते आमचें भक्ष्य झालेच समजा. ही आर्या फार चवदार आहे.

या डावाप्रमाणें पाण्डवांस वनवासांत पाठविण्यांत आलें, तेव्हां त्यांस विदुरानें उपदेश केला त्याविषयीं पंत म्हणतातः

कथिली विदुरें सन्मति जाणों दिधली
तयां शिदोरी ती ।
कीं व्यसनकूपपतितां अनुपायज्ञां
तयांशि दोरी ती ॥ ३८॥ (अ. ७).

येथें उत्प्रेक्षा अलंकार साधला आहे. ही शिदोरीची कल्पना पंतांची स्वतःची आहे. आणि पाण्डव लांबच्या प्रवासाला निघाले असल्यामुळें ती जास्तच खुलत आहे.

या प्रसंगीं कुन्तीनें पुष्कळ शोक केला.

विदुर तिला समजावुनि नेउनि सदनीं
म्हणे नकोचि रडों ।
जननि उगी धीर धरीं, या चिन्तागिरि--
भरें नको चिरडों ॥५४॥

या आर्येत पंतांचें आवडतें यमक आहे.

शेवटीं पाण्डव आपापला अभिप्राय व्यक्त करून वनवासांत निघून गेल्यावर संजयानें एक सिद्धान्त धृतराष्ट्राला सांगितला, तो पंतांनीं घेतला नाहीं.

न कालो दण्डमुद्यम्य शिरः
कृन्तति कस्यचित् ।
कालस्य बलमेतावत्
विपरीतार्थदर्शनम् ॥११॥
( महाभारत स. अ. ८१ )

( अर्थ ) काल हा आपण होऊन तरवार उपसून कोणाचें शिर कापीत नाहीं. जो अर्थ असतो, तो बुद्धिला अनर्थ वाटतो व जो अनर्थ असतो तो अर्थ वाटतो. या विपरीत बुद्धिमध्येंच काय तें काळाचें बळ सांठविलेलें आहे. पण बुद्धि जर कलुषित होणार नाहीं, तर काळ कांहीं करूं शकणार नाहीं.

सभापर्वांतील आर्या मोरोपंतांच्याही मतानें चांगल्या उतरल्या. त्याचें श्रेय श्रीगुरूला देऊन पंत म्हणतात.

भक्त मयूरकरें हें श्रीगुरुनें
लिहविलें सभापर्व ।
कीं आर्यानन्दाचें, रसिकांची
नित्य हो सभा पर्व ॥ ९२ ॥

पंतांच्या भक्तानें करून ठेवलेल्या सभापर्वाच्या हस्तलिखित प्रतींत दोन आर्या काव्यसंग्रहकारांस आढळल्या. त्यांतील एक अशी आहे:

कृति मोरेश्वरकविकृत लिहुनि
सभापर्व ठेविलें धामीं ।
वाचावें रसिकांनीं कीं वाचावें
तसेंचि बहुधा मीं ॥

हें सभापर्व पुन्हा पुन्हा वाचण्यासारखें आहे यांत संशय नाहीं.

## वनपर्व

पाण्डव वनांत गेल्यावर त्यांचा वध करण्याकरितां दुर्योधन निघाला असतां व्यास प्रकट होऊन म्हणाले, " पाण्डवाशीं स्नेह करा. "

तूं, पाण्डु, विदुर मज सम; परि
माझा पाण्डवांकडे ओढा ।
निम्नाकडेचि धांवे नाटोपे जेविं
अद्रिचा ओढा ॥ ६१ ॥
( व. अ. १ )

ही आर्या अमर झाली आहे. दुसरी ओळ नवीन आहे. यमक साधण्यास घातली आहे. पंतांचा ओढा यमकांकडे आहे तसा अर्थाकडेही आहे. आर्येंत आणलेल्या यमकांची अपेक्षा न धरतां जर अर्थ चांगला साधला, तर तो यमकामुळें कमी प्रतीचा कसा ठरेल ? उलट यमकाच्या नकशीनें तो अधिकच खुलेल.

वरील आर्या ही अशा अर्थाचें चित्र आहे.

यादृशोमे सुतः पाण्डुस्तादृशो
मेऽसि पुत्रक॥ २० ॥
(म. व. प. अ. ९ )

या मूळ महाभारताच्या ओळीचें भाषांतर पंत वरील आर्येच्या पहिल्या चरणांत करून बसले. यमक साधण्यास "ओढा" हा शब्द दुसऱ्या चरणाच्या शेवटीं स्थापिला पाहिजे. तसा तो स्थापून ओढयांत आढळून येणारा निम्न (उतरडया) जागेकडे न आटोपतां धांवण्याचा जो स्वाभाविक गुण, तो मनांत घेऊन दुसऱ्या चरणांत पंतानीं सुन्दर दृष्टांत योजला आहे. त्याला सर्व कारण त्यांची यमकांची हौस हेंच झालें आहे. यमकाच्या हौसेमुळें सुंदर कविकल्पनांनीं सुशोभित अशा पंतांच्या आर्या विपुल आहेत.

धृतराष्ट्र व्यासांना म्हणाला, " शम करावा असें आपल्या मनांत आहे,तर आपल्या नातुण्डाला (दुर्योधनाला) आपणच उपदेश करावा. " तेव्हां व्यासांच्या तोंडीं पंतांनीं नवीन अर्थाची आर्या घातली आहे.

व्यास म्हणे पाजी घन वन, खग
असतो करोनि आ जों बा ।
बापाशीं बाप न म्हणे ऐशाला
काय होय आजोबा ॥६५॥

या आर्येचा दुसरा चरण अमर झाला आहे. त्यांत कैमुतिक न्यायानें अर्थापत्ति अलंकार साधला आहे.

वनवासांत पाण्डव गेल्यावर श्रीकृष्ण त्यांस भेटावयास गेला. तेव्हां द्रौपदीनें आपलें शोककारक वृत्त त्याला सांगितलें.

श्रीकृष्णा, श्रीकृष्णा दावुनि
खळपाणिकृष्ट केश वदे
उक्तिकडे मन दे परि नयन तदास्या-
कडे न केशव दे ॥१३॥ (व. अ. २)

या आर्येंत यमक व उत्तम अर्थ पंतांनीं साधला आहे. वनवासांतील या प्रथम भेटीच्या प्रसंगीं द्रौपदीला सभेंतील वृत्तान्त आठवून तिच्या मनांत क्रोध व विषाद उद्भवले व ती तो वृत्तान्त कृष्णाला सांगूं लागली. तेव्हां पंत म्हणतात,तिच्या गोष्टीकडे कृष्णानें आपलें मन लावलें; पण तिच्या वदनाकडे नयन

लावले नाहींत. खरें आहे. तिच्या तोंडाकडे त्याच्यानें पाहवेनाच. हें शब्दचित्र पटावर उतरून कुशल चितारी प्रसिद्धीला येईल.

महाभारत वन पर्व अ. २७ यांत भीमादि समीप बसले असतां, कौरवांच्या अपराधांचें स्मरण देऊन परितप्त झालेल्या द्रौपदीनें धर्माला उद्देशून सविषाद असें भाषण केलें आहे. तें फार ओजस्वी आहे. पुढील श्लोक त्यांतील एक आहे.

यदपश्यं सभायां त्वां राजभिः परिवारितम् ।
तच्च राजन्नपश्यन्त्याः का शान्ति-
र्हृदयस्य मे ? ॥ १२ ॥

हे राजन् ज्या मी तुला सभेमध्यें राजे लोकांनीं परिवृत असा पाहिला त्या मीं आतां तूं तसा नाहींस असें पाहून माझ्या हृदयाची शान्ति कशी होईल ?

याप्रमाणेंच दुसऱ्या प्रत्येक पाण्डवाची पहिली सुस्थिति व आतांची दुःस्थिति, श्लोकाच्या पहिल्या तीन चरणांत वर्णन करून चवथ्या चरणांत कस्मान्‌ राजन्नकुप्यसि ?, कस्मात् मन्युर्नवर्धते, कस्मात् क्षमसि पार्थिव ! ( त्याचा हे राजा, तुला राग कां येत नाहीं ? राग, वृद्धि कां पावत नाहीं ? राजन् याची तूं क्षमा कां करतोस ? ) इत्यादि सुन्दर शब्द-योजना करून योग्य काळीं क्षत्रियानें तेज दाखवावें व क्षमाही दाखवावी असें म्हणून द्रौपदीनें आपलें भाषण ज्याला इंग्रजींत curtain lecture म्हणतां येईल, तें संपविलें आहे. याच्याइतकें उत्तम शय्या-गारांतील पत्नीचें पतीला संबोधून केलेलें भाषण जगताच्या साऱ्या सारस्वतांत सांपडणार नाहीं. हें भाषण वाचून वाचकाच्या वृत्ति क्षणभर तटस्थ होऊन पोथी मिटून स्वस्थ बसावें असें वाटत. कारण उत्कृष्ट काव्यानन्दाची सीमा आपण पाहिली. पुढें लागलेंच वाचणें म्हणजे आनंदगिरीच्या शिखरा-वरून स्वतःचा खोल दरींत कडेलोट करून घेण्या-सारखें आहे. या श्लोकांच्या आधारावर अर्थगौरवा-विषयीं प्रसिद्ध असलेल्या भारवि कवीनें " किरात" नामक काव्यांत कांहीं असेच श्लोक घातले आहेत ते वाचावे व वनपर्व अ. २ आर्या ४२.ते ५२ वाचाव्या, म्हणजे भारवि कवीचें अर्थगौरव . पंतांना कसें साधलें आहे तें समजेल. येथें मासल्याकरितां पंतांच्या दोन आर्या घेतल्या आहेत.

येऊं द्या कोप मनीं एकिकडे
संप्रति क्षमा राहो ।
कां गोष्पदांत बुडतां ? यश रक्षा
खळ विपक्ष मारा हो ॥ ५१ ॥
क्रोध असावा समयीं केवळ
वश चित्त न क्षमेला हो ।
कोप त्यजितां जरि जमदग्नि
धनुर्वेददक्ष मेला हो ॥ ५२ ॥

यांतील ५१ व ५२ या आर्या (महाभारत अ. २७) याला धरून आहेत. सर्व आर्यांत यमक साधलें आहे. क्षमेचें अवलंबन म्हणजे गोष्पदांत बुडणें अथवा धनुर्वेददक्ष जमदग्नीनें कोपाचा त्याग करून मरणें होय. हे दृष्टांत नवीनच आहेत मूळ महाभार-तांतील द्रौपदीचें भाषण तत्संबंधीं मोरोपंतांच्या आर्या व भारवि कवीचे श्लोक वाचले म्हणजे प्रामा-णिकपणें शब्दाला शब्द घालून आहे तसें भाषांतर करावें किंवा तोच अर्थ निराळ्या शब्दांत ठाक-ठीकपणें भारवीप्रमाणें आणावा किंवा मोरोपंतांनीं सालंकार भाषांतर केलें आहे तसें करावें हे प्रश्न सुटतील.

तर द्रौपदीला अजातशत्रूनें (धर्मराजानें) क्षमेचा महिमा वर्णन केला. तो ऐकून त्याला भीम म्हणाला

ज्यांसीं जैसें त्यांशीं तैसें जरि
वर्ततासि तरि अरिते
हरिते कां सर्वस्व ? व्यसनीं आम्हांसि
मग्न कां करिते ? ॥६०॥
न क्षत्रिय तूं साधु ब्राह्मण
आम्नाय पढविता पढता ।
मानधन क्षत्रिय या व्यसनें ज्वलनें
कटाहसा कढता ! ॥६१॥

राज्योपद्रव गेला, झाला अभिलषित
लाभ अजिनाचा !
परमोत्सवीं उगे कां ? अजि गा !
उडवा स्ववल्क अजि नाचा ॥६२॥
देतील राज्य न सुखें, धरिजे
कितवोक्तिचा न विश्वास
काळाचाहि भरंवसा नाहीं जो
नित्य खाय विश्वास ॥६६॥
भणगापरि न वस वनीं म्हण गा बापा !
मनुष्यदेवा ! हूं !
दे बाहूंस यश रणीं खळखळ खळरक्त
—पूर दे वाहूं ॥७४॥

वनपर्व अध्याय ३३ व ३५ यांतील १२५ श्लोकांचें सार पंतांनीं आपल्या शब्दांत फक्त १७ आर्यांत दिलें आहे. त्यांतील ५ च वर घेतल्या आहेत. त्या एखाद्या जालीम वनस्पतीच्या अर्काप्रमाणें तीव्र आहेत. सर्वांत अन्त्य यमकें व शेवटलींत दाम-यमक साधलें आहे. तसें शेवटच्या आर्येंत ध्वनीचें अनुकरण करणारे खळ खळ शब्द आहेत. पंतांची प्रतिभा तापली म्हणजे त्यांची वाणी किती ओजस्वी होते तें या आर्यांवरून कळून येतें.

इंद्राकडे अस्त्रविद्या शिकण्याकरतां अर्जुन वसत असतां एक दिवस त्याची दृष्टि ऊर्वशीकडे वळली. ती सानुराग आहे असें वाटून इंद्रानें तिला अर्जुनाकडे जाण्याची आज्ञा केली. त्याप्रसंगींच्या तिच्या वेषभूषादिकांचें केंसांपासून पायांपर्यंतचें वर्णन करतांना व्यासानीं बारा श्लोक खर्ची घातले आहेत. त्यांची वास्तपूस पंतांनीं एका आर्येच्या अर्धानें लाविली आहे; ती अशीः

जीच्या सुरस वपुपुढें खालें वदनासि
अमृतसर घाली ॥५६॥ (व. अ. ३)

हें संक्षिप्त वर्णन पृष्ठ १६ येथें केलेल्या द्रौपदीच्या वर्णनाप्रमाणें सरस नाहीं. त्यामुळें

शशिनं वक्त्रचन्द्रेण साह्वयन्तीव गच्छति ॥७॥
( म. व. अ. ४६ )

(स्पर्धेनें आकाशांतील चन्द्राला आपल्या मुखचन्द्रानें युद्धाला आह्वानच देत ती चालत आहे.) इ० व्यासांनीं केलेल्या सरस वर्णनाचा लाभ वाचकांना झाला नाहीं.

दमयन्तीजवळ नळाच्या गुणांचें वर्णन करतांना हंस म्हणतोः

नररत्न तोचि, तूंचि स्त्रीरत्न
उदण्ड आडनांवाचीं !।
न बुडविति नवा तारिति चित्रें
बरवीं हि आडनावांचीं ॥३५॥
( व. अ. ४)

या आर्येतील पहिल्या हंसोक्तीचा चरण मुळाबरहुकूम आहे. त्याचें स्पष्टीकरण आपल्या शब्दांत पंतांनीं उत्तम दाखला देऊन केलें आहे. हंस म्हणतो, तुम्हीं उभयतां ( नल व दमयन्ती ) खरोखर गुणामुळें रत्न या संज्ञेस पात्र आहांत; नाहीं तर नुसतीं नांवाचीं रत्नें अनेक असतात. तीं विहीर आणि नांव ( नौका ) यांच्या चित्राप्रमाणें अनुक्रमें कोणास बुडवीत नाहींत किंवा तारीत नाहीं. येथें यथासंख्य अलंकार साधला आहे. ही आर्या अमर झाली आहे.

नल व दमयन्ती या जोडप्याच्या पादतलांच्या मार्दवाचें वर्णन पंतांनीं स्वतःच्या कल्पनेनें एकाच चरणांत केलें आहे. त्यांतील अतिशयोक्ति उदात्त आहे.

यत्पादतल मृदुत्वें लाजावें
कामधेनुनवनीतें ॥ १०५ ॥

सुवर्णसदृश पक्षी पाहून हे भक्ष्य आहेत असें समजून त्यांना पकडण्याकरतां नेसलेलें वस्त्र नलानें त्यांवर टाकलें. तें घेऊन पक्षी पळाले व पळतां पळतां म्हणाले “ अरे ! तुझें सर्वस्व हरण करणारे अक्ष, आतां वस्त्रहर झालों. त्या वेळची नळाच्या मनाची स्थिति पंतांनीं फार उत्तम रीतीनें वर्णिली आहे.

वनदेवता न पाहों सकती
लज्जानता नलास्याला ।
करिति न रोमन्थाला हरिण,
मयूरहि तदा न लास्याला ॥ १०८ ॥

येथें नळाच्या लज्जेचा हरिणांनीं रोमन्थ न करणें व मोरांनीं नाच न करणें या दोन असंबंधी गोष्टींशीं कवीनें संबंध जोडून अतिशयोक्ति अलंकार आणला आहे.

दमयन्तीला नळ म्हणाला "हा विदर्भ देशाचा रस्ता !" हें ऐकून पतीच्या मनांत मी माहेरीं जावें असें आहे, हें जाणून ती सती बाष्पाकुळ होऊन म्हणाली 'हृतराज्य, हृतद्रव्य, हृतवस्त्र व क्षुधार्त अशा पतीला वनांत टाकून मी कशी जाऊं ? जवळ असतां मी तुमच्या श्रमाचा परिहार करीन.' ह्या पतिनिष्ठपणाचें वर्णन करणारा मूळांतला दमयन्तीच्या तोंडचा श्लोक पंतांनीं गाळला आहे, तो असा

नच भार्यासमं किंचिद् विद्यते भिषजां मतम् ।
औषधं सर्वदुःखेषु सत्यमेतद् ब्रवीमि ते ॥२९॥
( महा. व. प. अ. ६१ )

(अर्थ–मी तुम्हांला खरेंच सांगतें भार्येप्रमाणें वैद्यांच्या मतें दुसरें किंचित्ही सर्व दुःखांवर औषध नाहीं. )

श्रान्त झालेली दमयन्ती धर्मशाळेंत सुप्त झाली असतां तिला सोडून जाण्याचें नळानें ठरविलें. आपली तनु झांकणारें अर्ध वस्त्र हातानें फाडावें तर दमयंती जागी होईल म्हणून नळ शस्त्र शोधूं लागला. कलीनें खड्ग पुरविला. तो घेऊन त्यानें वस्त्र मधोमध चिरलें. पंत म्हणतात––

कलियोगें जें धरिलें रायें तीक्ष्णत्व कापितां वस्त्रा ।
न धरील कधींहि तसें शाणशितें गरळ–
लेपनें वस्त्रा ॥११५॥
खड्गें पट कापविला न तिचा अर्धा गळाचि
तो कलिनें ॥ ११६ ॥

कलीच्या संगतीनें कलीचा गुण जो कठोरपणा तो नळानें वस्त्र कापतां धरिला.

या अर्थानें ११५ व्या आर्येच्या पहिल्या चरणांत तद्गुण अलंकार आला आहे. दुसऱ्या चरणांत नळाचा कठोरपणा सहाणेवर पाजळलेल्या व विषानें लिप्त केलेल्या क्षुरीच्या शस्त्रापेक्षांही अधिक दाखविला आहे; कारण गरळाचा गुण क्षुरीच्या शस्त्रानेंही घेतला नाहीं. येथें अतद्गुणमिश्रित व्यतिरेक अलंकार साधला आहे. ११६ व्या आर्येंत अपन्हुति अलंकार फार सुंदर अर्थ देत आहे. पंत म्हणतात, कलीनें तिचा अर्धा पट कापविला नाहीं, अर्धा गळाच कापविला. पंतांची काव्यशक्ति या नलाख्यानांत फार उज्ज्वल झालेली आहे. दमयंतीचा त्याग करून नलाच्या गमनाचें वर्णन त्यांनीं फार बहारीचें केलें आहे तें असें

जाय पुन्हा नळ परते, पाहे येउनि तिच्या
मुखाला हो ।
साश्रु नळ म्हणे, देवा ! हे वामाक्षी सती सुखा
लाहो ॥ ११७ ॥
जाय पुढें ये मागें ! परतोनि सवेंचि जेंवि दोला हो ।
ता लाहो भेटीचा घे कीं, न पुढें स्वदृष्टि लोला
हो ॥ ११८ ॥
विश्वंभरे ! क्षमे ! या साध्वीला रक्ष, म्यां निर-
विली हो ।
सर्वसहे तुजपुढें न स्वाधिकता इणे मिरविली हो
॥ ११९ ॥
बापा ! सतीव्रता हे ! तुज बहु जपली, न जीवि-
तासि सती ।
तूंहि हिला बहु जप गा ! त्वां त्यजिल्या न स्त्रिया
बऱ्या दिसती ॥ १२० ॥
कलि दमयन्तीप्रेमा, हे दोघे ओढिती नळाला हो !
प्रेम्याला त्याचें मन सांपडलें, देह त्या खळाला हो !
॥ १२१ ॥

सत्याश्रित गुणमय शुचि कापुनि घे, परि न देचि हांक पट ।
पुण्यश्लोकीं राहुनि उघडिल त्याचेंचि केवि हा कपट ॥ १२२ ॥

यांत एकदां जाऊन पुन्हा दोल्याप्रमाणें परत फिरणें, देवतांच्या स्वाधीन दमयंतीला करणें, कलि व दमयंतीप्रेम या दोहोंनीं नलाचें द्विधाकर्षण, इत्यादि प्रकार मूळांत आहेत तसे पंतांनीं चांगल्या प्रकारें वठविले आहेत. एवढेंच नाहीं, तर कांहीं स्थलीं आपला सरसपणा पंतांनीं दाखविला आहे. मूळांत नलानें दमयन्तीला आदित्य, वसु, रुद्र, मरुद्गण यांच्या स्वाधीन केली आहे. या सर्वांना छाट देऊन यांच्या ठिकाणीं क्षमेला ( पृथ्वीला ) स्थापून पंत म्हणतात, " विश्वंभरे ! क्षमे ! तुझ्या स्वाधीन मीं हिला केली आहे, कारण तुम्हीं दोघी शीलानें सम आहांत. क्षमा हा तुझा गुण, पण तो दमयन्तीच्या अंगांत अधिक असून तुझ्यापुढें तिनें कधीं त्याचें प्रदर्शन केलें नाहीं. पर्यायानें ही तुझ्याहून थोर आहे." नंतर प्रत्यक्ष पातिव्रत्याच्या स्वाधीन तिला पंतांनींच केली आहे. शेवटली आर्या ही पंतांची पदरची आहे. त्यांत श्लेषमूलक तद्गुण अलंकार साधून सुंदर अर्थ आणला आहे तो असा: हा पट (एका अर्थी सत्याश्रित म्हणजे सतीच्या आश्रयास असलेला, गुणमय म्हणजे बहुगुणी, शुचि म्हणजे पवित्र असा व ( दुसऱ्या अर्थी सत्याश्रित म्हणजे सत्याच्या आश्रयास असलेला, गुणमय म्हणजे सूत्रमय, शुचि म्हणजे स्वच्छ असा ) आपणांस स्वतः कापून घेता झाला; कारण पुण्यश्लोक नळाचा सहवास घडल्यावर कापलें जातांना आवाज केल्यानें दमयन्ती जागी होईल या भीतीनें तो त्याचेंच कपट उघडें कसें करील ? या आर्यांत करुण रसाचा उदय होऊन जसा परिपोष झाला आहे, तसा क्वचितच आढळतो. नळानें त्याग केल्यावर दमयन्तीच्या मनाची झालेली स्थिति व्यासांनीं पंचवीस श्लोकांत वर्णिली आहे. ती पंतांनीं चार आर्यांत वर्णिली आहे. यामुळें तिच्या भ्रमिष्टपणाचें उत्तम वर्णन करणारे कांहीं श्लोक पंतांनीं सोडिले आहेत. त्यांतील एक असा आहे.

दृश्यसे दृश्यसे राजन्नेषदृष्टोऽसि नैषध ॥
आवार्य गुल्मैरात्मानं किं मां न प्रतिभाषसे ॥९॥
( म. व. अ. ६३ )

अर्थः—'तूं दिसतोस दिसतोस ! हे राजन् ! हा पाहा दिसलास ! हे नैषधा ! झुडपाच्या आड लपून मला प्रत्युत्तर कां देत नाहींस ?' पुढें दमयन्ती रानावनांत हिंडून पशुवृक्षादिकांना नळाचें वृत्त विचारीत सुटली. ती व्याघ्राला म्हणते

आश्वासय मृगेन्द्रेह यदिदृष्टस्त्वया नलः ॥३४॥
* * *
मां खादय मृगश्रेष्ठ दुःखादस्माद् विमोचय ॥३५॥
( म. व. अ. ६४ )

(अर्थ) नळाला पाहिलें असलेंस तर हे मृगेन्द्रा ! मला त्याचें वृत्त सांगून धीर दे, नाहीं तर मला खा व या दुःखांतून सोडव तरी !

ती अशोक वृक्षाला म्हणते

सत्यनामा भवाशोकः अशोकः शोकनाशनः १०७
(म. व. अ. ६४)

अशोक वृक्ष हा शोकाचा नाश करतो तसा माझ्या शोकाचा नाश करून तूं आपलें नांव खरें करून दाखव.

या अध्यायाची वाट पंतांनीं एका आर्येनें लाविली असल्यामुळें वाचकांनीं हा अध्याय मुळावरून वाचावा.

दमयन्तीची व नळाची तिच्या माहेरीं पुन्हा भेट झाली, तेव्हां ती नळाला म्हणाली,

पायीं भ्रमली, श्रमली, निजली,
भिजली निजाश्रुनीं रानीं ॥
धार्मिक न पाहिला तो
जो जाय असीस टाकुनी रानीं ॥२७४॥
( व. अ. ४ )

पहिल्या चरणांत छेकानुप्रास व कारक दीपक हे अलंकार आहेत.

धौम्यमुखानें तीर्थयात्राफलश्रवण करून धर्म तीर्थयात्रा करीत निघाला. गंधमादन पर्वतावर चढत असतां द्रौपदीला मूर्च्छा आली तेव्हां तिला वाहून नेण्याकरितां धर्मानुज्ञेनें घटोत्कचाला आणावा असें तेथें ठरलें. पित्यानें त्याचें स्मरण केलें मात्र, तों तो हात जोडून हजर राहिला. ही साध्या शब्दांत असलेली मूळांतील अतिशयोक्ति पंतांनीं अधिक रंगविली आहे ती अशी—

धर्मानुमतें स्मरतां, ग्याया गुरुदास्यपुण्य जनकानें ।
ऐके घरीं 'घ' 'टोत्कच'नमनीं तो सत्य पुण्य-
जन कानें ॥ २६ ॥
( व. अ. ५ )

घटोत्कच हा शब्द भीम मनांत स्मरत असतां घटोत्कचानें त्यांतील घ हें अक्षर घरीं ऐकलें व 'टोत्कच' हीं उरलेलीं अक्षरें त्या पुण्यजनें (राक्षसानें भीमपुत्र घटोत्कचानें ) तेथें जाऊन भीमास नमन करीत असतां कानानें ऐकिलीं.

अर्जुनाच्या परत येण्याची वाट पाहत पाण्डव नारायणाश्रमांत राहिले असतां जटासुरवध प्रकरण उद्भवलें. तें पंतांनीं अगदीं संक्षेपानें वर्णिलें आहे. पतांनीं वगळलेला पुढील व्यासकृत उत्कृष्ट श्लोक वाचण्यासारखा म्हणून दिला आहे.

बडिशोऽयं त्वयाग्रस्तः कालसूत्रेण लंबितः ।
मत्स्योम्भसीव सूतास्यः कथमद्य भविष्यसि ॥४५॥
( म. व. अ. १५७ )

( भावार्थ ) भीम म्हणाला, 'काळरूप दोरीनें लोंबणारा ( द्रौपदीरूप ) गळ तूं गिळल्यामुळें पाण्यांतील गळ गिळणाऱ्या मत्स्याची, घसा फाटून जशी अवस्था होते, तशी तुझी झाली आहे. आतां तुझें कसें होईल ?'

पुढें " मार्कण्डेयमुनींनीं पाण्डवांस ब्राह्मण-माहात्म्य व क्षत्रियमाहात्म्य सांगितलें" असा निर्देश पंतांनीं आर्येच्या एका चरणांत केला व सुमारें वीस अध्यायांना छाट दिला आहे. त्यांत ब्राह्मण श्रेष्ठ का क्षत्रिय श्रेष्ठ या कदाचित् त्या वेळीं माजलेल्या सामाजिक वादाचा निर्णय सनत्कुमारांनीं एका श्लोकांत दिला आहे, तो महत्त्वाचा म्हणून दिला आहे.

ब्रह्म क्षत्रेण सहितं क्षत्रंच ब्रह्मणा सह ॥
संयुक्तौ दहतः शत्रून् वनानीवाग्निमारुतौ ॥२५॥
( महा. व. अ. १८५ )

( भावार्थ.) ब्राह्मणाचा क्षत्रियाशीं व क्षत्रियाचा ब्राह्मणाशीं संयोग झाला म्हणजे शत्रूंना ते जाळून टाकतात, जसे अग्नि व वारा यांचा संयोग झाला असतां ते वनेंच्या वनें जाळतात.

मूळ महाभारतांत याच पर्वाच्या १८७ व्या अध्यायांत जलप्रलयाची गोष्ट आहे. तींत एका मत्स्यानें भावि प्रळयाचें भविष्य कथन करून मनूकरवीं एक नौका तयार करविली. तींत सर्व सृष्टीचीं बीजें घालविलीं व प्रलयापासून सर्व सृष्टीचें रक्षण त्या मत्स्यानें केलें तें वृत्त पंतांनीं दिलें असतें,तर हल्लींच्या संशोधक लोकदृष्टीनें उपयोगी ठरलें असतें. बायबलांतील जलप्रयाच्या गोष्टींत व तींत फार साम्य आहे.

एकदां पांडव द्रौपदी व सत्यभामा एका ठिकाणीं बसून गोष्टी सांगत एकमेक हंसत व एकमेकांस हसवीत बसलीं असतां सत्यभामेचा व द्रौपदीचा संवाद झाला तो मजेचा आहे.

सत्या कृष्णेसि म्हणे वदल्यें तें तूं खरेंच मान सये ।
लोक म्हणोत, परि पळहि माझ्या हातीं न कान्त-
मानस ये ॥ ५७ ॥
त्वां हे पांच पति कसे वश केले ! भजति सर्व एकी तें ।
थोडें याहुनि पाहुनि, नटती कादंबिनीस केकी तें
॥ ५८ ॥ (व. अ. ६)

भामा म्हणाली,"लोक कांहीं का म्हणत ना ! मी सांगतें तें तूं खरें मान. एक पळभर सुद्धां कृष्ण मला वश होत नाहीं मग तूं हे पांच पति 'मुखप्रेक्ष'

म्हणजे तुझ्या तोंडाकडे पाहत राहण्याइतके कसे वश करून ठेवलेस? त्यात तुझें तत्त्व काय आहे तें मला सांग. कांहीं तंत्रमंत्र, जेणेकरून कृष्ण मला वश होईल असे असतील तर सांग.''

द्रौपदीनें पाण्डवांना व्यासोक्तीप्रमाणें ''मुखप्रेक्ष'' केलें म्हणजे काय हें पंतांनीं आपल्या पदरच्या दृष्टान्तानें ५८ व्या आर्येत फार सरस रीतीनें सांगितलें आहे.

कादंबिनीस म्हणजे मेघांच्या पंक्तीस पाहून केकींचें म्हणजे मोरांचें जें नाचणें तें द्रौपदीला पाहून झालेल्या आनन्दात पाण्डवांच्या नाचण्यापेक्षां थोडेंच! यात व्यतिरेक अलंकार चांगला साधला आहे.

द्रौपदीनें दिलेलें उत्तर वाचण्यासारखें आहे

कृष्णा हासोनि म्हणे भामे मोहावयासि पतिला जे।
मंत्राद्युपाय करणें या श्रवणें बहु मदीयमति लाजे॥६०
प्रेमें पतिचरणासि न देउनि दे हात तायिताला जे
ते स्त्री न रुचे पतिला की तीचें आततायिता लाजे॥
जाणें वशीकरण हें करिन्येंजेणें कधीं न कोपति ते।
सखि! तूंहि असेंचि करीं मदमत्सर दाखवूं नको पतितें॥ ६२॥

द्रौपदीला मंत्रतंत्र याचा मार्ग असदाचार वाटला व ती साहजिकच हसली व म्हणाली ''असला उपाय श्रवण करण्यासुद्धा मला लाज वाटते. पतीला वश करण्याकरिता नम्र होण्याचें टाकून मतरलेला ताईत मिळविण्यासाठी जी स्त्री झटते, ती पतीला रुचणार नाहीं. तिच्या या कृतीला प्रत्यक्ष आततायीपणाही लाजतो.'' असें सांगून द्रौपदी आपला साधा उपाय सांगते. द्रौपदी म्हणते ''होय, मला एकच वशीकरणाचा मार्ग ठाऊक आहे. त्यानें पतींना कोप कधींही येत नाहीं. त्याचें तूंही अवलंबन कर. पतीला मत्सर दाखवूं नकोस. मत्सर न दाखविणें याहून माझा दुसरा तिसरा मार्ग नाहीं. या आर्यातील माधुर्य अनुपम आहे.

नंतर आपल्या वैभवाचें प्रदर्शन करून पाण्डवांना वनवासातही दुःख देण्याकरिता किंवा त्यांची विपत्ति पाहून हृष्ट होण्याकरिता द्वैतवनांत जाण्याची मसलत शकुनीनें दुर्योधनाला सांगितली. धृतराष्ट्र तसें करण्यास परवानगी देईना. आमचे घोष (गाईंचे गोठे) तिकडे आहेत ते पाहावयास जातो, द्वैत वनांत जात नाहीं, अशी थाप मारून दुर्योधनानें परवानगी मिळविली. तेव्हां कौरवांनीं मोठया थाटांत तिकडे गमन केलें. याला घोषयात्रा म्हणतात. तिचें वर्णन करतांना पंत म्हणतात.

शिरला सदार सानुज, सशकुनि, सांगेश तो सकटक वनीं।
दुखवावया शिरे खळ जैसा निज दुर्गुणांसकट कवनीं॥१३॥
(व. अ. ७)

आर्येच्या पहिल्या चरणात वृत्त्यनुप्रास चांगला साधला आहे. दुर्योधनाची ही स्वारी जशी काय स्वतःच्या दुर्गुणाचें प्रदर्शन करीत एखाद्या कवीवर हल्ला करणाऱ्या टीकाकाराची स्वारीच होती. येथें उत्प्रेक्षा अलंकार आला आहे.

या आर्येत जाता जाता टीकाकारांना पंतांनीं आटयापाटयाच्या खेळातील सोंयदण्डकऱ्याप्रमाणें हातपोंचता मारा केला आहे. असो. वाटेतच गन्धर्वांनीं युद्धामध्यें कर्णाचा पराभव करून दुर्योधनाला सदार धरून नेलें ते वृत्त धर्माला कळविण्यास दुर्योधनाचे अमात्य आले. भीमानें आनंद प्रदर्शित केला, तेव्हां धर्म म्हणाला.

न सहावा अन्यकृत ज्ञातिपराभव बुधें उठा, रचितो।
जन्मुनि सुयशासि न जो, जननीं यौवनवनीं कुठार- चि तो॥ ३५॥ व. अ. ७

(भावार्थ) ज्ञातीच्या बाहेरील अशा अन्यानें (दुसऱ्या कोणी मनुष्यानें) केलेला पराभव कोणाही बुधें (सुज्ञ ज्ञातिबांधवानें) सहन करूं नये. तुम्ही उठा व दुर्योधनाला सोडवा. जन्मास येऊन असें बाह्य शत्रूपासून ज्ञातिबान्धवाचें मोचन करून जो यश रचित नाहीं, तो जननीच्या यौवनरूपी वनाला तोडण्यास कुठारच झाला असें समजा.

ही आर्या रूपक अलंकारानें व यमकानें भूषित असूनही निर्यमक व अनलंकृत अशा व्यासकृत मूळ श्लोकांप्रमाणें गोड लागत नाही.

भवन्ति भेदा ज्ञातीना कलहाश्च वृकोदर ।
प्रसक्तानिच वैराणि कुलधर्मो न नश्यति ॥ २ ॥

**पृष्ठ २८ पुढील आंकडा २९ न पडतां ३७ पडला आहे मजकूर बरोबर आहे.**

बाहेरील मनुष्यानें आपल्या कुलाला झगडण्यास आह्वान दिलें तर सन्ताना ज्ञातीच्या बाहेरील मनुष्यानें आपल्यातील एकाचा केलेला पराभव सहन होत नाही.

ज्ञातिविषयक प्रश्नाचा उहापोह भीष्मानी शान्ति-पर्वात अध्याय ८० मध्यें धर्माशी केला आहे.त्यासंबंधे नीलकण्ठानें आपल्या टीकेत एक श्लोक दिला आहे, तो धर्मराजाचें वरील म्हणणें चागले स्पष्ट करून सांगत आहे. तो असा:

परस्परविरोधेहि वय पंच च ते शतम् ।
अन्यैः सह विरोधे तु वयं पञ्चोत्तर शतम् ॥

( भावार्थ )

होय विरोध परस्पर ते आम्ही एकशे पृथक् पाच।
हाय विरोध तिजाशी ते आम्ही युक्त एकशेपाच

( स्वकृत भाषातर )

धर्म म्हणतो, आम्ही कौरव-पाण्डव जेव्हा एक-मेकाविरुद्ध भाण्डतो, तेव्हा कौरव शंभर निराळे व त्याच्याशी भाण्डणारे आम्ही पाच पाण्डव निराळे.पण जेव्हा तिसरा ( या ठिकाणी गन्धर्वासारखा ) कौर-वाशी विरोध करील, तेव्हा आम्ही दोघे कौरव व पाण्डव मिळून एकशें पाच होऊन गन्धर्वापासून दुर्योधनाला मुक्त केलें पाहिजे.

पाण्डव वनवासात असता दुर्योधनाच्या याचने-वरून दुर्वास मुनि आपल्या शिष्याच्या ताड्यासकट द्रौपदीचेही जेवण झाल्यावर व पाण्डव सुखा-
म आले. मुनि अन्न न
द्रौपदीनें कृष्णाचा धांवा
ची आर्या अशी आहे.

करुनिया दया लुगड्या
ाय मज एक तू दयालु
। १७ ॥ ( व. अ. ८ )

त्वतः मुळाप्रमाणें आहे.

दुसरा पक्षाच्या कल्पनचा आहे. द्रौपदी धावा कर-ताना म्हणाली, "मागे लुगडे नेसविलेस, आता या ऋषीला ताड्यासह अन्न पुरवून माझे सत्त्व राख, म्हणजे मला चुडे भरण्याचें तुला श्रेय लागेल. लुगडे नेसविण्याच्या पुढची पायरी चुडे भरण्याची आहे. चुडे भरणें हे फार सौभाग्यदायक म्हणून सौभाग्य-वती स्त्रियाना फारच प्रिय. स्त्रियाच्या भावना पंताना फारच चागल्या कळत त्याचें हे एक उदाहरण आहे.

दुर्वास ऋषीला वाटेला लावल्यावर धर्माला श्रीकृष्ण भेटला,तेव्हा तो धर्माला म्हणाला धर्मनिष्ठांना भय नाही. माझे व माझ्या कुटुंबाचें तुमच्या विप-यांचे कर्तव्य असे आहे.

अनलसमीहित साधी राया! वाग महीवरा ! कामा !
अनलस मीहि तसा धीरा ! यावा रामही वरा का
मा ॥ ५० ॥

या आर्येतील यमक आहे ते आर्येच्या पहिल्या समग्र चरणाची पुनरावृत्ति होऊन साधलें आहे. याला समुद्गक म्हणतात. असें उदाहरण आर्याभार-तात एकच आहे. वरील आर्या जशी पदे पाडून लिहिली आहे, तशी घेऊन वाचल्यास अर्थ सरळ लागतो.

**कृष्ण म्हणतोः**– अनल म्हणजे अग्नि त्याचें समीहित म्हणजे इष्ट अशा कामा( कार्याला ) हे राया ! महीवरा ! ( नृपते ! ) जसें वारा साधी ( साधतो ) तसें अनलस म्हणजे आलस्यरहित असा मीहि हे धीरा ! धैर्यवन्ता ! तुझें कार्य साधतों. मग रामही ( बलराम सुद्धा ) यावा (त्यानें आलें पाहिजे;) असे आम्हीं दोघे खुद्द आल्यावर मा म्हणजे लक्ष्मी ही आमच्यापेक्षां वरा म्हणजे श्रेष्ठ का आहे ? नाहीं. मग तीही येईलच.कित्येक जण "वरा का मा ?" अशीं पदें न घेतां "वराका मा" अशीं पदें घेतात व अर्थ करतात की, आम्ही आल्यावर मा म्हणजे लक्ष्मी काय बिचारी केवळ "वराका" आहे म्हणजे तिला किंमत नाहीं; परंतु "वराका मा" अशीं पदें घेऊन लक्ष्मीला विनाकारण किंमत नाही असे ठरवावयास नको. स्त्रीचें पतिवशत्व तिला जाण्यास पुरेसें कारण आहे.

एकदां पाण्डव मृगयेकरितां वनात गेल्यावर जयद्रथानें द्रौपदी हरण करून नेली. तें मार्गात कळतांच भीमानें जयद्रथाचा वध करण्याचें योजिलें. तेव्हां धर्म म्हणाला,

न हन्तव्यो महाबाहो दुराऽऽत्मापि स सैन्धवः ।
दुःशलामभिसंस्मृत्य गान्धारीं च यशस्विनीम् ॥
॥ ४३ ॥ (म. व. अ. २७१ )

( भावार्थ ) जयद्रथाची स्त्री दुःशला (पाण्डवांची चुलत बहीण व गान्धारी यांकडे पाहून जयद्रथाचा वध करूं नकोस). या श्लोकाचा अर्थ ठाकठीक करून त्यावर पंतानी एक सुन्दर आर्या रचिली आहे व तींत सुन्दर यमकही साधले आहे.

धर्म म्हणे रे ! बा ! त्या निजभगिनीच्या न उग्र हो तिलकीं ।
नित्य सुता–सौभाग्य–क्षयशोकें पितर साश्रु होतिल कीं. ॥३८॥
( व. अ. ९)

धर्म म्हणतो "बा ! भीमा ! तूं आपल्या बहिणीचा जो सौभाग्यालंकार, कुंकुमाचा टिळा, त्यावर कोप करूं नकोस. करशील तर आपली सुता जी दुःशला, तिच्या सौभाग्याच्या नाशाच्या योगानें ( तिला वैधव्य प्राप्त झाल्यानें ) तिचे आईबाप शोकांत बुडतील." मुळांत जयद्रथवध स्पष्ट सांगितला असतां येथें तो नुसता ध्वनित केला आहे. ध्वनि हें उत्तम काव्याचें लक्षण आहे. पंतांच्या हातांत हिऱ्यासारखा चांगला अर्थ सांपडला कीं, त्यांनीं त्याला पैलू पाडून उज्ज्वल रूप आणलेंच म्हणून सामान्यतः समजावें. हें त्यांचें वैशिष्ट्य आहे.

युधिष्ठिराच्या प्रश्नावरून त्याच्यासारख्या आणखी दुसऱ्या दुःखी पुरुषाचें म्हणून श्रीरामाचें-चरित्र मार्कन्डेयांनीं सांगितलें.पित्याच्या आज्ञेनें राम वनवासाला निघाला. त्याच्याबरोबर सीताही गेली इतकेंच मुळात आहे. त्याविषयीं पतिव्रतेचा स्वभाव दर्शवणारी एक आर्या पंतांनी घातली आहे.

सीता म्हणे त्यजावी हे न, न चपलेसही वनद सोडी ।
यद्यपि झडती जड ती, आपण उबगे, पटासि न दसोडी ॥६९॥
( व. अ १० )

सीता म्हणतेः– चपलेस म्हणजे चल स्वभावाच्या-विजेलासुद्धां वनद ( घन ) सोडीत नाहीं. मला तुम्हीं सोडू नका. बरोबर त्या. जड ( अचेतन) अशी पटाची दसोडी ( दशी ) स्वतां झडत्ये, पण पटाला उबगत ( विसंबत ) नाहीं. मी तर काय, सचेतन असून दृढ स्वभावाची आहें.

रावणानें सीताहरण केलें. सीतेला शोधीत पंपा-सरोवराकडे जाऊन रामानें तेथें शोक केला. त्याचें वर्णन पंतांचे अगदीं नवीन आहे. त्या विषयींच्या सहा आर्यांपैकीं पुढील दोनच घेतल्या आहेत.

हा सीते ! जे स्वतुकचभारजितकलाप मोर हा सीते !
हा सीते ! नाचति मज पाहुनि मज समोर हा सीते !
॥ ७९ ॥

बहु लाजवीत होतों करिकेसरिकीरकेकिहरिणामीं
हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं! ८०
(व. अ. ११)

(भावार्थ) सीतेच्या मंदगतीवरून हत्तीला, सिंह-कटीवरून सिंहाला, सरळ नासिकेवरून पोपटाला, केशकलपावरून मोराला व चंचल नयनांवरून हरि-णाला, असा मी फार हसत होतों. (आर्या ८० ओळ एक.) येथें तुल्ययोगिता हा अलंकार साधला आहे. या आर्येच्या दुसऱ्या चरणांत लोकोक्ति नामक अलंकार आहे. हा चरण अमर झाला आहे; शिवाय ७९ व ८० या दोन आर्यांत एक वारंवार न येणारा प्रत्यनीक नामक अलंकार साधला आहे. फुलें घात-लेला सीतेचा केशकलाप हें उपमेय आहे व मोराचा चित्रित पिसारा हे उपमान आहे. राम म्हणतोः— मोराचा पिसारा सीतेच्या केशकलापाची बरोबरी करूं शकला नाही; म्हणून मोर मनांत सूड घेण्याची कल्पना धरून बसला होता. सीता होती तोपर्यंत तिच्यावर सूड घेतां आला नाहीच! पण आतां ती नाहीशी झाल्यावर तिचा संबधी जो मी त्यावर माझ्यापुढें तोऱ्यानें नाचून मला दुःख देऊन तो मोर सूड घेत आहे!

कांहीकाही धंद्यांतील माणसें समाजाला अवश्य असूनही त्यांच्या अंगांतील कांही गुणांनी जरा अधिक अप्रिय अथवा थट्टेचे विषय झालेली अशीं असतात; त्यांपैकीं वैद्य हा एक प्राणी आहे. मारुतीनें रामाची व सुग्रीवाची गांठ घालून दिली तींत वैद्यांविषयीं पंत म्हणतात.

रुग्णा धनिकासि जसा वित्तार्थी वैद्य, पवनजें कपिला।
भेटविला प्रभुतें; जसि चुकल्या वत्सासिं कामधुक् कपिला॥ ९५॥
(व. अ. ११.)

येथें रामाला रुग्ण धनिक म्हणून सुग्रीवाला वित्तार्थी वैद्य पंतानीं म्हटलें आहे. वैद्याची योजना मुळांत नाहीं.

वैद्याप्रमाणेंच भिक्षुकवर्ग साधारणपणें थट्टेचा विषय आहे. सीतेच्या शोधार्थ पूर्व, पश्चिम व उत्तर या दिशांनीं गेलेले वानर परत आले व म्हणाले आम्हीं सीता पाहिली नाहीं. पण (दक्षिणाशेनें) दक्षिण दिशेनें गेलेले वानर अद्यापि परत यावयाचे होते तेव्हां रामाच्या भाषणांत त्याच्या मुखीं आशाळ-भूत भिक्षुकांचा दाखला पंतांनी नवीनच घातला आहे.

राम म्हणे कर्णी कर ठेवू ती तरि न दक्षिणा आशा।
मज फार दक्षिणेची विप्रा जशि तशिच लागली आशा. ॥११८॥

राम म्हणतोः – आतां ती दक्षिण दिशा तरी कानावर हात ठेवून मला सीता ठाउक नाहीं असें न म्हणो. मला दक्षिणेची (उरलेल्या दक्षिण दिशेची) आशा आहे; जशी भिक्षुक ब्राह्मणाला दक्षिणेची (दामाची) असते तशी. मुळात आशा हा शब्द द्व्यर्थी आहे. पंतांनीं येथें दक्षिणा व आशा हे दोन्ही शब्द द्व्यर्थी वापरले आहेत.

सीतेचा शोध लावल्यावर लंकेंत जाण्यांकरतां जो सेतू रामाने बांधवला त्याचें मुळांत वर्णन "दशयोजन विस्तारं शत योजनमायतम्" असें श्लोकाच्या एका चरणांतच केलेलें आहे; पण ती भव्य कामगिरी लक्षांत घेतां पंतांच्या मनांत जे तर्क आले, त्याविषयीं पंतांना सात उत्प्रेक्षा सुचल्या आहेत, त्या वाचनीय आहेत.

शतयोजन आयत दशयोजन विस्तीर्ण सेतु, शंकेतें।
दे, गेला बुडवाया कोपाकुल भूमिबाहु लंकेतें; ॥९॥
किंवा तो कपिकटकोत्तर सिंधूद्गत बुभुक्षु कालाही।
दूर पसरला खाया रात्रिचर क्षुद्र बेडकाला ही!॥१०॥
सेतु न तो यत्पतिनें स्वसुता नेली जशी वृकें एणी।
त्या लंकेची श्रीभूदेवीनें ओढिली असे वेणी! ॥११॥
रामजयश्रीलक्ष्मीं लंका घाली सुनील पाटावे।
सेना वऱ्हाडणीला पायघडी कां असें न वाटावें!॥१२॥
बहुधा तुच्छ जलधितृण चाटायाचा धरूनियां वीट।
गेला प्रभुप्रतापासितपथ रक्षोटवीकडे नीट! ॥१३॥

कीं पतितपति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे ।
आली जी लंकाश्री तीचा तो सांजनाश्रुपथ वाटे; ॥१४
कीं रचिलें स्वापयशें शोकानलदग्ध सागरोरचितें ।
सूचविले तर्क असे त्या सेतुवरें महा सुधीरचितें १५॥
( व. अ. १२ )

या सप्तपदी उत्प्रेक्षांनीं रामाचें जयश्रीशीं पंतांनीं लग्न लाविलें आहे. या आर्यांत उत्प्रेक्षा हा मुख्य अलंकार असून त्यांत रूपक, उपमा, अपन्हुति इ. दुसरे अलंकार मिश्र आहेत. विश्वशरण्य या सहेतुक विशेषणानें परिकर अलंकार सिद्ध झाला आहे. ११ व्या आर्येंतील उत्प्रेक्षा उत्तमोत्तम आहे. पुरुषांच्या रागापेक्षां अधिक असणारा जो स्त्रियांचा राग, तो वाढला म्हणजे कोठपर्यंत जातो तें तींत दाखविलें आहे. एवढया मोठया लंकेची सेतुएवढी लांब वेणी ओढून स्वसुता जी सीता तिला हरून नेल्याबद्दल भूदेवीनें जो राग दाखविला आहे, जो त्वेष दाखविला आहे, ते महाकाव्याला शोभणारे आहेत. हें भव्य शब्दचित्रही वाचकांच्या मनांत तसाच त्वेष उत्पन्न करीत आहे. ही उत्प्रेक्षा असें सुचविते कीं, पंत हे महा कवि होते.

मागें सांगितलेला वैद्य व भिक्षुक यांप्रमाणें वाणी सुद्धां थट्टेचा एक विषय आहे. त्याचा दृष्टान्त बिभीषणानें इंद्रजिताला दिला आहे. तो उत्तम असून पंतांच्या पदरचा आहे.

प्रभुला बिभीषण म्हणे पावेल जया न रावणि कदापी ।
निजकपटज्ञा पाणी जोडी, भोळ्या नरा वणिक दापी ॥५३॥

या आर्येंत सात अक्षरी यमक आहे. बिभीषण म्हणतो रावणि ( रावणाचा पुत्र इंद्रजित् ) याला जय मिळणार नाहीं. जसा वाणी तसा तो भित्रा आहे. जरी वाणी भोळ्या नरांना दाबतो, तरी तो त्याचें कपट जाणणाऱ्याला पाणी ( हात ) जोडतो.

विजयी राम अयोध्येकडे परत जावयास निघाला. वाटेंत अंगदाला यौवराज्यपदी त्यानें स्थापन केलें. मंडळी विमानांत बसून पुढें चालू झाली. तींत अंगद होता व तारा ( वालीची स्त्री ) होती. तिला जें हें भाग्य प्राप्त झालें,त्याचें वर्णन करतांना पंत म्हणतात

चढली अजा गजशिरीं, फळली सदमृत फळेंचि कटु तुम्बी ।
तें हेंचि जें म्हणति कवि ऐसें विधुला पिपीलिका चुम्बी ! ॥
१३३

तारेचें विमानांत बसणें म्हणजे शेळीचें गजाच्या मस्तकावर आरोहण करणें आहे. अथवा कडू भोपळीला अमृतासारखीं गोड फळें येण्यासारखें आहे. अशा प्रकारालाच कवि मुंगीला चंद्रमुखाचें चुंबन घेण्याचा लाभ घडणें म्हणतात. या आर्येंत “ विधुला पिपीलिका चुम्बी ” ही एक समस्या आहे. ती सोडविण्याचा प्रकार असा उघड आहे कीं, शंकरावर फुलें वाहल्यावर त्या फुलांत असलेली मुंगी सहजच शंकराच्या मस्तकीं असलेल्या चंद्राचें चुंबन घेण्यास समर्थ झाली !

रामचंद्राचें चरित्र संपल्यावर “ या द्रौपदीप्रमाणें पतिव्रता कोणी पूर्वी पाहिली किंवा ऐकिली होती काय ?” असें धर्मानें विचारल्यावरून मार्कण्डेय ऋषींनीं सावित्रीची कथा सांगितली. तिचें सार व्यासांनीं सावित्रीच्या मुखानें दिलें आहे. तूं पसंत केलेला वर सत्यवान अल्पायु आहे असें नारदानें येऊन सांगितल्यावरून तूं दुसरा वर पहा असें सावित्रीला तिचा पिता अश्वपतिराजा म्हणाला. तेव्हां सावित्रीनें उत्तर दिलें.

सकृदंशो निपतति, सकृत्कन्या प्रदीयते ।
सकृदाह ददानीति, त्रीण्येतानि सकृत् सकृत् ॥२६॥

भावार्थः—वांटप एकदांच करतात, कन्येचें दान एकदांच करतात. देईन असें एकदांच म्हणतात,

हीं सर्व एक एकदांच करावयाचीं असतात. त्यांत पुन्हां फेर करावयाचा नसतो ! सावित्री पुढें म्हणते

दीर्घायुरथवाऽल्पायुः सगुणो निर्गुणोऽपिवा।
सकृद् वृतो मया भर्ता न द्वितीयं वृणोम्यहम् ॥ २७ ॥
मनसा निश्चयं कृत्वा ततो वाचाऽभिधीयते ।
क्रियते कर्मणा पश्चात् प्रमाणे मे मनस्ततः ॥ २८ ॥

महा. व. प. अ २९४

हे तीन्ही श्लोक अगदीं साधे असून उपजत अर्थानेंच शोभत आहेत. शब्दालंकारांनीं ते कवीनें अलंकृत केले नाहींत. म्हणून उपजत सौन्दर्यानें शोभणाऱ्या तरुणीप्रमाणें हे रसिकांना प्रिय वाटत आहेत. यांचें भाषांतर किंवा रूपान्तर ज्यांत आहे त्या पंतांच्या पुढील आर्या वरील मूळ श्लोकांशीं ताडून पहा.

ती सुमति म्हणे ताता ! न त्यजुनी पयोधिला नदी परते ।
न पतंगचित्तवृत्ति क्षणही रत्नीं, त्यजूनि दीप, रते. ॥२२॥
वरिला तो वरिलाचि स्पर्शावा या न अन्य कायातें ।
हा दृढ निश्चय माझा स्तवितील कुलीन कन्यका यातें. ॥ २३ ॥
आयुष्य असो किति तरि मज तदितर पुरुष तुज समचि राया ।
मन न चळेलचि येइल जरि चरचर हा गळा यम चिराया ॥ २४ ॥

( व. अ. १३ )

या सर्व आर्या अर्थतः एकच स्वरूपाच्या आहेत; पहिली आर्या अलंकृत आहे. पयोधि व दीप या अप्रस्तुत शब्दांनीं प्रस्तुत असा सत्यवान सूचित होत आहे. नदी व पतंगचित्तवृत्ति या अप्रस्तुत शब्दांनी प्रस्तुत अशी सावित्री सूचित होत आहे. रत्नीं या अप्रस्तुत शब्दानें प्रस्तुत दुसरा दीर्घायु पति सूचित होत आहे. यामुळें यांत अप्रस्तुतप्रशंसा अलंकार चांगला साधला आहे.

सावित्रीनें मनानें वरलेल्याशींच विवाह केला व सावित्री पतिसहवर्तमान वनांत फळें, फुलें व काष्टें यांचा शोध करीत संचरत होती. तिचें मन किति प्रेमळ होतें, तें दाखविण्याकरतां पंतांनीं एक सुरेख आर्या रचली आहे.

जे पक्षी जे श्वापदसंघ अधिष्ठूनि कानना वसती ।
त्यांचें तद्वचनामृतपानार्थ पुसेल कां न नांव सती ? ॥ ४७ ॥

वन्य पशुपक्ष्यांची माहिति नगरवासी सावित्रीला कोठून असणार ? ती जाणण्याचें कुतूहल तिला असणें जसें साहजिक, तसें तिनें त्यांचीं नांवें त्यांच्याशीं परिचित असलेल्या सत्यवानाला ( आपल्या पतीला )च विचारणें साहजिक आहे; परंतु पंत म्हणतात आपलें कुतूहल पुरविण्याकरिता ती त्यांची नांवें विचारीत नव्हती, तर पतीला कांहीं तरी निमित्तानें बोलावयाला लावून त्याच्या अमृततुल्य वचनाचें सेवन करण्यासच विचारीत होती.

तोच नेमल्या वेळीं यमराज आले. त्याला सावित्री म्हणते. " आपण देव असावेत. आपलें वपु अमानुष दिसतें."

केलेंचि धन्य दर्शन–दानें येवूनि कानना मातें ।
अजि देवेश ! निवावे बहु हे सेवूनि कान नामातें. ॥ ५५ ॥

या आर्येंत सप्ताक्षरी यमक व पर्यायोक्त अलंकार साधला आहे. सावित्रीच्या तोंडची वाणी फार अभिजात संस्कृतीची आहे. " तुमचें नांव काय ?" हा साधा प्रश्न विचारावयाचा तेथें सावित्री म्हणते " तुमच्या दर्शनानें डोळे निवाले; आतां नाम ऐकून कान निवूंद्या !" पुढें पायरीपायरीनें सावित्रीची छाप यमावर बसूं लागली व त्याची धर्मराजता कसाला लावून ती एकावर एक वर मिळवूं लागली.

भुलला धर्म द्युतिला, धृतिला, मतिला, तिच्या
तथा स्तुतिला
न करुनि विचार जावी मागें म्हणउनि म्हणे
तथाऽस्तु तिला ॥ ७८ ॥

येथें पहिल्या ओळींत एककालिक क्रिया दाखविणारा समुच्चय अलंकार साधला आहे तो उत्तम आहे.

सत्यवान जिवन्त होवो असा वर देऊन यम गेला. सत्यवान झोंपेंतून जागा झाल्यासारखा उठला व सावित्रीला म्हणाला "आपण वनांत फिरतांना तुझ्या मांडीवर मी डोकें टेंकून पडल्यावर मला झोंप लागली. एक घोर महौजस पुरुष पाहिला. तो स्वप्नांत पाहिला कीं खरोखर पाहिला ? तो कोण तो माहीत असेल तर सांग." मुळांत "स्वप्न" शब्द आहे. त्यावरून मोरोपंतांनीं एक उपमा योजली आहे. ती नेहमींच्या उपमांहून निराळी आहे.

पुरुष श्याम महौजा ओढित होता बळेंचि मजला जो।
तो कोण पुसेन तया, नसतां स्वप्नोत्तमोर्ण मज लाजो
॥ ८८ ॥

सत्यवान म्हणाला, "मला एक काळा तेजस्वी पुरुष बळानें ओढूं लागला. असा कोणी म्हणेल तो माझा उत्तमर्ण ( सावकार ) असून मी त्याचें कुळ (अधमर्ण आहें). वास्तविक पाहतां मी स्वप्नांत सुद्धां कोणाचें कर्ज काढून त्याचें कुळ बनलों नाहीं ! म्हणून तो कोण तें मला सांग म्हणजे मी त्याला सांगेन 'मी तुझें कुळ नाहीं. तूं मला उगीच ओढलेंस !' मग तो लाजेल."

सावित्रीनें एक वर असा मागून घेतला कीं अंध श्वशुराला दृष्टि येवो. त्याला दृष्टि आली.

आला प्रकाश नेत्रीं अंधत्वाचा वरें नुरे गंध ।
परि भूप पुत्रमोहें केला पहिल्यापरीसही अंध ॥९३॥

येथें विभावना अलंकार फार सुन्दर प्रकारें साधला आहे. पुन्हा अंधत्व येण्याला कारण नसतां पुत्रमोहानें डोळे भरून आल्यानें अंधत्व या कार्याची नष्पत्ति झाली आहे.

हें उत्तमांपैकीं सावित्रीआख्यान संपविल्यावर, पंतांनीं आपल्या रसिक वाचकांचा अभिमान धरून मंद ( अरसिक ) वाचकांचा समाचार घेतला आहे, तो असा

रामघन मयूर म्हणे निववालचि सुरसिकांशि केका हो।
शभुहि म्हणे, न सेविति मंद म्हणुनि झुरसि काशिके!
कां हो ॥ १०८ ॥

( अर्थ) रामघनमयूराच्या ( मोरोपंतांच्या ) केका सुरसिकांसीं निववतील. पण माझ्या कवितेस मान न देणारे कांहीं मंद अरसिक असतील तथापि त्याबद्दल झुरणी लावून घेण्याचें कारण नाहीं. दुसऱ्या चरणांत पंत म्हणतात असाच प्रसंग काशीपुरीवर आला असतां शंकरजी तिची समजूत करतांना म्हणाले "कांहीं मंद लोक तुला पूजीत नाहीत म्हणून तूं झुरणीस लागण्याचें कारण नाहीं. तुझी पूजा रसिक आहेत ते करीतच आहेत. तेवढ्यानें तुझें समाधान होईल."

महाभारत वनपर्व अध्याय ३१३ या भागांत यक्षानें धर्माला विचारलेले शंभर प्रश्न व त्यांचीं धर्मानें दिलेलीं उत्तरें आहेत. या भागाला यक्षप्रश्न म्हणतात. जसे प्रश्न अकल्पित तशी त्यांचीं उत्तरेंही अकल्पित आहेत. अतएव आनंदकारक आहेत. पण तीं प्रश्नोत्तरें पंतांनीं गाळलीं आहेत म्हणून कांहीं नमुन्याकरतां दिलीं आहेत.

किंस्वित् गुरुतरंभूमेःकिंस्वित् उच्चतरंच खात् ५९
(पृथ्वीपेक्षां कोणी मोठा आहे काय ? आकाशापेक्षां कोणी उंच आहे काय ? )

उत्तर--माता गुरुतरा भूमेःखात्पितोच्चतरस्तथा ॥६०॥
( पृथ्वीपेक्षां माता मोठी व आकाशापेक्षां पिता उंच )

प्रश्न---लाभानामुत्तमं किंस्यात् ॥७३॥
( लाभांत उत्तम लाभ कोणता ? )

उत्तर---लाभानांश्रेय आरोग्यम् ॥७४॥
( लाभांत लाभ आरोग्य. )

प्रश्न---मृतः कथंस्यात् पुरुषः ॥८३॥
( पुरुष मृत कशानें होतो ? )

**उत्तर**—मृतो दरिद्रः पुरुषः

( दारिद्र्य आल्यानें )

**प्रश्न**—कीदृशश्चः स्मृतः साधुः ॥९१॥

( साधु कोणास म्हणावें ? )

**उत्तर**— सर्वभूतहितः साधु ॥९२॥

( सर्व भूतमात्राचें हित करतो तो साधु. )

या उत्तरांत ऋषींची खरी शिकवण आहे. प्रत्येकानें स्वतांचें हित वर्जून भूतमात्रांच्या हिताकडे पाहिलें पाहिजे.

पुढें 'कःपन्थाः' या प्रश्नाचें उत्तर धर्मानें एका श्लोकांत दिलें.

तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयोविभिन्ना ।
नैकोऋषिर्यस्यवचः प्रमाणम् ॥
धर्मस्यतत्त्वं निहितं गुहायाम् ।
महाजनो येन गतः स पन्थाः॥११७॥

भावार्थः—( तर्काला स्थैर्य नाहीं. श्रुतिवाक्यात मेळ नाहीं. ज्याचें वचन प्रमाण मानतात असा एकही ऋषि नाहीं. धर्माचें तत्त्व गुहेंत लपलेलें आहे ! मग लोकांनीं कोणत्या मार्गानें जावें ? तर ज्या मार्गानें मोठे लोक जातात, त्या मार्गानें. ) हा श्लोक संस्कृतज्ञ लोकांच्या तोंडी बसलेला आहे.

अशा रीतीनें बारा वर्षांचा वनवास सरल्यावर अज्ञातवासाला आरंभ होण्यापूर्वी ज्यांच्या सहवासात आपला काळ सुखानें गेला त्याचा निरोप पाण्डवानीं घेतला त्याचें वर्णन एकाच आर्येंत फार सरसपणें पंतांनीं केलें आहे तें असें.

खग-मृग-वनदेवत-दरी-सरिदद्रिसरांसि हात जोडूनी
रडले पाण्डव जाता सहवासी ब्रह्मवृंद मोडूनी ॥४६॥
( व. अ. १५ )

येथें स्वभावोक्ति अलंकार सुंदर साधला आहे. सहवासी जनांचा विरह न **अनुभवले**ल्या वाचकांसहि ही आर्या रडूं आणील.

## विराट पर्व.

वेष पालटून विराटपुरींत प्रवेश केल्यावर राणीकडे जातांना द्रौपदीच्या मनाच्या स्थितीचें पंतांनीं पुढील आर्येंत फार सरस प्रकारानें वर्णन केलें आहे.

होऊनि मलिनवेषा, जाता राजप्रियेकडे कृष्णा ।
चित्तीं म्हणे अहा ! बहु अवघड हे उंबरे कडे-
कृष्णा ! ॥१०॥
(वि. अ. १)

बहुविध बहु दासदासींना जिनें आज्ञा करावी, त्या स्त्रीला 'जो मला पोशील त्याची सेवा मी करीन' असें म्हणत जर दुसऱ्याच्या घरी जावें लागलें, तर तें किति कठीण जाईल हें या आर्येंत सांगितलें आहे. कृष्णा (द्रौपदी) कृष्णाला आठवून म्हणते, 'दुसऱ्याचे हे उंबरठे वलांडून जाणें गिरीचे कडे वलांडून जाण्याइतके अवघड मला वाटत आहेत. ही आर्या पंतांची नवीन आहे. हृदयाच्या प्रबळ भावनांचें विशेषतः स्त्रियांच्या भावनांचें पंतकृत वर्णन फार हृदयंगम असतें. याचे दुसरें आणखी उदाहरण पहा. सुदेष्णा विराटराजाची राणी द्रौपदीला ( सैरंध्रीला ) पाहून चकित होते.

राज्ञी म्हणे पहाया रूप असें ईश्वरीस नवसावें ।
कोण सचक्षु म्हणेल स्वगृहीं सुंदरीस तुज
न वसावें ? ॥१२ ॥
परि निश्चयें त्यजिल मज, पाहुनि तुज भूप सुकमनीयेतें।
वाटे विलोकिता जरि हे अद्भुत रूप शुक,मनी येतें १३
काय करावें म्यां तरि जरि सुन्दरि ! अनुसरेल पति
तूतें ! ।
वद केंवि आंवरावी अमृतफलहृता रसज्ञमति
तूतें ! ।१४

या आर्यांच्या रचनेकडे जरा लक्ष दिले व त्या मूळ श्लोकांशीं ताडून पाहिल्या म्हणजे महाभारतांतील मजकुराची निवड पंत कशी करीत व आर्या कशा रचीत तें जाणण्याची किल्ली सापडते.

मूळश्लोक

मूर्ध्नि त्वा वासयेयं वै सशयो मे न विद्यते ।
न चेदिच्छति राजा त्वा गच्छेत् सर्वेण चेतसा ॥२२

स्त्रियो राजकुले याश्च याश्चेमा मम वेश्मनि ।
प्रसक्तास्त्वां निरीक्षन्ते पुमांसं कं न मोहयेः ॥२३॥
वृक्षांश्चावस्थितान्पश्य य इमे मम वेश्मनि ।
तेऽपि त्वां सन्नमन्तीव पुमासं कन्न मोहयेः ॥ २४ ॥
राजा विराटः सुश्रोणि दृष्ट्वा वपुरमानुषम् ।
विहाय मां वरारोहे गच्छेत् सर्वेण चेतसा ॥ २५ ॥
यंहि त्वमनवद्याङ्गि तरलायतलोचने । ॥
प्रसक्तमभिवीक्षेथाः स कामवशगो भवेत् ॥ २६
यश्च त्वां सततं पश्येत् पुरुषश्चारुहासिनि ।
एवं सर्वानवद्याङ्गि सचानङ्गवशो भवेत् ॥ २७
अध्यारोहेद्यथा वृक्षान् वधायैवात्मनो नरः ।
राजवेश्मनि ते सुभ्रु गृहे तु स्यात्तथा मम ॥ २८
यथाच कर्कटी गर्भमाधत्ते मृत्युमात्मनः ।
तथाविधमहंमन्ये वासं तव शुचिस्मिते ॥ २९
( म. वि. अ. ९ )

सुदेष्णेच्या म्हणण्याकडे व्यासांनीं लाविलेले आठ श्लोक अगदीं तर्कशुद्ध आहेत.ती म्हणते "तुला मी डोक्यावर वागवावी. त्याबद्दल माझ्या मनांत संशय नाहीं. पण अशी भीति वाटते कीं, राजाचें मन तुझ्याकडे पूर्णपणें जाऊन तुझ्या मागें तो लागावयाचा सुद्धां ! कारण स्त्रिया सुद्धां प्रसक्त होऊन तुझ्याकडे पाहतात, मग पुरुषांना तुझा मोह पडला तर काय नवल ? फार काय सांगूं ? माझ्या वाड्यांतील हे वृक्ष सुद्धां तुला पाहून तुझ्या पुढें वांकून स्तब्ध उभे आहेत ! मग राजा विराट तुझें अमानुष रूप पाहून मला सोडून तुझ्या मागें मनःपूर्वक पूर्णपणें लागेल. स्त्री वृक्षादिकांचा स्तब्धीभाव पाहून तुला घरांत ठेवणें म्हणजे आत्मघात करण्या करितां वृक्षावर चढणें आहे. खेकडीची गर्भधारणा व पोट फुटून होणारी तिची प्रसूति हीं जशीं तिला मृत्युकारक होतात तसें तुझें घरांत ठेवणें मला मृत्युकारक आहे."

सैरन्ध्रीनें माझ्या घरीं वसावें कीं न वसावें हा सुदेष्णेच्या पुढें मुख्य प्रश्न होता. त्याविषयीं सुदेष्णेच्या म्हणण्याचें पृथक्करण करून पंतांनीं वर्ण्य विषयक तीन मूलभूत द्रव्यें काढलीं तीं अशीं (१) सैरन्ध्रीचें रूप;(२) तें पहातांच सुदेष्णेच्या पतीच्या मनावर होणारा परिणाम; त्याचें द्विविधरूप ( ३ अ ) सुदेष्णाविषयक, पतीकडून तिचा त्याग; ( ३ ब ) सैरन्ध्रीविषयक; सुदेष्णेच्या पतीचें सैरन्ध्रीमागून अनुसरण. यावर पंतांनीं तीनच आर्या रचिल्या आहेत. २६ व २७ श्लोक हे पुनरावृत्तीनें दूषित अतएव शब्दजाल म्हणून वगळण्यांत आले आहेत. वृक्षावर चढून केलेला आत्मघात व खेंकडीचें मरण या उपमा पंतांनीं वगळल्या आहेत; कारण ते उपमेकरतां व्यासांवर मुळींच अवलंबून नसत. पंत व्यासांच्या उपमा सर्वत्र आणतात, पण त्या त्यांच्या यमकाला जुळल्या तर. या तीन आर्यांची रचना या दृष्टीनें पाहातां फार सरस आहे. हिनें ( सैरन्ध्रीनें ) माझ्या घरीं " वसावें " कीं " न वसावें ?" याचें उत्तर सुदेष्णेनें "वसावें." असें ठरविलें. येथें पंतांस आढळून आलें कीं "न वसावें " हे दोन शब्द यमकक्षम आहेत. या दोहोंचा एक शब्द केला असतां ( नवस करावा या अर्थाचा ) " नवसावें " हा शब्द सिद्ध होतो, व त्याप्रमाणें सोईकरितां "नवसावें" हा शब्द पहिल्या चरणाच्या व "न वसावें" हे शब्द दुसऱ्या चरणाच्या शेवटीं त्यांनीं ठेऊन दिले. आतां नवस करावयाचा तो कोणाला ? हा प्रश्न येतो. सुदेष्णा स्त्री असल्यामुळें ती देवीला साहजिकपणेंच नवस करील व धर्मानें विराटपुरींत प्रवेश करण्यापूर्वी त्रिभुवनेश्वरी जी दुर्गा तिचें स्तवन केलें होतें तेंही पंतांच्या स्मरणांत होतें. म्हणून त्यांनीं " ईश्वरीस " नवसावें असें ठरविलें. या चरणांत सैरंध्रीच्या रूपाची इयत्ता ठरवावयाची होती म्हणून सैरंध्रीचें रूप इतकें उत्तम आहे कीं सुदेष्णेच्या म्हणण्याप्रमाणें तें नुसतें पाहावयास ईश्वरीस नवसावें लागेल, असा सुंदर अर्थ पंतांनी आणला. दुसऱ्या चरणांत अशी शब्दांची योजना पंतांनीं केली कीं, "कोण सचक्षु म्हणेल हिनें न वसावें ?" हा प्रश्नालंकार घालून निश्चितपणें वसावें" असें उत्तर वाचकांकडून पंतांनीं मिळविलें. ही बारावी आर्या अर्थतः

मुळाप्रमाणेंच आहे. याच्यापुढें तूं माझ्या पतीला मोहून टाकशील व तो माझा त्याग करील हा मुळाप्रमाणें अर्थ १३ व्या आर्येच्या पहिल्या चरणांत आणतांना (भू) प-सुकमनीयेतें हीं सात अक्षरें यमकक्षम आढळून आलीं, तीं पहिल्याचरणाच्या अन्तीं पंतांनी-स्थापून ठेवलीं व दुसऱ्या चरणाच्या शेवटी (रू) प शुकमनीं येतें अशीं वरील सात यमकक्षम अक्षरांचीं संवादी अक्षरें पंतांनीं स्थापलीं व या शेवटील शब्दांना जुळेल अशा अर्थाचे दुसरे शब्द घालून १३ वी आर्या पंतांनी रचली. तिचा अर्थ असा होतो कीं, भूप जर तुला सु-कमनीयेतें (चागली कमनीय, चांगली सुन्दर अशी जी तूं, तिला) पाहील तर निश्चयें करून तो मला टाकील. कारण योगीन्द्र शुक जरी तुझें रूप पाहता,तरी तें त्याच्या मनीं येतें (मनात भरलें असतें.) वर सांगितलेल्या पद्धतीनेंच १४ वी आर्या पंतांनी रचली आहे. तींत सुदेष्णा म्हणते, "नंतर माझा पति जर तुला अनुसरेल तर मी काय करू ? आम्रफलानें रसज्ञाची जी मति हरण केली आहे, तिचे नियमन तें (तुतीच्या फळानें) कसे होईल ?"

१२ व्या आर्येत प्रश्नालंकार; १३ वींत सप्ताक्षरी छानदार यमक व १४ वींत प्रतिवस्तुपमा अलंकार हीं साधलीं आहेत.

सारांश, पंत मूळ भारत वाचून कमनीय अर्थ तेवढा घेत, मग यमक साधेल अशी शब्दयोजना करीत व तदनुरूप जो अलंकार योजावा लागेल तो योजून आर्या पुरी करीत. कमीजास्ती कल्पनांना यामुळें बहुधा आर्येच्या दुसऱ्या चरणांत वाव मिळे. जशीं उंची वस्त्रें वेलबुट्टीच्या किनारीनें शोभतात, तशा या उंची कल्पना धारण करणाऱ्या पतांच्या आर्या यमकांनीं शोभतात. शिवाय या संक्षेप व वृद्धीच्या पद्धतीनें महाभारताच्या महारण्याची निसर्गरमणीयता न बिघडवितां त्यांतील अतिरूढ शब्दजाल तोडून आंतील मार्ग पंतांनीं संचारसुलभ केले आहेत व त्याला कलारुचिर उद्यानाची शोभा आणली आहे.

सैरन्ध्रीला आश्रय मिळाला. परंतु तिचें रूप पाहून उन्मत्त कीचकानें बहिणीला विनविलें कीं, कांहीं तरी करून माझ्याकडे तिला पाठवून दे. "बन्धु सुखी होवो व आपला पति न भुलो" अशा हेतूनें सुदेष्णा द्रौपदीला म्हणाली "मला तहान लागली आहे; कीचकालयांतून पानीय (मद्य) घेऊन ये."

सैरन्ध्री सुदेष्णेच्या घरीं राहिली तेव्हां काय समय झाला होता त्याची आठवण देऊन "मी जात नाहीं. दुसऱ्या दासी पुष्कळ आहेत; त्यांतून एक पाठव" असें म्हणाली. सुदेष्णा विनंति मान्य करीना.

विनवी ऐसें बहु, परि तीस सुदेष्णा म्हणे तरी जाच।
फारचि बरी निरयगति परवशता शतगुणें करी
जाच ॥५६॥ (वि. अ. १)

पहिला चरण मूळांत आहे. दुसरा नाहीं तो घालून त्यांत श्लेषमूलक तीन अक्षरी यमक साधून मुळांत नसलेला एक सिद्धान्त पंतांनीं आर्येत गोविला आहे. नरकात वास पतकरेल पण परवशता शतपटीनें जाच (त्रास) देते. याच्या ताडीला एकच वाक्य पॅरडाइस लॉस्ट या उत्कृष्ट काव्यांत मिल्टन कवीनें सेटनच्या तोंडीं घातलें आहे. सेटन आपल्या अनुयायांस म्हणतो. Better to reign in hell than serve in heaven. आधिपत्य, मग तें नरकांतलें असलें तरी पतकरेल ! पण सेवा, स्वर्गांतील असली तरी नको ! हे मराठी व इंग्रजी दोन्ही चरण अमर झाले आहेत. सैरन्ध्री जावयास निघाली.

जातां परार्थहीं बहु तापानें पावली सुरामाती ।
न करिल कां पित्याची दुर्गतिची माउली सुरा
माती ? ॥५९॥

दुसऱ्याकरितां सुरा नुसती आणावयास सैरन्ध्री गेली, तिला ताप झाला, मग प्रत्यक्ष सुरा पिणाऱ्याला कां ताप होणार नाहीं ? येथें प्रश्नालंकार साधला आहे. हा चरण अमर झाला आहे.

राजा व राणी यांकडे सैरन्ध्रीनें कीचकाविरुद्ध गाऱ्हाणें घातलें. त्याचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं ती भीमाच्या महानसाकडे वळली व भीमाला संबोधून व्यासांनीं वर्णिल्याप्रमाणें 'गान्धार' स्वरांत ती म्हणाली

निजलां काय मृतांपरि ? व्हा जागे सिंहसे उठा, राहो निद्रा,कीर्तिवरा हो ! -ही पद हा बाहु भृगुकुठारा हो८७

पहिला चरण मूळाप्रमाणें तंतोतंत आहे. तुम्हीं मेल्यांप्रमाणें निजलां काय ? सिंहासारखे उठून जागे व्हा ! निद्रा बाजूला राहो. कीर्ति वरा. म्हणजे हा तुमचा बाहु भृगुकुलोत्पन्न जो परशुराम त्याचें शस्त्र जो कुठार ( परशु ) त्यासही ऱ्हीपद होवो (लाजविणारा होवो). दुसऱ्या चरणांतील रूपक सुन्दर आहे. पहिला चरण परॅडाइसलास्ट मध्यें मिल्टन कवीनें सेटनच्या तोंडी घातलेल्या Awake, arise, or be for ever fallen. ( जागे व्हा व उठा नाहींतर कायमची अधोगति प्राप्त होईल ). या वाक्याची स्मृति देत आहे. आश्वासन देऊन भीम तिला म्हणाला.

दयिते ! कां आलीस ? प्रमदे ! हा आर्द्र कां
पदर ? जाये !
भ्यालीस भीरु ? भय कां ? भेटे, त्यालाचि
कांप दर ज्या ये ! ॥८९॥

ही आर्या मूळाला अर्थतः धरून आहे. द्रौपदीला लावलेलीं भिन्नभिन्न विशेषणें व या एकाच आर्येंत लहान लहान घातलेलीं पांच वाक्यें भीमाच्या मनाची स्थिति दाखवीत आहेत. शेवटल्या वाक्यांत त्याचें स्त्रीदाक्षिण्य दिसून येत आहे. भीम आश्वासनपूर्वक म्हणतो " ज्याच्या चित्तवृत्ति तुझ्याकरतां थोड्या तरी कंपित ( क्षुभित ) होतात त्यालाच तूं भेटली आहेस. कोणत्याहि संकटांतून सोडविणारा (व्यासांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे सर्व कर्मसु विश्वास्य असा) मीच आहे.

या ठिकाणीं द्रौपदीनें भीमाला एक व्याख्यान दिलें. तें मागील धर्मापुढें दिलेल्या व्याख्यानाची विस्तृत पुनरावृत्तिच होय. मात्र आतां व्यासांच्या तीन अध्यायांचें सार पंतांनीं पंचवीस आर्यांत आणलें आहे. तें उत्तम आहे. एक आर्या नमुन्याला दिली आहे.

हे स्त्री नव्हे प्रतिष्ठा तुमची जरि ईस सोडितां पाणी ।
धर्में चार्थें च असें वदलां कां प्रथम, सोडितां
पाणी ? ॥१०३॥

याआर्येच्या पहिल्या चरणांत अपन्हुति अलंकार आहे. दुसऱ्या चरणांत पर्यायोक्त अलंकार आला आहे. स्त्रीवर पाणी सोडतां म्हणजे तिचा त्याग करतां असें म्हटलें आहे. या पर्यायोक्तांत लोकोक्ति मिश्र आहे. या व्याख्यानाचा परिणाम कीचकवधांत झाला.

पांडव कोठें आहेत त्यांचा शोध लावण्याकरतां जे हेर दुर्योधनानें पाठवलेले होते, ते परत येऊन म्हणाले, "पांडव कोठेंही दिसत नाहींत; ते नष्ट झाले असले पाहिजेत," त्यावर पंतांनीं एक नवीन दृष्टान्त देऊन एक आर्या घातली आहे ती अशी.

न दिसति, म्हणवुनि केवळ काय नसति गुर्जरीस
कुच ? राजा ! ।
वेडाचि तो न दिसले भूमिगतहि पांडुपुत्र
कुचरा जा ॥ १२ ॥
( वि. अ. २ )

पांडव भूमीवर असूनही कुचरा ( पृथ्वीवर हिंडणाऱ्या हेराला, दिसत नाहींत म्हणून ते नाहींतच असें म्हणणारा वेडा ठरेल.* कसा ? तर दिसत नाहींत म्हणून गुर्जर देशांतील स्त्रीस कुच नाहींत असें म्हणणारा जसा वेडा ठरेल तसा.

*गुर्जरीच्या वेशाच्या निरीक्षणाचा उपयोग या ठिकाणीं पंतांनीं जसा फार समर्पक उपमा योजण्याकडे केलेला आढळतो, तसा त्यांनीं गुर्जर विप्राच्या पक्वान्न विशेषाच्या आवडीच्या निरीक्षणाचा उपयोग अन्यत्रही केलेला आढळतो.

कर्णयुगांत भरावें जें हरिहर-जन-यश प्रचुर त्यां तें ।
जैसा दोंदीं कोंदी गुर्जर देशस्थ विप्र चुरम्यांतें ॥३॥
( सन्मनोरथ राजी )

त्रिगर्तांचा राजा सुशर्मा म्हणाला कीचकवधानें दुर्बळ झालेल्या विराटाला जिंकावयाचें सोडून कोठें न दिसणाऱ्या नष्टप्राय झालेल्या पांडवांना सोधीत बसणें म्हणजे हातचें टाकून पळत्याच्या पाठीस लागण्यासारखें आहे. हा अर्थ साधा असून तो व्यक्त करण्यास पंतांनीं पुढील आर्येंत किती क्लेश घेतले आहेत ते पाहा.

बोले त्रिगर्तराज, प्रस्तुत पांडव दशा विराटा हो! ।
प्राप्ताहि त्यजुनि म्हणे न शिखंडिचा परां विरा टाहो२९
( वि. अ. २ )

त्रिगर्तराज म्हणाला " आतांची पांडवांची दशा विराटाला हो ( प्राप्त होवो ) " शिखंडीचा टाहो (केका) प्राप्ताहि ( हस्तगत झालेल्या अहिला– सर्पाला, टाकून परां (अन्य सर्पाला) विरा (विरघळून जा) असें म्हणत नाहीं. " या मासलेवाईक क्लिष्ट रचनेचें मूळ पंतांच्या यमकप्रेमांत आहे. पण त्या प्रेमानें असल्या क्लिष्ट दशेंत त्यांना क्वचित् प्रसंगींच पाडलें आहे. उलट यमकप्रेमानें त्यांस पुष्कळ वेळां सुंदर अर्थाची कमाई करून दिलेली आहे तें वाचकांच्या परिचयाचें झालेलें आहेच.

सुशर्म्याच्या उपदेशाप्रमाणें उत्तर व दक्षिण असे दोन गोग्रहण प्रसंग उद्‌भवले. उत्तर गोग्रहणप्रसंगीं विराटपुत्र, उत्तर म्हणाला " नुकतेंच जें मी मासभर युद्ध केलें, त्यांत माझा सारथि पतन पावला. हें मोठें विघ्न आहे." तें, बृहन्नडा सारथि होऊन दूर करील असेंही त्यास सैरन्ध्रीकडून समजलें. मात्र बृहन्नडेचें मन उत्तरा वळवूं शकेल. हें काम उत्तरानें उत्तरेला सांगतांच ती बृहन्नडेकडे गेली.

ती धांवत जाय म्हणे गानादिक हे बृहन्नडे राहो ।
समयीं सारथ्यगुणा नुघडूनि कदर्युचा न डेराहो
॥ १९ ॥
( वि. अ. ३ )

या आर्येंत चार अक्षरी सुंदर यमक स्वतंत्र उपमेसह साधलें आहे. ( अर्थ ) बृहन्नडे ! गायनादि बाजूला राहूं दे. तुझा सारथ्यगुण उघड ( प्रकट ) करण्याची वेळ आहे. तसा तूं न करशील, तर कधींही न उघडून नुसता भरून ठेवलेला कोणाच्याही उपयोगी न पडणारा कृपण माणसाचा डेरा ( रांजण ) च तूं होशील.

ही विनंति मान्य करून बृहन्नडा उत्तराकडे जावयास निघाली एवढेंच मूळांत आहे. परंतु या यश प्रथित करण्याच्या प्रसंगीं अर्जुन बाह्यतः बृहन्नडा असतां त्याचें आंतील अर्जुनत्व कसें उसळलें तें पंतांनीं एका चरणांत फार बहारीनें वर्णिलें आहे.

उठल्या उत्साहाच्या त्या शांत श्रीमदुदधिवरि लहरी ।
धरितां हनु, न नु म्हणतां, प्रणतांचें कां न सुदधि वरिल हरी ? ॥२३॥

आतांपर्यंत शांत असलेल्या अर्जुनाच्या श्रीमद् मन:सागरावर उत्साहाच्या लहरी उठल्या. उत्साह हा वीररसाचा स्थायी भाव आहे. त्याच्या लहरी आतां उठल्या असें म्हणून वीररसाचा संचार उदधीच्या लहरीप्रमाणें हळुहळू अर्जुनाच्या मनांत कसा झाला तें सुंदर रीतीनें पंतांनीं कथन केलें आहे.

दुसऱ्या चरणांत उत्तरेच्या आर्जवशक्तीला यश कसें आलें तें पंतांनीं दाखविलेलें आहे. " धरितां हनु (हनुवटी धरून म्हणजे आर्जव करून ) न नु म्हणतां ( नको म्हटल्याशिवाय ), हरि ( श्रीहरी ) सुदधि (गोडदधि) कां न वरिल (कां स्वीकारणार नाहीं ! )" स्वीकारीलच. उत्तरानें बृहन्नडेला कवच घालावयास दिलें. बृहन्नडा तें कवच उलटें घालूं लागली. तेव्हां सर्व मुली हंसल्या. येथें मुळाप्रमाणेंच पंतांनीं हास्यरस आर्येंत राखला आहे.

पंतांनीं येथें पदरची विशेष खुबी केली आहे ती अशी कीं आजपर्यंत केलेल्या सोंगाची बतावणी बरोबर चालू ठेवण्याकरतां बृहन्नडेला अर्जुनाच्या मुखीं एक सुरेख नर्मोक्ति घातली आहे.

हांसे आपणहि, म्हणे 'ठावें मज काय गायना कवच ' ? ॥२९॥

हींत विनोदही आहे. तो फारच मृदु आहे. बढाई करून रणांत निघालेल्या उत्तराची कौरवांचें सैन्य पाहतांच स्थिति काय झाली तिचें पुढील वर्णन अर्थशः मूळाला धरून आहे. तें वाचनीय आहे

कुरुकटकासि पहातां तो उत्तर बाळ फार गडबडला!
स्वपरबलाबल नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥ ३९ ॥

चवथ्या चरणार्धांत छेकानुप्रास व अर्थ ही चांगलीं साधलीं आहेत. ही आर्या अमर झाली आहे.

उत्तर बृहन्नडेला म्हणाला

दुर्योधन, दुःशासन, कर्ण, कृप, द्रोण भीष्म ज्या कटकीं
त्यांत मरेनचि शिरतां कांटयावरि घालतां जसा पट कीं ॥ ४१ ॥
आज्ञा नसतां आलों, रागें न भरेल काय हो तात?
रोमांच घर्म कंप प्रकट, व्यापूनि काय होतात ! ॥४३॥

४१ व्या आर्येचा पहिला चरण मूळाला धरून आहे. दुसऱ्यांतील उपमा नवीन व सुंदर आहे.

४३ वी आर्या मूळाला धरून आहे. उत्तराचा उत्साह जिरून वीररसाचा लोप झाला आहे व त्याचें शरीर रोमांच, घर्म व कंप यांनीं व्यापून गेलें आहे व यामुळें भयानक रस उद्‌भवला आहे.

पलायोन्मुख उत्तरानें रणांत रहावें म्हणून त्याची समजूत करतांना बृहन्नडा म्हणते.

निजवृत्तिरसीं लोभी हो ! साधो ! बुद्धि अन्यथा न करीं
निजहितलोभें धरितो शिशुहि मुखीं एक, अन्य थान करीं ॥४८॥ (वि. अ. ३)

उत्कटप्रेम दाखवावयाचें असतां मातृपयः पान करणाऱ्या बाळकाच्या उत्कट प्रेमाचा पंत नेहमीं दाखला देतात. त्यांत लोभाचें मिश्रण करून हें वर्णन पंतांनीं स्वभावोक्त प्रकारें केलें आहे. क्षत्रियाची वृत्ति काय? समर करणें. शिशुची वृत्ति काय? मातृपयःपान. मग बालक जसें उक्तप्रकारें मातृपयः पानाचें लोभी होतें तसा तूं समररसाचा लोभी हो. दुसऱ्या कशाचा नकोस. तथापि उत्तर पळूं लागलाच. तेव्हां बृहन्नडा मागें लागली. हा अर्जुन असावा असें कौरव म्हणूं लागले.

वदति असें कुरु जों तों पदशत जावोनि कुंतलीं धरिला
जाणों अपकीर्तिनदीपतित शिशु बळें करूनि उद्धरिला. ॥ ७२ ॥

या आर्येचा पहिला चरण मूळाशीं तंतोतंत जुळतो दुसऱ्यातील उत्प्रेक्षा सरस आहे. नेहमीं नदींत पडून बुडत असलेल्या मुलाना शेंडी धरूनच वर काढितात. अपकीर्तिनदी हें सुंदर रूपक आहे. हा उद्धार उत्तराला कोठं पसंत पडला ?

उत्तर म्हणे नकोगे ! पायां पडतो बृहन्नडे ! सोड ॥
जोड दिली, दुखवूं नको, केवळ पितृकरतलस्थ हा फोड ॥ ७४॥
(वि. प. अ. ३)

ही समग्र आर्या अमर झाली आहे. उत्तरानें खालेल्या धास्तीनें पहिल्या वीररसाचें करुण रसात पर्यवसान झालें आहे. हें वर्णन नवीन आहे.

युद्धाला आरंभ करण्यापूर्वी अर्जुनानें एक बाण द्रोणाचार्यांच्या चरणीं नमनार्थ अर्पण केला. तेव्हां त्याची प्रशंसा करितांना द्रोण म्हणाले.

झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु परंतु यासम हा ॥ ७५ ॥ (वि. अ. ४.)

यात उपमेयाला उपमानाची जागा दुसरें उपमान लभ्य नसल्यामुळें दिली आहे म्हणून येथें अनन्वय अलंकार आला आहे. हा आर्यार्ध अमर झाला आहे. अर्जुन हा खड्गी आहे, धन्वी आहे इत्यादि द्रोणमुखांतून निघालेल्या अनेक मूळ विशेषणांचें हा चरण सार आहे

अर्जुनाचे मनांत दुर्योधनाला शोधून काढून त्याच्यावर मारा करावयाचा होता म्हणून त्यानें सर्व कुरुसैन्याचें निरीक्षण केलें व तो म्हणाला,

तो गुरु, तो गुरुनंदन, तो कृप, तो कर्ण,
तो पितामह रे !
यांहीं गाइ वळाव्या शिव ! शिव ! गोपाळ !
रामकृष्ण ! हरे ! ॥ ७७ ॥

पहिल्या चरणाचा अर्थ मूळांत आहे. दुसरा चरण नवीन आहे. हींत असंभावना अलंकार साधला आहे. ही आर्या अमर आहे व लग्नकार्याच्या समारंभांत भोजनप्रसंगीं ही आबालवृद्ध म्हणतात.

युद्धारंभाचें वर्णन पंतांनीं केलें आहे तें,—

सुरदत्त-धनुर्गुण-रथनेमि-ध्वजवासि-भूत-नादानीं
कांपे न चमूचि कुही, स्वकुचांच्या जेंवि पूतना
दानीं ॥ ८६ ॥

पहिला चरण म्हणजे एक दीर्घ समास आहे. तो दाबून दाबून भरलेल्या शब्दांचा गठ्ठाच वाटतो. मूळांतील दोन श्लोकांचा अर्थ दीड चरणांत आणून शेवटल्या चरणार्धांत पूतनेची उपमा पंतांनी घातली आहे. (भावार्थ) कृष्णाला आपलें स्तन प्यावयाला दिल्यावर पूतना जशी कांपावयास लागली, तशी चमू व कु (धरा) ही (सुद्धां), सुरदत्त (अर्जुनाचा देवदत्त नांवाचा शंख ) धनुर्गुण ( चापाची दोरी ), रथनेमि (रथचक्रांच्या धारा ), ध्वजवासिभूत ( ध्वजावर बसलेलीं भूतें ) यांच्या नादानें, कांपूं लागली.

ह्या दीर्घ समासाच्या दडपणांतून सुटल्यावर वाचकाला पंतांनीं मोकळेपणीं संचार करण्यास वाव दिला. कुरुसेनारूपी सागराच्या जलांत बुडालेल्या गाई बाहेर पडल्या व मोकळेपणीं संचार करण्याला त्यांना असाच वाव मिळाला. त्याचें वर्णन पंतांनीं केलें आहे. तें.

खळ बळ-जलधि- निमग्ना धेनु उसळल्या अलाबु
झाल्या हो
हांसे विजय, मनिं म्हणे कां गोपसख्या मला
बुझाल्या हो ? ॥ ८७ ॥

गेल्या पळोनि गाई पृष्ठावरि पुच्छभार वाहोनी.
राहोनि निश्चळ क्षण विजय निवे त्यांकडेचि
पाहोनी ॥ ८८ ॥

८८ व्या आर्येचा पहिला चरण मूळांत आहे बाकी भाग नवीन आहे.

गाई पुच्छें वर उभारून पळतांना पाहून विजयाचे ( अर्जुनाचे ) डोळे निवाले. तसे या आर्या वाचून वाचकांचें मनही निवेल व अर्जुन जसा क्षणभर निश्चल बसला तसे तेहि बसतील इतक्या या आर्या स्वभावोक्तीनें रमणीय झाल्या आहेत.

मग अर्जुनानें शर सोडून एक परंपरा रचिली तिचें वर्णन करतांना पंतांनीं पुढील चरण घातला आहे.

बहु कल्पना सुकविसा, विजयहि बहुशरपरंपरा
व्याला ॥ २७ ॥
( वि. अ. ५ )

या ठिकाणीं अर्जुनाच्या शरपरंपरेला सुकवीच्या कल्पनाची उपमा दिली आहे. तींत त्यांनी चांगल्या कवीची व्याख्या दिली आहे. जो चांगल्या कल्पना वितो ( उत्पन्न करतो ) तो चांगला कवि. कवि हा शब्द कु म्हणजे करणें ( उत्पन्न करणें ) या धातूपासून निघाला आहे. इंग्रजी शब्द poet हा कविवाचक शब्द सुद्धा poeo to make ( करणें ) या लॅटिन धातूपासून निघाला आहे. पंत स्वतः सुकवि असल्यामुळें त्यांची व्याख्या शास्त्रज्ञांस मान्य होईल.

कर्णाला अर्जुनानें युद्ध करण्यास आव्हान दिल्यावर कर्ण म्हणाला.

कर्ण म्हणे आलों बळ दावायास स्वतां पहायास
शोभे समरींच तसा न भटांचा भाषणीं
महायास ॥ ४६ ॥
बहु कर्म करी पंडित कथनावसरीं हि थोडकेंच वदे
शाकांत प्रवर जेंसें पथ्य हि, तैसें न दोडकें
चव दे ॥ ४७ ॥

कर्ण हा महान् वीर असल्यामुळें त्याच्या भाषणांत वीररस पुष्कळ येतो. या दोन्ही आर्या मूळास अर्थतः धरून आहेत. पण कर्माहून वाक्य अतिशय

नसावें हें मूळांतलें वचन घेऊन याप्रमाणें जो वागतो तो पंडित अशी पंडितांची व्याख्या पंतांनीं मध्येंच दिली आहे. शाकांची ( परवराची व दोडक्याची ) जी उपमा दिली आहे ती समर्पक आहे.

या युद्धांत अर्जुनापुढें दुर्योधनही पळूं लागला. तेव्हां "या पार्थाला जरा तोंड दाखव. तुझी दुर्योधनता कोठें गेली ?" इत्यादि शब्दांत पार्थानें त्याचा उपहास केला. तो व्यासांनीं थोडक्यांत चार श्लोकांत आणला आहे. पंतांचीं थोडी लहर लागली, त्यांनीं त्यांचा विस्तार आठ आर्यांत केला. त्यांतील कांहीं सोप्या व कांहीं क्लिष्ट आहेत. त्यांतील एक अशी आहे.

कांपसि भयें ? रणसमय, नव्हे हेमन्तसमय, तुझी आण
मी सत्य धनंजय, परि पार्थ, न असितपथ खरें
जाण ॥ १३ ॥
( वि. अ. ६ )

या आर्येच्या दुसऱ्या चरणांत जो धनंजय शब्द आला आहे त्याचे अर्थ १ अग्नि, २ पार्थ असे आहेत. या श्लेषाच्या आधारें पार्थानें दुर्योधनाचा उपहास केला आहे तो असाः-एखादा पराक्रमी पुरुष कोणाला तरी भिऊन कांपूं लागला आणि कोणी म्हटलें कीं, असे कांपतां काय ? भ्यालांत वाटतें ? भिणारा मनुष्य चतुर असेल तर म्हणेल "छे ! छे ! मी भ्यालों बिलों नाहीं. मला थंडीनें हिंव भरलें आहे." अर्जुन दुर्योधनास म्हणतो, " अशी तूं कांहीं सबब सांगशील तर ती खोटी आहे. तूं मला भिऊनच कांपत आहेस. पाहा कसें तें. मी पार्थ धनंजय खरा म्हणजे पृथापुत्र खरा. पण मी शपथ वाहून सांगतों कीं, मी असितपथ म्हणजे अग्नि नव्हे. मी अग्नि असतों आणि तुला खरोखर हिंव भरलें असतें, तर माझ्याजवळ हिमनिवारणार्थ तूं आला असतास. पण मी खरोखर पार्थ आहें आणि तूं मला भिऊनच कांपत आहेस; अरे हा रणसमय आहे, हिमसमय नाहीं !"

अशाप्रमाणें एकामागून एक वीर अर्जुनानें पळवून लावले व गाई सोडवून आणल्या. हें वृत्त ऐकतांच विराट म्हणाला.

वाजत गाजत साजत आज तया जतन करुनि
आणा हो ! ॥ ७५ ॥
( वि. अ. ६ )

हा चरण सामान्यतः मूळाला धरून आहे. या आर्येंत साधलेल्या यमकाला अश्वधाटी म्हणतात. सर्व चरणभर तें अश्वासारख्या उड्या मारीत जात आहे असें वाटतें.

विजयी पुत्राच्या स्वागताची तयारी केल्यावर विराट सैरन्धीला म्हणाला पट व फांसे घेऊन ये ! व मग

धर्मासि म्हणे हूं ! या ! मांडा उकलूनि रम्य
तळपट हो !
कृष्णाहि म्हणे " मेल्या अक्षकरांचें समूळ तळपट
हो ! ॥ ७८ ॥

या आर्येंत सुन्दर यमक व सुन्दर अर्थ हीं साधलीं आहेत. पहिला चरण मूळाला धरून आहे; दुसरा नवीन आहे. द्रौपदीच्या कानांत पट शब्द पडतांच तिच्या डोळ्यांपुढें सभापर्वांतील सर्व प्रकार उभे राहून तिच्या तोंडून जे अपरिहार्य स्वरूपाचे शब्द आले, तेच तिच्यासारख्या तेजस्वी स्त्रीच्या तोंडून त्या प्रसंगीं त्या परिस्थितींत जे आले पाहिजेत तेच आहेत. दुसरे आले असते तर रसपोष न होतां रसहानिच झाली असती. स्त्रीस्वभावाचीं चित्रें पंतांनीं फारच रमणीय काढलीं आहेत. द्यूत सुरू झाल्यावर विराट म्हणाला

द्यूत प्रवर्ततां तो भूप म्हणे ऐकिलेंस कंका ! तें
कुरु जिंकिले कुमारें वय तरि अद्यापि उचित
अंकातें ! ॥ ८३ ॥

पहिले तीन चरणार्ध मुळाप्रमाणें आहेत. पण अद्भुतरस उत्पन्न करणारा चवथा चरणार्ध पंतांचा नवीन आहे. या पर्वाचा शेवट उत्तरा व अभिमन्यु यांच्या विवाहांत झाला. या पर्वांत हास्य, शृंगार,

वीर, करुण अद्‌भुत इ. रसांचे छटे आहेत. उपसंहारांत पंतांनीं सर्व श्रेय रामाला देऊन भक्तिरस आणला आहे.

## उद्योग पर्व

अभिमन्यूचा विवाहसमारंभ आटोपल्यावर त्या समारंभाकरितां जमलेल्या राजांनीं एक वीरसभा भरविली. तिला श्रीकृष्ण, बलराम, द्रुपद, सात्यकि व इतर शूर व वृद्ध राजे उपस्थित होते. कौरवांनीं कपटानें मिळवलेलें पाण्डवांचें अर्धराज्य परत सामानें मिळवावयाचें असा त्यांचा विचार होता. त्याविषयीं दुर्योधनाचें मत काय पडतें तें पाहण्यास द्रुपदानें आपला पुरोहित पाठवावा असा ठराव कृष्णानें सभेपुढें आणला. बळरामानें धर्माच्या द्यूतासक्तीला जरा दोष दिला. पण त्या ठरावाला अनुमोदन दिलें. त्याविरुद्ध सात्यकीनें क्रोधभाषण केलें तें मूळांत फार सरस आहे म्हणून दिलें आहे.

यादृशः पुरुषस्यात्मा तादृशं संप्रभाषते ।
यथारूपोऽन्तरात्मा ते तथारूपं प्रभाषसे ॥ १ ॥
सन्ति वै पुरुषाः शूराः सन्ति कापुरुषास्तथा ।
उभावेतौ दृढौ पक्षौ दृश्येते पुरुषान् प्रति ॥ २ ॥
एकस्मिन्नेव जायेते कुले क्लीबमहाबलौ ।
फलाफलवती शाखे यथैकस्मिन् वनस्पतौ ॥ ३ ॥
नाभ्यसूयामि ते वाक्यं ब्रुवतो लाङ्गलध्वज ।
ये तु शृण्वन्तु ते वाक्यं तानसूयामि माधव ॥४॥
नाधर्मो विद्यते कश्चित् शत्रून् हत्वाऽततायिनः
अधर्म्यमयशस्यंच शात्रवाणां प्रयाचनम्–॥२१ ॥
अद्य पांडुसुतो राज्यं लभतां वा युधिष्ठिरः
निहता वा रणे सर्वे स्वप्स्यन्ति वसुधातले ॥ २३
( म. उ. अ. ३ )

( भावार्थः "पुरुषाचा जसा आत्मा असतो तसा तो भाषण करतो. तुझी गोष्ट तशीच झाली आहे. कांहीं शूर, व कांहीं भ्याड असे दोन पक्ष प्राबल्यानें आढळतात. एकाच कुलांत क्लीब व महाबलवान असे पुरुष निपजतात, जसे एकाच वृक्षाच्या एका शाखेवर फळें येतात दुसरीवर येत नाहींत तसे. हे हलधर ! तुझा मी हेवा करीत नाहीं, पण हे माधवा ! हें भाषण ऐकून घेणाऱ्या तुझा मला राग येतो. धर्मराजाला अणुरेणु एवढा दोष देणाऱ्या पुरुषाला अभयपणें या सभेंत बोलणें कसें शक्य होतें ? आततायी शत्रूचा वध करणें धर्म्यच होईल. धर्मराजासारख्या क्षत्रियानें याचना करणें मला मान्य नाहीं. आज आम्हीं युधिष्ठिराला राज्य मिळवून देऊं, नाहींतर सारे कौरव मारले जाऊन ते कायमचे वसुधेवर निजून राहतील." हें भाषण शिपाई गड्याला साजणारें आहे, तें सरळ असून त्यांत डावपेंच नाहींत. सात्यकीच्या भाषणाचे मूळ तेवीस श्लोक पंतांनीं सात आर्यांत आणले आहेत, त्यांत एक अशी आहे

मान धनाशिं बळेंचि द्यूतक्रीडेसिं बाहिलें कुटिलें
लुटिलें सर्वस्व अहो बलदेव ! खळांसि पाहिजे
कुटिलें ॥ ९ ॥
( उ. अ. १ )

"प्रथम पुरोहित मध्यस्थीला पाठवा; जर दुर्योधन वांटा देईल तर भाऊबंदकीनें होणारा भ्रातृक्षय वांचेल." असें सांगून कृष्ण द्वारकेला गेला. द्रुपदानें पुरोहित पाठविला त्याचें पंतकृतवर्णन अगदीं थोडक्यांत आहे; पण खुबीदार आहे.

प्रेषी द्रुपद गुरुसिं जो संमत जीवा तसाच काव्याही.
॥ २७ ॥

पंत म्हणतात. जीव ( बृहस्पति ) हा सुरांचा वाली व शुक्र हा असुराचा वाली. या उभयांस जो संमत निःपक्षपाती असा आपला गुरु शिष्टाईकरतां द्रुपदानें पाठविला. आतां व्यासांचा पुरोहित पाहा.

भूतानां प्राणिनः श्रेष्ठाः प्राणिनां बुद्धिजीविनः ।
बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठाः नरेष्वपि द्विजातयः ॥ १ ॥
द्विजेषु वैद्याः श्रेयांसो वैद्येषु कृतबुद्धयः
कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवादिनः ॥ २ ॥
स भवान् कृतबुद्धीनां प्रधानमिति मे मतिः ॥ ३ ॥
( उ. अ. ६ )

दुसऱ्या श्लोकांतील वैद्य शब्दाचा अर्थ विद्वान असा आहे. या वर्णनांत गुण पायरीपायरीनें वाढत जाऊन शेवटीं त्यांचें सार काढलेलें आहे. म्हणून येथें सार अलंकार आला आहे.

दुर्योधन इकडे साहाय्य मिळविण्याच्या तयारीला लागला. तो कृष्णाकडे गेला व म्हणाला, या लढाई-मध्यें मला साहाय्य करावें. अर्जुनही पायांशी हजर होताच. कृष्णानें दोघांस सांगितलें, "पाहा, माझ्याजवळ अर्बुद शूर गोपाळ आहेत. त्यांना नारायण म्हणतात. ते एकाला मिळतील. मी स्वतां पण न्यस्तशस्त्र. म्हणून संग्रामांत भाग न घेणारा असा आहें. तो दुसऱ्यानें घ्यावा. अर्जुनानें कृष्णालाच मागून घेतलें. दुर्योधनानें आनंदानें गोपसैन्य मागून घेतलें. त्याविषयीं पंत म्हणतात

पार्थ म्हणे गोविंदा ! न्यस्तायुध तूंच पाहिजेस मज
मागे सैन्य सुयोधन; वरहि वरायास पाहिजे
समज ॥ ४१ ॥
( उ. अ १ )

येथें विशेष अर्थाच्या मागणीवरून मागणीचा सामान्य नियम बांधला आहे म्हणून अर्थान्तरन्यास अलंकार आला आहे. तो मूळांत नाहीं. ही आर्या अमर झाली आहे.

इकडे पुरोहित कौरवांकडे गेला. त्याचें म्हणणें भीष्मासही मान्य झालें तसें कर्णाला झालें नाहीं. कर्ण म्हणाला "विराट व द्रुपद यांच्या बलाचा आश्रय करणारा धर्म मूर्ख आहे " हें वचन पंतानीं आपल्या शब्दांत स्पष्ट करून सांगितलें आहे.

निजबाहुबळें तरला मारुति, कीं अब्धिला अलाबुबळें ।
होय भला इष्टार्थग्रह उपनेत्रेंचि कीं भला, बुबुळें
॥ ११ ॥ ( उ. अ. ३ )

मारुति सागर तरून गेला तो अलाबूंचे (भोपळ्याचे) बळानें गेला नाहीं. बाहुबळानें गेला. इष्टपदार्थांचें जें आपल्याला ज्ञान होतें तें उपनेत्रानें ( चष्म्यानें ) होत नाहीं. बुबुळानेंच होतें, उपनेत्र व भोंपळे हीं अगदींच गौण साधनें. धृतराष्ट्रानें आपलें म्हणणें परतें कळविण्यास पाण्डवांकडे संजयाला पाठविलें.

संजय धर्माला भेटला, व कुशल प्रश्न झाल्यावर संजय म्हणाला " आम्हीं साम करावयास तयार आहोंत." धर्मानें उत्तर दिलें. " आम्हीं शान्ति वरूं. इंद्रप्रस्थ आम्हांला द्या. " यावर संजयानें बराच वेदान्त सांगितला. तो म्हणाला, " जीवित अनित्य जाणून त्याकरितां धृतराष्ट्र-पुत्रांचा नाश करूं नकोस."

नचेद् भागं कुरवो ऽन्यत्र युद्धात् । प्रयच्छेरंस्तुभ्यम-
जातशत्रो ।
भैक्ष्यचर्यामन्धकवृष्णिराज्ये । श्रेयो मन्ये नतु
युद्धेन राज्यम् ॥ २ ॥
( म. उ. अ. २७)

(भावार्थः "युद्धाशिवाय कौरव तुझा वांटा देत नाहींत; हरकत नाहीं. अंधक व वृष्णि यांच्या राज्यांत तुमचें भीक मागणें मला युद्धापेक्षां श्रेयस्कर वाटतें." इतकें मानभावीपणाचें भाषण क्वचितच आढळेल. पाण्ड-वांना अन्धक वृष्णि राज्यांत भीक मागण्याचा हक्क दिल्यावर त्यांना फक्त करट्या व झोळ्यांचीच उणीव पडली असती !! "आम्हीं कोणतें कर्म करावें तें ज्ञानी कृष्ण सांगेल" असें धर्म म्हणाला.

कर्मयोगी कृष्णानें कर्ममहिमा गाइला तो मूळांत आठ श्लोकांत आला आहे. तेथें पंतांनी एक सुरेख आर्या घातली आहे.

रवि-शशि-लोकपति-धराप्रमुख सकळ कर्मसिद्ध
हें समज ।
कर्मजल तृप्तिदायक वाटे नैष्कर्म्य जेविं पळस मज
॥५५॥ ( उ. अ. ३ )

कृष्ण पुढें म्हणाला—

दस्युदमन हा मुख्य क्षत्रियधर्म प्रमाण थोरांस
यास्तव मारावें या प्रभुनें दुर्योधनादि चोरांस ५७
दस्युदमनार्थ शक्रें चापकवच शस्त्र निर्मिलें आहे ५८

इत्यादि कृष्णाचें भाषण मूळाप्रमाणें पंतांनीं सरस वठविलें आहे; तथापि धृतराष्ट्र ससुत वांचावा व पाण्डवही वांचावे हें स्पष्ट करून सांगतांना व्यासांनीं

जे कृष्णाच्या तोंडीं एक दोन श्लोक घातले आहेत ते सौंदर्याची सीमाच दाखवीत आहेत. ते असेः--

वनं राजा धृतराष्ट्रः सपुत्रः । व्याघ्रास्तेवै संजय पाण्डुपुत्राः

मा वनं छिन्धि सव्याघ्रं माव्याघ्राऽनीनशन्वनात् ५४

निर्वनोवध्यते व्याघ्रो निर्व्याघ्रं छिद्यते वनम् ।

तस्माद्व्याघ्रो वनं रक्षेद् । वनं व्याघ्रंच पालयेत् ॥५५

( भावार्थ ) धृतराष्ट्र हा ससुत वनच आहे. त्यांत पाण्डव हे वाघ आहेत. वाघासकट वन तोडूं नकोस किंवा वाघ त्यांतून नाहींसे होतील असें करूं नकोस. वन तुटलें असतां वाघ मारले जातील. वाघ मारले गेले तर भीति नाहींशी झाल्यामुळें वन तोडलें जाईल. म्हणून वाघांनीं वनाचें रक्षण करावें व वनानें वाघाचें रक्षण करावें.

येथें निसर्ग रक्षणीय असें वन व आंत स्वतंत्रपणें भुरकणारे वाघ यांचें चित्र काढून परस्पर संरक्षणाचें नीतितत्त्व व्यासांनीं सांगितलें आहे.

संजयानें परत जाऊन धर्माचा निरोप धृतराष्ट्राला संक्षेपानें सांगितला व पुरतेपणीं उदयिक कौरवसभेंत सांगेन असें म्हणाला. मी रथवेगानें दमलों आहे असें सांगून संजय निजावयास गेला; झोंप येईना म्हणून रात्रौ विदुराशीं धृतराष्ट्र बोलत बसला.

विदुर म्हणाला “ राजा होण्यास धर्म पात्र आहे. तूं अंधत्वादि दोषांनीं त्याच्या उलट आहेस. दुर्योधनादिकांवर भार टाकून राज्य करीन असें म्हणशील तर ते पण्डित नाहींत; मूढ आहेत.”

तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला “ हे विदुरा ! तूं पाण्डवांसंबंधें करून दिलेली माझी बुद्धि सुयोधनाची गांठ पडली असतां नाहींशी होते ” असें मुळांत आहे; तें कसें घडतें तें पंतांनीं दोन दृष्टान्त देऊन स्पष्ट केलें आहे.

पाण्डव साधु यशस्कर, अयशस्कर सुत असाधु हें गमतें ।

रमतें मन उपदेशीं पुत्रस्नेहासवें पुन्हां भ्रमतें ॥९९॥

*  *  *

कथिलें नसेल तें वद, सांगावें फार काय हो कवितें ।

सेवावें सेव्य, जरि पुत्रप्रेमाम्लपित्त ओंकवितें ॥ १०१ ॥

पुत्रस्नेह हा कठीण आहे. तो मद्याप्रमाणें माझ्या बुद्धीच्या ठायीं भ्रम उत्पन्न करतो. तुझा उपदेश सेव्य आहे. त्याचें मी सुग्रास अन्नाप्रमाणें सेवन करतों. पण जसें सेवन केलेलें सुग्रास अन्न, तें सेवन करणाऱ्या मनुष्याकडून त्याला जडलेलें आम्लपित्त ओकून टाकवितें, तसें मीं सेवन केलेला तुझा उपदेश माझ्याकडून मला जडलेलें पुत्राचें प्रेम ओकवून टाकवितें. ज्याला आम्लपित्त जडलेलें नसेल, अथवा ज्यानें असा रोगी पाहिला नसेल त्याला धृतराष्ट्राच्या दाखल्याचें रहस्य कळावयाचें नाहीं.

धृतराष्ट्र पुढें म्हणाला, “ हे विदुरा ! तुझ्याजवळ सांगण्यासारखें अजून अवशिष्ट असेल तें सांग. ” तेव्हां विदुरानें सनत्कुमाराची प्रार्थना करून त्याच्याकडून धृतराष्ट्राला ब्रह्मविद्या सांगवली. तिचे मोठमोठाले सहा अध्याय आहेत. ते सर्व पंतांनीं गाळले आहेत. हा भाग इतका महत्त्वाचा आहे कीं त्यावर नीलकण्ठी टीका असूनही शंकराचार्यांना आणखी टीका करणें इष्ट वाटलें.

प्रातःकाळीं भीष्मादि सर्व वीर सभेंत संजयानें आणलेला संदेश ऐकावयाला जमले. संदेश ऐकून घेतल्यावर कर्ण म्हणाला, “लढणें हा क्षत्रियांचा धर्म आहे. आम्हीं लढणार. ” भीष्माना कर्णाचें आपातरमणीय भाषण परिणामीं हितकर वाटलें नाहीं. ते म्हणाले.

दावील सूतसुत हा हित ऐसें लेखिल्या विनाश-पथा विधिच्याहि, पतंग खळहि न वळति फल देखिल्याविना शपथा ॥ ३५ ॥ (उ. अ. ४)

भावार्थः हा सूतसुत (सूतपुत्र) लेखिल्या ( खात्रीपूर्वक गणलेल्या ) विनाश-पथा ( अहिताच्या मार्गाला ) हित ऐसें ( हिताचा आहे असें ) दावील ( करून दाखवील ) विधिच्याहि ( ब्रह्मदेवाच्याहि ) शपथा ( शपथेला ) खळ ( दुष्ट लोक ) व पतंग हे

फळ देखिल्याविना ( प्रत्यक्ष फळाचा अनुभव आल्या-शिवाय ) न वळति ( मान देऊन विनाश-पथापासून परावृत्त होत नाहींत ) ब्रह्मदेवानें शपथ वाहून सांगितलें, तरी जसे पतंग ज्योतीवर उडया घेऊन मरतात तसे खळ हे असत्पपथानें जाऊन नाश पावणार. पहिला चरण सुरेख आहे. दुसऱ्या चरणांतील पतंग-वृत्तीचा उल्लेख मूळांत आहे; पण यामध्यें दूरान्वय आला आहे. त्याला कारण पंतांची यमकप्रीति झाली आहे. त्यामुळें अर्थ चांगला असून तो पुरतेपणीं समजावयाचें कार्य दूरावतें. पण अशी उदाहरणें पंतांच्या काव्यांत फार येत नाहींत.

भीष्मांच्या मतें कर्ण जितका वाक्कुशल आहे तितका रणकुशल नाहीं. भीष्म पुढें म्हणतात.

रे ! धृतराष्ट्र ! जनित-सुतशतमिष-विष-विषम-खरत-राधे ! या ।
गंधर्वबद्धदुर्योधनमोचनवृत्त पूस राधेया ॥ ४१ ॥

घोषयात्रेंत चित्ररथापसून दुर्योधनाला पांडवांनीं कसें सोडविलें तें या राधासुताला विचारा. राधासुतच हा. हा पळावयाचा. या अर्थाच्या अनुरोधानें राधेय हा शब्द हेतुगर्भ आहे. त्याच्या उपयोगानें परिकर अलंकार साधला आहे; हा अर्थ मूळाला साधारणतः धरून आहे; पण "राधेया" या शब्दाशीं यमक साधण्याकरतां या आर्येतील पहिला चरण पंतांनीं घातला आहे, त्यांत दण्डीकवीच्या धर्तीवर रचलेला एक लांब व जड समास त्यांनीं योजिला आहे, त्याचा अर्थ,

" रे ! धृतराष्ट्र ! जनित ( उत्पन्न केला आहे ) सुतशत मिष-विष ( शंभर पुत्ररूप विषानें ) विषम व खरतर ( प्रखरतर ) आधि ( मानसिक रोग ) ज्याला असा जो तूं तो हे धृतराष्ट्र ! या राधेयाला घोषयात्रावृत्तान्त पूस.

यांत थोडा अनुप्रास आहे. याशिवाय एवढया जड समासानें पंतांनीं काय साधलें आहे तें वरवर तर दिसत नाहीं.

भीष्मांच्या किंवा धृतराष्ट्राच्या बोलण्याचा परिणाम दुर्योधनाच्या मनावर कांहीं एक झाला नाहीं. आम्हीं उभयतां एकजातीय व एकाच भूमीवर संचार करणारे; मग पांडवांचा जय कशावरून होणार ? असा प्रश्न विचारून दुर्योधनानें स्पष्ट सांगितलें.

। यावद् हि सूच्यास्तीक्ष्णायाविध्येदग्रेण मारिष ।
॥ तावदप्यपरित्याज्यं भूमेर्नः पांडवान् प्रति १८
( म. उ. अ ५८ )

या मूळाचें पंतांनीं उत्कृष्ट भाषांतर केलें आहे तें असें,

अतिसूक्ष्में सूच्यग्रें जितुका भूभाग होतसे विद्ध ।
युद्धाविना न देऊन जरि ते तितुकाहि घ्यावया सिद्ध ॥ ११३ ॥ ( उ. अ. ४ )

ही आर्या अमर झाली आहे. भाऊबंदकीमध्यें ज्या भावाच्या ताब्यात वडिलार्जित मिळकत असते, त्याच्या तोंडीं या आर्येची वसति असते. या आर्येंत अतिशयोक्ति चांगली साधली आहे.

पुढें कृष्ण काय म्हणाला तें सांग असें धृतराष्ट्रानें संजयाला विचारलें. संजय म्हणाला, " मी कृष्णाला भेटलो

वदलो वाचिक मागा आलासे दास हा निरोपाला ।
कुरुसंततितुलसीच्या स्पर्शों द्यावी न हानि रोपाला ॥ ८ ॥ ( उ. अ. ५ )

मूळांतील थोडयाशा मजकुराचा गोपवारा देणारी ही आर्या सरळ व सोपी आहे. तींतील अर्थ आनंद देणारा आहे. कुरसंतति ही तुळस आहे हें रूपक योजण्यांत पंतांनीं फार कुशलता दाखविली आहे. तुळस ही कृष्णाला फार प्रिय आहे. म्हणून त्याच्या हातून तिच्या रोपांची हानि कशी होईल ? अशा बोलण्यानें संजयानें आपल्या राजकीय वकिलीचें काम चांगलें केलें.

कृष्णाचा निरोप ऐकून घेऊन धृतराष्ट्र म्हणाला, "मला शम पाहिजे. पार्थाशीं विग्रह नको." हें दुर्योधनाला पसंत पडलें नाहीं. तो म्हणाला "जशा नद्या

समुद्राला मिळाल्या असतां त्यांचा सर्वस्वी नाश होतो, तसे पांडव ससहाय मजसमीप आले, कीं त्यांचा नाश होईल. असें मुळांत आहे. ( पाहा महा. उ. अ. ६१ श्लोक २५।२६ ) त्याबद्दल पंतांची आर्या अशी आहे:

स्वल्पें काळें पुत्रें पांडव मथिले असेंचि परिसाल
काढिन दगडाचीही मी कोणाहि न निघेल परि
साल ॥ २५ ॥

पांडवांचा नाश मी करतों या अर्थाचा जो मूळ भाग वर दिला आहे, तो पंतांनीं वरील आर्येच्या पहिल्या चरणांत आणला आहे; पण मुळांत असलेला नद्यांचा दृष्टांत समर्पक असूनही यमकाकरितां गाळला आहे व त्या यमकाला जुळेल असा पदरचा अर्थ कोणालाही न निघेल अशी दगडाची साल मी सोलून काढीन अशी गर्वोक्ति दुर्योधनाच्या तोंडीं घातली आहे; ती त्याच्या दांडग्या स्वभावाला शोभण्यासारखीच आहे. या ओळीत अतिशयोक्ति अलंकार चांगला साधला आहे.

कर्ण दुर्योधनातर्फे बोलला. त्याचा भीष्मानी उपहास केला. तेव्हां दुर्योधन म्हणाला "हे पितामह! पार्थालाच जय येणार असें कशावरून म्हणता?" यावर पंतांनीं आर्या रचली आहे ती अशी.

गांधार म्हणे तज्जय कां? त्यां आहेत काय बा शिंगें?
कीर्तिवर म्हणुनि विधिनें बांधियलीं त्यांसि काय
बाशिंगें? ॥ ५० ॥

"पार्थालाच जय येणार असें कशावरून म्हणतां?" या प्रश्नाचे दोन प्रश्न करतां येतात ते असे. पार्थालाच जय येणार काय? असेल तर कशावरून? दुसरा प्रश्न निराळ्या शब्दांत म्हणजे "पार्थाला काय अधिक आहे?" अशा शब्दांत विचारतां येतो. तसा विचारतांना "त्यांना काय बाशिंगें आहेत?" अशी शब्दयोजना करून तो प्रश्न पहिल्या चरणांत पंतांनीं स्पष्टपणें आणला. येथें लोकोक्ति नामक अलंकार साधला आहे. या चरणाच्या शेवटीं यमक साधणारीं "बाशिंगें" हातीं लागतांच त्यांचा उपयोग करून शब्दांतरित दोन प्रश्नांपैकीं पहिला प्रश्न दुसऱ्या चरणांत पंतांनीं पूर्णपणें आणला आहे तो असा:—पांडवांना कीर्तिरूप नवरीचे वर म्हणून ब्रह्मदेवानें आधींच ठरवून त्यांच्या कपाळाला बाशिंगें बांधून ठेवली आहेत कीं काय?"

या आर्येला यमकानें शोभा आली आहे. एवढेंच नव्हे, तर भीष्मांचा उलट उपहास करण्याचा जो दुर्योधनाचा खरा मानस तो स्पष्टपणें व्यक्त झाला आहे.

शिष्टाई करण्याकरितां कृष्ण कौरवांकडे जावयास निघाला, त्या वेळीं भीम त्याला म्हणाला.

भीम म्हणे केशवजी! मृदु बोला, उग्र तो
सुयोधन हो! ।
बा! त्यासीं सख्यचि हो, युद्धीं हत एकही
सुयोध न हो. ॥ १६ ॥ ( उ.अ. ६ )

हें भाषण जवळ जवळ मुळाला धरून आहे. भीमाला न शोभणारें, अग्नीच्या ठिकाणीं शीतत्व भासविणारें हें आश्चर्यकारक भाषण ऐकून

श्रीकृष्ण म्हणे हा! रे! भीमा! जरि तूं महाभुज
गदीन ॥
भ्यालासि, होय जैसा चिंतुनि गरुडा महाभुजग
दीन ॥ १८ ॥
आम्हां तुझा भरंवसा बहु कीं खळ मर्दिसील तूं
अगदीं ।
निर्वीर्यत्व चिकित्सासमयीं आलें चिरार्जितीं
अगदीं ॥ १९ ॥
देवी गदा, द्रुपदजा अवलंबुनिया भुजाप्रति
झाल्या! ॥
लज्जेंत बुडाल्या कीं झाल्या वंध्या तुझ्या प्रतिज्ञा
त्या. ॥ २० ॥

त्या कृष्णाच्या भाषणाकडे व्यासांनीं वीस श्लोक लाविले आहेत. त्यांचें सार पंतांनीं तीनच आर्यांत आणिलें आहे, तें नामी आहे. १८ व्या आर्येतील महाभुजंगाची उपमा, व १९ व्या आर्येतील दुसऱ्या

चरणांतील समग्र ऐवज हीं पंतांचीं स्वतःचीं आहेत. कृष्ण म्हणाला "भीमा ! तूं दीर्घबाहु गदीन ( गदा-धरांमध्यें श्रेष्ठ ) असून महाभुजग ( महासर्प ) जसा गरुडाचें चिंतन होतांच भीतीनें दीन होतो, तसा तूं भिऊन दीन झालास कीं काय ? आम्हांला तुझा असा पुष्कळ भरवंसा वाटत होता कीं, तूं पूर्णपणें खळमर्दन करशील; पण आतां चिरार्जितीं ( चिरकाल संग्रहीं ठेवलेल्या ) अगदीं ( औषधींच्या ठिकाणीं) चिकित्सा समयीं ( रोगाचें निदान ठरविण्याच्या ऐन प्रसंगीं ) निर्वीर्यत्व ( गुणरहितत्व ) आलें. त्या औष-धींचा गुण नाहींसा झाला. हे ज्ञात्या ! देवी गदा व द्रौपदी या दोघींनीं तुझ्या भुजांचें अवलंबन व्यर्थ केल्यामुळें त्या लज्जेंत बुडाल्या आहेत व तुझ्या साऱ्या प्रतिज्ञा निष्फल झाल्या आहेत." अर्थात् हें भाषण भीमाला चेव आणण्याकरितां केलेलें आहे.

कृष्णाला निरोप देतांना धर्म म्हणाला " धृतराष्ट्रां दिकांस वंदन करून कुशल विचार."

त्यां पुशिलें कुशल असें कर्णासिं, सुयोधनासिं सांगावें ।
येतां पंचम, दाटुनि कर्णकटु पिकें शिकोनि कां गावें ? ॥३९॥

ज्याचा स्वर उपजतच कडु तो काक शिकूनही मधुर शब्द कण्ठांतून काढूं शकणार नाहीं. मग ज्या पिकाला पंचम येतां ( उपजतच मधुर शब्द काढतां येत असतां ) त्यानें मुद्दाम शिकून कडु असें कां गावें ?

हा सुंदर दृष्टान्त पंतांच्या पदरचा आहे. यानें गोड बोलण्याचा धर्माचा जो भाव होता, तो पंतांनीं फारच बहारीनें वरील आर्येंत आणला आहे.

कृष्ण येतो म्हणून त्याच्या स्वागताची तयारी उत्तम ठेवा. जी जी वस्तु आपल्या संग्रहीं आहे व जी जी घेण्यास तो पात्र आहे, ती ती वस्तु त्याला अर्पण करा असें धृतराष्ट्रानें सुचविलें. विदुर म्हणालाः—तूं वित्तार्पण करून कृष्णाला पाण्डवपक्षांतून निराळा काढावयास पाहत आहेस. त्याला जें प्रिय असेल तेंच अर्पण कर. कपट नको.

गुळखोबरें विलोकुनि भलत्याहि जनासिं बाळक वळावा ।
सत्य प्रेमचि दावुनि सुज्ञें तो विश्वपाळ कवळावा ॥ ९ ॥ ( उ. अ. ७ )

ही आर्या सरळ व सोपी असून अमर झाली आहे.

विदुर म्हणतो " हे धृतराष्ट्रा, तूं कृष्णाला बाळ समजतोस कीं काय ? म्हणजे हातावर गूळखोबरें ठेवावें व भलत्यानें (हवे त्यानें) त्याला वळवावें.अरे ! तो बाळ नसून विश्वाचा पालन करणारा आहे. जो सुज्ञ असतो, तो जाणतो कीं खऱ्या निर्मळ प्रेमानेंच हा कृष्ण वळला जातो–आपलासा करतां येतो." हींत भक्तिरस ओतप्रोत भरला आहे. या आर्येवर प्रवचन करून कित्येक हरिदास कीर्तनाला फार रंग आणतात.

दुर्योधनानें निराळीच कल्पना काढली ती अशी कीं कृष्णाला बन्धनांत टाकावें. हें ऐकून धृतराष्ट्रानें त्याची तात्काळ कानउघाडणी केली. धृतराष्ट्र म्हणाला,

बंधार्ह नव्हे आला सामार्थ वरूनि दूतपण साचें ।
बाहेरि गमे नीरस परि अंतर मधुर पूत घणसाचें ॥ २४ ॥

हा कृष्ण दूतकर्म करावयास आला आहे. त्याला आंतरराष्ट्रीय नीतीप्रमाणें पकडतां येत नाहीं. हा वरून तुला कसाही दिसला, तरी आंतून त्याचा हेतु चांगला आहे. फणस वरून सकंटक दिसतो, पण आंतून गोड व रसाळ निघतो. हा दृष्टांत पंतांचा पदरचा आहे. कृष्णाच्या नगरप्रवेशाचें वर्णन महाभारतांत आहे, त्यांत पुढील दोन श्लोक आले आहेत.

आवृतानि वरस्त्रीभिर्गृहाणि सुमहान्त्यपि ।
प्रचलन्तीव भारेण दृश्यन्तेस्म महीतले ॥ ९ ॥
तथाच गतिमन्तस्ते वासुदेवस्य वाजिनः
प्रणष्टगतयोऽभूवन् राजमार्गे नरैर्वृते ॥ १० ॥
( महा. उ. अ. ८९ )

( मथितार्थ ) गृहें स्त्रियांनीं व राजपथ पुरुषांनीं भरून गेलीं होतीं. हें मूळ चित्राचें स्थूल स्वरूप होय. गृहें किती गच्च भरलीं होतीं ? तर तीं स्त्रियांच्या भारानें हलूं लागलीं कीं काय असा भास होत होता. राजपथांत गर्दी किती होती ? तर नगरप्रवेश करण्या-पूर्वी जे घोडे वेगानें चालत होते, त्यांचा वेग नष्ट झाला ! अशा सुंदर चित्रांतील अर्धचित्र पंतानीं गाळलें व दुसरें अर्ध तेवढें घेतलें पण त्यांत काय केलें तें पाहा--

धृतराष्ट्रगृहा नेती राजपथीं हळुहळूच हरि हरितें।
त्यां पशु म्हणेल तो पशु, त्यांचें सकृपत्व अतुल हरि ! हरि ! तें ॥ ३३ ॥

( भावार्थ ) हरि ( घोडे ) राजपथांतून हरितें ( श्रीकृष्णाला ) हळु हळु राजपथीं चालून धृतराष्ट्र-गृहा नेती ( नेते झाले ) त्यांचें ( त्या घोडयांचें ) सकृपत्व ( कृपाळुपणा ) पथांतून हळु हळु चालून नागरिकांना कृष्णदर्शन सावकाशपणें करूं दिल्यानें अतुलच होतें. तें हरि ! हरि ! ( आश्चर्य नव्हे काय ? ) अशा घोडयांना जो पशु म्हणेल, तोच पशु समजावा ! नगरांत प्रवेश करतांच घोडयाचा वेग कमी झाला व तेणें करूनच कृष्णदर्शन लोकांना सावकाश झालें हें अधिक सांगितल्या शिवाय कळतेंच आहे; मग मुळांतील अर्ध चित्र गाळून दुसऱ्या अर्धांत पशूंना उच्च कोटींत आणून त्यांना पशु म्हणणाऱ्यांना नीच कोटींत आणून पंतांनीं जो कृत्रिमपणा वर्णनाला आणला आहे त्यानें व्यासांच्या स्वभावोक्त अनलंकृत मूळ चित्राची निसर्गरमणीयता दूषित केली आहे. एवढें कशाकरतां ? तर एक साधारण यमक साधण्या-करितां व त्या यमकाच्या सिद्धीकरितां थोडी अलंकृत भाषा वापरण्याकरितां; पण अशीं स्थळें थोडींच.

कृष्णाचा आदरसत्कार झाला. विदुराची भेट घेऊन कृष्ण कुन्तीला भेटला. त्या दोघांचा संवाद झाला, त्याकडे व्यासांनीं एक अध्याय जवळ जवळ शंभर श्लोकांचा लावला आहे. त्याच्या पंतांनीं १६।१७ आर्या केल्या आहेत. त्या नेहमींच्या उच्चपद्धतीच्या आहेत.

तथापि पुढील मुळांतील चरण अधिक सुंदर आहेत.

भूयांस्ते हीयते धर्मो मा पुत्रक वृथाकृथाः ॥७३॥
× + ×
यदर्थं क्षत्रिया सूते तस्य कालोयमागतः ॥७५॥
× द्रौपद्याःपदवींचर ॥ ८० ॥
( म. उ. अ. ९० )

( भावार्थ ) हे माधव ! धर्मात्म्याला ( धर्माला ) जाऊन सांग कीं, तुझ्या आजपर्यंतच्या धर्माचरणानें बहुत हानि झाली आहे. तर त्याचें व्यर्थ आचरण करीत बसूं नकोस. त्या अर्जुनाला व भीमाला सांगः--अहो ज्याकरितां क्षत्रिय स्त्री प्रसूत होते, तो काळ आला आहे ! आणखीही सांग कीं तुम-च्यानें कांहीं होत नसल्यास द्रौपदीची पदवी ( घर कामाचा धंदा ) पत्करा " या भाषणांत जी खोंच आहे ती पंतकृत आर्यांत आली नाहीं.

कुन्तीचें समाधान करून कृष्ण दुर्योधनाला भेटला, त्यांचा थोडा प्रास्ताविक संवाद झाला, त्या-वेळेच्या कृष्णाच्या भाषणशैलीचें वर्णन व्यासांनीं केले आहे, तें वाचनीय असून पंतांनीं गाळलें असल्यामुळें येथें दिलें आहे.

स एवमुक्तो गोविन्दः प्रत्युवाच महामनाः ।
उद्यन्मेघस्वनः काले प्रगृह्य विपुलं भुजम् ॥१६॥
अलघूकृतमग्रस्तमनिरस्तमसंकुलम् ।
राजीवनेत्रो राजानं हेतुमद्वाक्यमुत्तमम् ॥१७॥
( म. उ. अ. ९१ )

भावार्थ ( याप्रमाणें दुर्योधन कृष्णाला बोलला असतां, त्या महाराय गोविन्दानें उत्तर दिलें; तेव्हां त्यानें आपला भव्य बाहु वर उचलला होता. त्याचा स्वर वर आकाशांत चढणाऱ्या मेघाप्रमाणें गंभीर होता, तो बोलतांना कमी पडला नाहीं, अक्षरें गळलीं नाहींत, तीं जुळलेलीं जेथल्या तेथेंच होतीं व त्यांच्या अर्थाचा गोंधळ होत नव्हता. याप्रमाणें त्या

कमलाक्षाचें राजांना उद्देशून केलेलें सर्व भाषण तर्कशुद्ध होतें.) भाषण कसें करावें तें येथें व्यासांनीं स्पष्ट करून सांगितलें आहे.

दुर्योधनानें भोजनाचा आग्रह केला, तो कृष्णानें मान्य केला नाहीं, तो विदुराकडे भोजनाला गेला.

विदुरान्नानि बुभुजे शुचीनि गुणवन्तिच ॥ ४१ ॥
(महा. उ. अ. ९१)

म्हणजे विदुरानें वाढलेल्या पवित्र व चांगल्या अन्नाच्या प्रकारांचें कृष्णानें सेवन केलें एवढेंच मुळांत आहे त्याचा विस्तार पंतांनीं दोन उत्कृष्ट आर्यांत केला आहे.

शतसंख्य वाचवी ज्या जेववितां माय देवकी
चिटक्या।
तो नित्यतृप्त भगवान् विदुरगृहीं भोजनांत दे
मिटक्या ॥ ७६ ॥
आले ढेंकर दिधल्या मिटक्या बहुसाल मारिले
भुरके।
उरके सर्वा मागुनि अशन, परि न ताट चाटणें
उरके ॥ ७७ ॥

शहात्तराव्या आर्येच्या पहिल्याचरणांत वत्सलता भरली आहे व बाकीच्या सर्व भागांतून भक्तिरस आकण्ठ भरून वाहत आहे. या कामांत मोरापंतांचा हातखण्डा आहे. कृष्णाला तें अन्न इतकें रुचकर वाटलें कीं, जा नित्य तृप्त म्हणून ज्याला लहानपणीं भरवतांना माय देवकीला शेंकडों चिटक्या वाजवाव्या लागत, तोच भगवान् आतां विदुरगृहीं या शुचिभोजनांत मिटक्या मारूं लागला. त्यानें ढेंकर किती दिले! भुरके किती मारले! साऱ्यांचें जेवण झालें, तरी त्याचें संपलें नाहीं! शेवटीं तें संपलें, तरी ताट चाटणें संपलें नाहीं! केवढी गोडी ही! या आर्या अमर झाल्या आहेत. शंभरांपैकीं शंभर गुण मिळणाऱ्या आहेत. प्रातः कृष्ण कुरुसभेंत येऊन बसला व त्यानें कौरवकुळाचा मोठेपणा वर्णन करून कुलाचाराची व्याख्या सांगितली.

दुखः परासि न द्यावें सत्य वदावें क्षमा न सोडावी।
जोडावी कीर्ति, असी कुलरीति तुम्हीं कधीं न
मोडावी ॥ ६ ॥
(उ. अ. ८)

ही आर्या अर्थतः मुळाला धरून असून अमर झाली आहे. सार काढण्याचें चातुर्य हींत पंतांनीं दाखविलें आहे

नंतर लोभमार्गानें फार पुढें गेलेल्या पुत्रांस आंवरून धर व पाण्डवांशीं साम्य कर असें धृतराष्ट्राला कृष्णानें सांगितलें. व्यासांना हें भाषण मानवलें. 'अहंकार सोडून दे, असें परशुरामानें, "गर्व सोड" असें कण्वानें, "आग्रह हिताचा नाहीं" असें नारदानें दुर्योधनाला सांगितलें. (या प्रसंगीं हे सर्व या सभेंत उपस्थित होते असें महाभारतांत आहे.) मग आम्हीं सांगून थकलों, तूं यत्न करून पाहा असें कृष्णाला धृतराष्ट्रानें विनविलें. कृष्णानें उपदेश केला तो व्यर्थ गेला, अशा अर्थाची आर्या पंतांनीं घातली आहे.

परि तो न घेत लेशहि आंत जसा कलश पालथा नीच!
अहितकरत्व स्वमतें कल्पी अल्पायु बाल थांनींच
॥ ५ ॥ (उ. अ. ९)

पहिल्या चरणांत पालथ्या घागरीवर पाणी ही म्हण घालून लोकोक्तिनामक अलंकार साधला आहे. कवींचा अर्थ वाचकांच्या मनांत स्पष्टपणें उतरण्यास म्हणींचा उपयोग चांगला होतो. कारण त्यांतील तत्त्व लोकांस आधींच मान्य झालेलें असतें. दुसऱ्या चरणांत हाच अभिप्राय दृष्टान्तानें अधिक स्पष्ट केलेला आहे. अल्पायु बालक पुष्टि देणाऱ्या मातृस्तन्याला अहिताचें असें उलट समजतें. तसें ह्या अल्पायु (मूर्ख) दुर्योधनानें कृष्णाच्या उपदेशामृताला अहिताचेंच मानलें. ही आर्या पंतांची स्वतंत्र आहे.

दुर्योधन कसाही असला, तरी त्याच्या अंगीं क्षत्रियवृत्ति बाणलेली होती हें खास; तो म्हणाला,

उद्यच्छेदेव न नमेदुद्यमो ह्येव पौरुषम्।
अप्यपर्वणि भज्येत न नमेदिह कर्हिचित्!॥१९॥
(म. उ. अ. १२७)

( भावार्थ ) मान वर करून चालावें; वांकूं नये; ताठ मान करून चालण्यांतच खरा पराक्रम आहे. जसा कळकाचा वांसा पेराचा भाग सोडून मध्येंच मोडतो, तसें मोडून जावें; पण केव्हांही वांकू नये ! ह्या श्लोकाचा अर्थ पंतांनीं एका आर्येंत आणला आहे तो असा,

अपराध काय ? म्हणतां कां सर्व युधिष्ठिरा करीं नमनें
मी क्षत्रिय मानातें सोडुनि, हें मान्य का करीन मनें ?
॥ ३३ ॥

कृष्णानें त्याच्या अपराधाचे पाडे वाचले.

गान्धारी म्हणाली "हा अन्याय पुरे झाला, आतां शम कर."

मातेच्या उपदेशाला लंघून दुर्योधन उठून गेला व पांडवांचा मूळाधार जो कृष्ण, त्यालाच बद्ध करूं असा विचार शकुनीजवळ त्यानें केला. त्याविषयीं धृतराष्ट्र म्हणाला.

दुर्ग्राह्यः पाणिना वायुः दुःस्पर्शः पाणिना शशी ।
दुर्धरा पृथिवी मूर्ध्ना, दुर्ग्राह्यः केशवो बलात् ॥४९
( म. उ. अ. १३० )

( भावार्थ ) हातानें वायूला धरणें जसें कठीण, चंद्राला हात लावणें जसें कठीण, पृथ्वीला डोक्यावर घेणें जसें कठीण; तसें केशवाला बळानें जिंकणें कठीण. याविषयीं पंतांची आर्या आहे ती,

केवळ बाळचि इच्छी विधुसि धरायासि ! कां वरा इच्छी ? ।
म्हणते सभा तुज जसी, पिकरिपुकाकासि आंबराइ छी ! ॥ ३ ॥
( उ. अ. १० )

( भावार्थ ) विधुसीं धरावयास केवळ बाळच ( असमंजस मनुष्य, दुर्योधन ) इच्छी, ( इच्छा करतो ) वरा ( शहाणा मनुष्य ) कां इच्छी ? ( इच्छा करणार नाहीं. ) जशी आंबराई पिकाचा रिपु जो काक, तो तीवर बसला असतां, त्याला 'छी' म्हणते ( त्याचा धिक्कार करते ) तशी, ही सभा तुज ( हे दुर्योधना ! तुला ) "छी" म्हणते ( तुझा धिक्कार करते. ) येथें सभा म्हणजे भीष्मादिक सर्व उपमेय समजावे; आंबराई हें उपमान समजावें. छी म्हणणें हा साधारण धर्म समजावा; जसी हें उपमान-वाचक शब्द समजावा. ही उपमा जशी अभिजात आहे, तशी ही आर्याही अभिजात आहे असल्या यमकालंकृत आर्येंतील अर्थ कधीं कधीं मुळापासून भिन्न असतो. पण तो जेव्हां मुळाप्रमाणेंच असतो, तेव्हां त्या आर्येला अधिकच बहारीची शोभा येते. ( पाहा आर्या ५०. उ. अ. ५ )

मग कृष्ण उठून कुन्तीला भेटावयास गेला. तिनें प्रत्येक पुत्राला पृथक् पृथक् निरोप सांगितला. धर्माला निरोप सांगतांना कुंती म्हणाली.

धर्माला सांग. तुझा धर्म पुरे झाला. राजा काल-प्रवर्तक असतो. राजधर्माचा व दंडनीतीचा अवलंब करून कृत द्वापारादि युगें राजा घडवून आणतो.

कालोवा कारणं राज्ञः राजा वा काल कारणम् ।
इति ते संशयो मा भूत् राजा कालस्य कारणम्
॥ १६ ॥ (महा. उ. अ. १३२)

( भावार्थ ) काल हा राजांचें कारण आहे कीं राजा कालाचें कारण आहे याविषयीं तुझ्या मनांत संशय येऊं देऊं नकोस. राजाच कालाचें कारण आहे. राजनीतिविषयक मोठा सिद्धान्त कथन करणारा हा श्लोक पंतांनीं गाळला आहे म्हणून दिला आहे. आपल्या म्हणण्याला आधार म्हणून क्षत्रीय स्त्री जी विदुला तिचा व सिंधुराजाला भिऊन रणांतून पळून आलेला तिचा पुत्र जो संजय यांचा झालेला संवाद कुन्तीनें सांगितला. तो उत्कृष्ट आहे. त्याचा उत्कृष्ट-पणा पंतांनीं यत्किंचितही ढळूं दिला नाहीं. मुळांत व्यासांनीं त्याचा विस्तार चार अध्यायांत १५० श्लोक लावून केला आहे. त्याचें सार पंतांनीं अवघ्या १३ आर्यांत आणलें आहे. रसहानि केल्याशिवाय थोडक्यांत सार काढणें ही पंतांची आणखी एक

महत्त्वाची खूण आहे असें मागील उदाहरणांवरून सिद्ध झालेंच आहे. पंतांच्या आर्या देण्यापूर्वी विदुलेच्या भाषणाचा पंतांनीं न घेतलेला कांहीं भाग रम्य म्हणून आधीं दिला आहे.

अनन्दन मया जात द्विषतां हर्षवर्धन ॥
न मया त्वं न पित्राच जातः क्वाभ्यागतोह्यसि ५
सुपूरा वै कुनदिका सुपूरो मूषकांजलिः ।
सुसंतोषः कापुरुषः स्वल्पकेनैव तुष्यति ॥ ९ ॥
मुहूर्तं ज्वलितं श्रेयो नच धूमायितं चिरम् ॥ १५ ॥
शत्रुर्निमज्जता ग्राह्यो जङ्घायां प्रपतिष्यता ॥ २० ॥
किमद्यकांना ये लोकाः द्विषन्तस्तानवाप्नुयुः ।
येत्वाहतात्मना लोका सुहृदस्तान् व्रजन्तुनः ॥ ४० ॥
( महा. उ. अ. १३३ )

विदुला म्हणते, माझ्यापासून झालेल्या हे ! कुन-नंदना ! हे ! शत्रूचा हर्ष वाढविणाऱ्या ! तूं माझ्यापासून झाला नाहींस, पित्यापासून झाला नाहींस ! तूं कोठून तरी दुसरीकडून आला आहेस. क्षुद्र नदीला मोठा पूर तेव्हांच येतो. उंद्रीणीची ओंझळ लागलीच पुरतेपणीं भरते. सदा संतुष्ट असणारा वाईट पुरुष थोडक्यानें संतुष्ट होतो. ९. प्रज्वलित होऊन मुहूर्तभरच टिकणें चांगलें; पण चिरकाल धुमसत राहणें बरें नाहीं. १५. हा श्लोकार्ध फार तेजस्वी आहे. तो अमर झाला आहे. बुडतां बुडतां शत्रूला घेऊन बुडावें व सपशेल पडतां पडतां शत्रूला घेऊन पडावें. २०. “ आजच काय अडलें आहे ? उद्यां बघून घेतां येईल ” असें म्हणणाऱ्यांस जे लोक ( स्वर्गनरकादि ) कृतकर्माचीं फळें म्हणून प्राप्त होतात, ते लोक ( फळें ) आमच्या शत्रूंना प्राप्त होवोत; आणि तुझ्या स्वभावापासून भिन्न अशा स्वभावांच्या क्षत्रियांना जे लोक (स्वर्गादि फळें) प्राप्त होतात, ते आमच्या मित्रांना प्राप्त होवोत. ४०. या श्लोकांत “ आजच काय अडलें आहे ? उद्यां बघून घेतां येईल !” असें म्हणणाऱ्या लोकांचा वाचक असा शब्द जो “ आद्यक ” तो फार सरस आहे. तो साहित्यिकांनीं प्रचारांत पुन्हा आणून राखून ठेवण्यासारखा आहे. बाकीचा भाग मोरोपंतांनीं आपल्या आर्यांत आणला आहे तो असा.

विदुला म्हणे, अहा ! रे ! क्लीबा ! मंदा ! कसा पळालास !
कां वांचलासि अयशस्कर ऐसा तूं न कां गळालास ? ॥ ३५ ॥
अरि हरिल राज्य मग तूं वरिशिल वृत्त्यर्थ काय माधुकरी ? ॥
सुखकर सुकर्म टाकुनि, असुखकर कुकर्म कोण साधु करी ॥ ३६ ॥
मद्यौवन संजय हे ! निज नामहि बुडविलें तुवां दगडें।
रगडें यशोर्थ, अरिरथचक्रांहीं स्पष्ट लोष्ठसा रगडें ॥ ३७ ॥
जेणें लज्जित व्हावें स्वर्गी सहपूर्वजें तुझ्या तातें ।
परमानुचित पलायन, कैसें केलें तुवां कुजाता ! तें ? ॥ ३८
मरण विहित, न पलायन,भीती धर्मज्ञ राजकन्या,या ।
अन्या याहुनि अधिका घडल्याही न गणतीच अन्याया ॥ ३९॥

* * *

अधमा तुवां मरावें, क्षणहि न बुडवूनि मान वांचावें,
काळा यासम अन्यहि जे असतिल, त्यांहि मानवां चावें ” ॥ ४१ ॥
तो संजय तीस म्हणे, पुत्राच्या इच्छितीस कां मरणा ? ।
वांछिति शमा अकाम प्राज्ञ, इतर इच्छिति सकाम रणा. ४१
रडशील सस्नुषा कीं मज जरि देइल परासुता समर।
न म्हणेल स्वप्नींही, शतपुत्राही परा सुतास ‘मर’ ॥ ४२ ॥
जी व्यर्थ उभय लाकानुपयुक्त अपत्य वाढवी, तीतें।
स्पष्ट करी वात्सल्य, ज्ञाते जन म्हणति गाढवी तीतें ॥ ४३ ॥

निजलासि काय ? उठ रे ! जय पावतसे सदा समरशील ।
उत्साह टाकितां तूं दैन्यें सांगत सदास मरशील ॥ ४५ ॥
संजय म्हणे नमस्ते ! जननि जन निशाकरें जसा निवतो ।
बोधें तसा निवालों न हितकर गुरूपदेशसा शिव तो ४६
(उ. अ. १०)

या संजयानें समर केलें व सिंधुराजाला जिंकलें हें सांगावयास नकोच. हें विदुलेचें भाषण व्यासांनीं म्हटल्याप्रमाणें सुचित्रार्थपदाक्षर असें आहे. तें अमर झालें आहे.

जयाची इच्छा करणाऱ्यानें हा जयनामक इतिहास श्रवण करावा. हा "पुंसवनं" आहे. गर्भिणीनें ऐकला असतां तिला वीरपुत्र प्राप्त होतो अशी व्यासांनीं फलश्रुति या विदुलोपाख्यानाची सांगितली आहे. तींत अतिशयोक्ति अगदीं नाहीं.

पुढें कुंती नकुळाला निरोप सांगतांना म्हणाली,

अयशस्कर तोक पळहि मळवाया धाम बा ! न रांगावें ।
जरि न गमेचि, तरि सुखें चित्ररचित रामवानरां गावें. ५५

अयशस्कर तोक (मूल) पळभरही घरांत रांगून धाम (गृह) न मळवो. असलें मूल नसलें तरी चालेल. पण कोणी म्हणेल मुलाशिवाय आम्हांला गमत नाहीं, (करमत नाहीं, आमचा वेळ जात नाहीं) तर भिंतीवर रामवानरांचीं चित्रें काढून त्यांना गावें (त्यांची पूजा, स्तुति करावी) म्हणजे पुण्य तरी लागेल. ही आर्या पंतांची स्वतंत्र आहे.

भेद पाडून कर्णाला पाण्डवांच्या बाजूस आणण्याकरितां कृष्णानें कर्णाला समजाविलें कीं, तूं कुन्तीचा प्रथम कानीन पुत्र आहेस. कर्ण वळला नाहीं. त्यानें कृष्णाला विनविलें कीं, हें वृत्त धर्माला सांगूं नकोस. सांगशील तर तो आपलें राज्य ग्रहण न करतां कुन्तीचा प्रथम पुत्र व आपला ज्येष्ठ बन्धु म्हणून तें मला अर्पण करील व मी तें प्राप्त झाल्यावर दुर्योधनाला स्नेहाखातर देईन. एवढें जें मुळांत आहे तेवढेंच पंतांनीं एका आर्येंत आणलें आहे. तथापि त्या आर्येंत जें एक तीन अक्षरी तीन शब्दाचें यमक आहे, त्यानें तें पुन्हा फार खुबीनें सहजपणें अधिक स्पष्ट झालें आहे.

राज्य न करील देइल धर्म मला उमजतांचि हें नांतें ॥
देईन सुयोधना मीं तेव्हां होइल तुम्हांसि हें ना तें ॥ ८९ ॥

ज्या राज्याकरतां तुम्हीं लढाई करणार, तेंही तुम्हाला नाहींसें होईल. क्षत्रक्षयार्थ तुमच्या मनांत युद्ध करावयाचें आहे तेंही थांबेल. तुम्हाला हें (राज्यही) नाहीं व तें (युद्धही) नाहीं अशी तुमची गत धड ही ना ती अशी होईल. अशीं गम्मत करणारीं यमकें साधणें ही एक पंतांची स्वत्वाची खूण आहे असें मागें आलेल्या अनेक उदाहरणांवरून सिद्ध झालेंच आहे.

आपली माता म्हणून कर्ण वळला तर पाहावयास कर्णाकडे कुन्तीला श्रीकृष्णानें पाठविलें. कर्ण कांहीं नियम आचरीत होता, तेव्हां ती जरा थांबली. नियम संपला.

नियमान्तीं कुन्तीतें पाहूनि म्हणे धरून राग मनीं
राधेय आधिरथि मी तुज नमितों काय कार्य आगमनीं ? ॥ ८ ॥
(उ. अ. ११)

कर्णाचा बाळपणींच कुन्तीनें त्याग केला असल्यामुळें तिच्यावर त्याचा राग होताच. तो दाखवीत, व त्याग केला असतां त्याचें पोषण करणारीं जीं माणसें भेटलीं त्या गरीब माणसांचा अभिमानानें व स्वात्मत्वानें उल्लेख करीत कर्ण म्हणाला "हा राधेय, आधिरथि मी तुला वंदन करतों." व तिनें त्वरित मुखावर

यावें म्हणून पाल्हाळ केल्याशिवाय "कां आलीस ?" असें कर्णानें कुन्तीला एकदम विचारिलें यांत एकदम मुद्यावर येण्याचा शिपायी गड्याचा बाणा दिसून येत आहे. मूळ संस्कृत श्लोक फार गोड आहे म्हणून दिला आहे.

राधेयोऽहमाधिरथिः कर्णस्त्वमभिवादये ।
प्राप्ता किमर्थं भवती ब्रूहि किंकरवाणि ते ॥
॥ १ ॥ (म. उ. अ. १४५)

या समग्र श्लोकाचें भाषांतर पंतांनीं फारच कौशल्यानें आर्येच्या एका चरणांतच आणलें आहे असें वरील आर्येचा दुसरा चरण वाचला म्हणजे दिसून येईल. कुन्तीही एकदम मुद्यावरच बोलूं लागली.

कुन्ती कर्णासि म्हणे, वत्सा ! कौंतेय, तूं न राधेय ।
'राधे' यथेष्ट म्हण परि कर्णा ! कर्णासि फार बाधे य ॥ ९ ॥
हें मात्र न ऐकवती, सुखद मला मनुदु-मिलित राधेय ।
कानीन पुत्र माझा कर्णा ! कौंतेय तूं, न राधेय ॥ १० ॥

कर्णाच्या तोंडचा "राधेय" शब्द उचलून कुन्ती चतुरपणें व मोठ्या समयसूचकपणानें, तत्काल म्हणाली "कर्णा ! तूं कुन्तीचा पुत्र आहेस, राधेचा नाहींस. तूं "राधेय" या शब्दांतील राधे, राधे, हे शब्द हवे तितके वेळां घोकीत बस. पण माझ्या कर्णाला तूं राधेय या शब्दांतील 'य' हें अक्षर, जें तुला खऱ्याखुऱ्या कुन्तीपुत्राला राधापुत्र बनवितें, तें माझ्या कानांत बाधा उत्पन्न करतें. राधेय हे एकत्रित वर्ण माझ्यानें ऐकवत नाहींत. पण ते रा, धे, य असे निरनिराळे घेऊन म, नु, दु या निरनिराळ्या वर्णांशीं अनुक्रमानें पृथक्पणें मीलित म्हणजे संयुक्त झाले, तर ( म्हणजे रा, धे, य या वर्णांचे राम ( बलराम ) धेनु ( कृष्णाला प्रिय अशा गाई ) व यदु ( थोर यदुवंशाचा मूळ पुरुष ) असे झालेले शब्द सुखद होतात. या कोटया सुन्दर आहेत. पंतांच्या स्वतःच्या आहेत. त्या पंडितांच्या सभेंत पंडितांच्या तोंडींच शोभतील. पण व्यवहारांत कुंतीसारख्या स्त्रीच्या तोंडीं कर्णासारख्या कृतज्ञ पुरुषाचा भेद करण्याला कितीशा उपयोगी पडतील हें चिंत्यच आहे. कदाचित् कर्णासारख्या वीराचा कुन्तीवर एकदम तिनें त्याचा केलेला त्याग आठवतांच कोप होईल, तो टाळण्याकरितां अथवा त्याची तीव्रता कमी करण्याकरितां कुन्ती अशा कोटया करीत बसेल असें संभवतें. कसेंही असो, ही राधेय शब्दावरची कोटी पंडितांना प्रिय झालेली आहे. वर दिलेल्या कारणाकरितां तिच्या अंगीं थोडें प्रयोजकत्व आहे. पण तो मूळ हेतु सोडून देवून कोणी कवि नुसत्याच शब्दकोटया करीत बसेल, तर तो कवि लघुच समजला जाईल, " तूं माझें नातें मनांत आणून कौरवपक्ष सोडून पांडवपक्षाकडे येऊन त्यांच्यासह राज्य भोग" ही जी कुन्तीची मुख्य विनंति ती कर्णानें ऐकून घेतली. कर्ण हा सर्व प्रकारें शूर होता. मातेचें कर्तव्य कुन्तीनें केलें नाहीं म्हणून तिची कर्णानें जी निर्भर्त्सना केली आहे तींत त्याचें वाक्शौर्यही दिसून येत आहे. तें मुळांत आहे तसें पंतांनीं आपल्या आर्यांत आणलें आहे. त्यांतील एक अशी आहे.

अरिहि न करिल असें त्वां केलें. कां नख न लाविलें जननी ? ॥
जन नीच मज न म्हणते, परि काय करिल नियतिला जननी ॥ २३ ॥

तूं माता नसून शत्रु ठरलीस. याहून मी जन्मतांच माझ्या गळ्याला नख लावून माझा जीव कां घेतला नाहींस ? मग मला लोक नीच कुळांतला तरी समजले नसते ! पण हा तुझा दोष नव्हे. हा दैवाचा खेळ आहे. तेथें तूं माझी जननी तरी काय करणार ! नख लावणें हा लोकप्रवादाच्या उल्लेखानें लोकोक्तिनामक अलंकार साधला आहे. शिवाय दाम यमकें साधलें आहे.

कर्णानें कुंतीची विनंति बहुतेकांशीं मान्य केली. मूळ श्लोक सुंदर आहे. कर्ण म्हणाला.

न ते जातुन शिष्यन्ति पुत्राः मंच यशस्विनि !
निरर्जुना सकर्णा वा सार्जुना वा हते मयि ॥२३॥
(म. उ. अ १४६)

युद्धांत अर्जुन पडेल अथवा मी पडेन, असें समज. पहिली गोष्ट घडून आली, तर अर्जुनाशिवाय व माझ्यासकट तुझे पांच पुत्र शेष राहतील. दुसरी गोष्ट घडली, तरी माझ्याशिवाय व अर्जुनासकट पांच शेष उरतील. मिळून कसें झालें तरी तुझे पांच पुत्र तरी शेष राहतीलच. वरील श्लोकाचा बहुतेक झोंक पंतांनीं आपल्या पुढील आर्येत आणला आहे.

जा, भागलीस, कल्पद्रुमसंश्रितकाम कां न
पुरतील ?
स्वस्थ रहा पांच तुझे सुत सार्जुन कीं सकर्ण
उरतील ॥ ३० ॥

कर्णाचें दानशूरत्व पंतांनीं या आर्येच्या पहिल्या चरणांत चांगलें दाखविलें आहे. जा, भागलीस, या शब्दांतील खोंच उत्कृष्ट आहे. हा चरण पंतांचा स्वतःचा आहे. कृष्ण इकडे पाण्डवांकडे परत आला व धर्मराजाला सर्व शिष्टाईचें वृत्त कळविलें. मग भीष्माच्या सैनापत्याखालीं कौरवांची सेना अर्जुनाच्या सैन्यापत्याखालीं पाण्डवांची सेना अशा दोन्ही कुरुक्षेत्रांत तळ देऊन बसल्या. मग दुर्योधनानें शकुनिपुत्र जो उलूक त्याला पांडवांकडे व द्रुपदादि वीरांकडे, प्रत्येकाकरितां पृथक् पृथक् निरोप देऊन पाठविला.त्यापैकीं सहदेवाला पाठविलेला निरोप कथन करणारी आर्या नमुन्याकरतां दिली आहे.

सहदेवासि म्हणे त्वां कां रे ! जीव न दिला ?
परवश स्त्री ।
कसि, देखिली ? न सहता दासीचाही विलप-रव
शस्त्री ॥ ११ ॥ (उ. अ. १२)

तूं द्रौपदीचे क्लेश आठवून युद्ध कर एवढेंच मुळांत आहे. त्याबद्दल तांनीं एवढी वजनदार आर्या घातली आहे. यमक चांगलें आहे. जीव देणें व स्त्री परवश झालेली पाहणें हीं सारखींच मानलीं आहेत, म्हणून पहिल्यानें निदर्शना अलंकार चांगला साधला आहे. दासीचा विलापरव श्रवण करून हातांत शस्त्र असलेला पुरुष तें कधींही सहन न करता ! तेथें स्वस्त्रीचा तूं सहन केलास हा विशेषोक्ति अलंकारही चांगला साधला आहे व दोन अलंकारांचें मिश्रण अधिक सुखकारक झालें आहे.

दुर्योधनानें आपल्या सैन्याचा बलाबलविचार भीष्मांशीं केला. तेव्हां रथी कोण, महारथी कोण असें पाहत असतां भीष्म म्हणाले, कर्ण हा महारथी नाहीं. नुसता रथीही नाहीं; एवढेंच नाहीं, पण अर्धरथी आहे. मोठ्याशीं लहानाची तुलना करावयाची म्हणजे नाना फडणवीस अर्धा शहाणा ठरला तशी गोष्ट झाली म्हणायची. कर्ण साहजिकच रागावला व म्हणाला, 'हे भीष्मा ! तूं माझा तेजोभंग करीत आहेस.'

मी साहतों तुझ्या या मित्रसुयोधनार्थ अपराधा।
वृद्धाचें सोशीसा हो सुत, म्हणउनि करी सुतप
राधा ॥ ६५ ॥

पहिला चरण मूळाप्रमाणें आहे. वृद्धाचें भाषण सहन करील इतका सहनशील मुलगा मला दे म्हणून माझी माता राधा तपश्च करीत बसली होती. ही आर्या पंतांनीं स्वतंत्र घातली आहे. हींत अस्सल विनोद आर्याला शोभेल असा भरला आहे. सुन्दर आहे. भीष्मांनीं वीरांच्या देखत केलेला अपमान सहन करणें कर्णासारख्या वीराच्या कंदाला कठीणच; पण भीष्म वृद्ध आहे व वृद्धाचें भाषण सें वृद्धाचें म्हणून सहन करण्याचें बाळकडूच माझ्या मातेनें मला घातलें आहे असें सांगून हा अपमान भासत असूनही तो भासत नाहीं एवढेंच नव्हे, तर माझी माता कृतार्थ झाली म्हणून उलट मलीं आनंदच होत आहे असें कर्ण दाखवीत आहे. यालाच विनोद म्हणतात. नुसती विदूषकी भाषा म्हणजे विनोद नव्हे. शेवटीं कर्ण म्हणाला,

मारीन पाण्डवां मीं आप्तां आंतुनि अनाप्त हा निवडा
मत्तगजकुठारधरापासूनि प्राप्त होय हानि वडा
॥ ६८ ॥

पाण्डवांना मी एकटा मारीन. या भीष्माला आप्तां-आंतुनि ( मित्रमण्डळांतून ) अनाप्त (अमित्र म्हणून) निवडा ( निवडून टाका, काढून टाका ) मत्तगज ( वडाच्याच झाडाच्या पाल्यावर मत्त झालेला हत्ती ) व कुठारधर ( त्याच झाडाचा दांडा कुऱ्हाडींत बसवून त्याच कुऱ्हाडीवर उपजीविका करणारा काष्ठ-विक्या ) हे दोघे जरी एका अर्थी वडाचे आप्त म्हणतां येतील, तरी ते खरे अनाप्तच आहेत. कारण मत्तगज शेवटीं दात्या झाडास लोटून उखळून टाकतोच व काष्ठविक्याच्या कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ होतोच. पाण्डवांना मी मारीन एवढ्या मूळ वाक्यावर पंतांनीं सुरेख दृष्टांत योजून ही सुंदर आर्या रचिली आहे.

भीष्म म्हणाले: मी पाण्डवांना राखून इतर राजांना मारीन. त्याचप्रमाणें मी ब्रह्मचारी असल्यामुळें शिखंडी ही पूर्वजन्मीची स्त्री असल्यामुळें त्याच्याशींही युद्ध करणार नाहीं.

दुर्योधनाच्या प्रश्नावरून शिखंडीचें पूर्ववृत्त भीष्मांनीं सांगितलें तें असें:–

' काशीराजाच्या तीन कन्या अंबा, अंबिका, अंबालिका, मीं विचित्रवीर्याकरितां ( भावाकरितां ) हरण करून आणल्या. त्यांतील अंबा म्हणाली 'माझें मन शाल्व नृपतीवर असतां तुम्हीं कां मला बळानें हरण केलें ?' भीष्मांनीं तिला सोडून दिलें.ती परस्पृष्ट या शंकेनें शाल्व तिचा स्वीकार करीना. तिनें विनंति केल्यावरून परशुरामानें भीष्माला तिचा स्वीकार अर्थात् विचित्रवीर्याकरितां करावयास सांगितला. भीष्म वरील कारणास्तव गुरूंची आज्ञा ऐकतना. तेव्हां परशुरामानें गर्वोक्ति केली.

खचसील कौरवा ! तूं कीं बहु चढला तुझा मद सिगेला ।
लंघावया पहासी; गांवाला काय रे मदसि गेला ?
( उ. अ. १३ ) ॥ ३३ ॥

" तुझा गर्व सिगेला ( शिखराला ) पोंचला. तो आतां जिरेल. तूं माझी आज्ञा लंघूं पाहतोस. माझा असि ( खड्ग ) कांहीं गांवाला गेला नाहीं. जवळ सज्ज आहे. " चवथ्या चरणांत लोकोक्ति अलंकार साधला आहे. रामानें आणखी अशी आठवण दिली कीं, एकवीस वेळां मीं निःक्षत्रिय पृथिवी केली आहे. इत्यादि बहु प्रकाराची परशुरामाची गर्वोक्ति पंतांनीं विस्तृतपणें वर्णन केली आहे, व भीष्मानीं अल्पाक्षरी उत्तर दिलें आहे तें असें.

वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता हा भीष्म शान्तनव समज ।
देवासि मागते ते झाले, मरणीं करूनि नवस मज ॥ ३८ ॥

मोठ्या शस्त्रानें एखाद्यानें आघात केल्यावर, तेवढ्या मोठ्या अथवा त्याच्याहून मोठ्या शस्त्रानें केलेल्या प्रतिआघाताची अपेक्षा असते. पण त्याचें मोठें कार्य कधीं कधीं अगदीं लहान पातळ धारेच्या शस्त्राच्या नुसत्या स्पर्शानें होतें. त्यानें झालेला वार मागाहून कांहीं वेळानें समजतो. त्याचें उदाहरण हें भीष्माचें वरील आर्येतील पहिल्या चरणांत दिलेलें उत्तर होय. भीष्म म्हणाले, " आपण हे क्षत्रिय मारले म्हणतां ना ? तेव्हां हा शन्तनुसुत भीष्म नव्हता." हा प्रसंग असेंच सुटसुटीत उत्तर देण्याचा होता. लांब, क्लिष्ट व जड उत्तर देण्याचा नव्हता. यामुळें हें उत्तर फारच सरस लागतें. याची गोडी याच्या थोड्या सुबोध शब्दांतच आहे. भीष्म पुढें म्हणाले, जे तूं क्षत्रिय मारलेस, त्यांनींच मरते वेळीं नवस करून मला मागून घेतलें आहे, समजलास ? हा यमकाकरितां घेतलेला चरण नसता तर कांहीं बिघडलें नसतें,

पुढें दोघे युद्धाला उभे राहिले. तें भीष्म-माता जी गंगा तिला पाहवेना. तिनें येऊन परशुरामांना विनंति केली.

आग्रह कां करतां हो ! प्रभुजी ! द्या अभय
बालका पावा
न गिळी कटुकरस म्हणुनि कोप करुनि
काय बाळ कापावा ? ॥ ५२ ॥

अहो प्रभुजी ! युद्धाचा आग्रह कां धरतां ? माझ्या बालकावर प्रसन्न व्हा. बालक कडु औषध पीत नाहीं म्हणून त्याला कापावें काय ? येथें प्रश्न व दृष्टान्त हे दोन अलंकार चांगले साधले आहेत. "भीष्माला हा आघला शिष्य आहे. त्याच्याशीं लढूं नको. त्याला क्षमा करा" एवढेंच मुळांत आहे. त्यांतील मथितार्थ पहिल्या चरणांत आणून यमकाकरितां रचलेल्या दुसऱ्या चरणांत तोच अर्थ अलंकारिक भाषेत अधिक स्पष्ट करून पंतांनीं सांगितला आहे. सुकल्पना करतो तो कवि ही पंतांनीं केलेली कवीची व्याख्या नेहमीं त्यांच्या असल्या दुसऱ्या चरणासच लागते.

गंगेचें भीष्मही ऐकेना व भार्गवही ऐकेना. तेव्हां गंगा ( सिंधु ) म्हणाली.

सिंधु म्हणे कोण असी माता जोडील हात पोराशीं ।
शिष्य असा मग आग्रह कैसा सोडील हा तपोराशी ?
॥ ६० ॥

या आर्येंत पंतांचें आवडतें यमक आहे. गुरु, शिष्याला पूज्य; पिता, पुत्राला पूज्य हें सर्वांस मान्य आहे. तथापि त्यांची आज्ञा अन्यायाची असूनही कितपत पाळावी असा प्रश्न व्यवहारांत कधीं कधीं येतो. त्याचें उत्तर या गुरुशिष्यांच्या युद्धप्रसंगी आरंभींच भीष्मांनीं देऊन ठेवलें आहे. तें पंतांनीं गाळलें आहे व तें व्यवहारोपयोगी म्हणून खालीं दिलें आहे. भीष्मावर परशुरामानें प्रहार केल्यावर उलट त्यांच्यावर प्रहार करण्याच्या आधीं भीष्म म्हणतात.

ये ते वेदाः शरीरस्थाः ब्राह्मण्यं यच्च ते महत् ।
तपश्च ते महत् तप्तं न तेभ्यः प्रहराम्यहम् ॥ २४ ॥
प्रहारे क्षात्रधर्मस्य यं राम त्वं समाश्रितः ।
ब्राह्मणः क्षत्रियत्वंहि याति शस्त्रसमुद्यमात् ॥ २५ ॥
( उ. अ. १७९ )

( भावार्थ ) गुरो ! हे जे वेद तुमच्या शरीरांत वास करीत आहेत, हें जें महत् ब्राह्मण्य तुमचें आहे; हें जें महत् तप आहे; त्यांवर मी प्रहार करीत नाहीं. हे राम ! हा जो क्षत्रधर्म, ज्याचा आश्रय तूं ब्राह्मण असून घेतला आहेस, त्यावर मी प्रहार करीत आहें. कारण ब्राह्मणानें हातांत शस्त्र घेतलें, कीं तो ब्राह्मणाचा क्षत्रिय होतो. या श्लोकांत वाक्कुशलता फार असून ती सरस आहे.

पुढे दोघांचें रोमहर्षण युद्ध झालें. तें भीष्मांच्या पितरांस किंवा नारदांस पाहवेना. ते भीष्माला येऊन सांगूं लागले "गुरुचा मान ठेव; युद्ध थांबव." तें भीष्माला मानवलें नाहीं.

न मना ये जें असकृत् कथिति पितर इतर नारदादिहि तें ॥
क्रोधिहृदय गुर्वक्षर मोडी कीं मूल लाडिकें लिहितें
॥ १६४ ॥

जें असकृत् ( अनेक वेळ ) पितर व इतर नारदासारखेही जें कथिति ( सांगत होते ) तें मना ( माझ्या मनास ) नये ( आलें नाहीं ) कसें तर जसें क्रोधिहृदय ( ज्याच्या हृदयांत राग शिरला आहे असा पुरुष ) गुर्वक्षर ( गुरूंचा, पूज्य मनुष्यांचा शब्द ) मोडतो; अथवा जसें लाडकें लिहितें ( लिहावयास शिकणारें ) मूल गुर्वक्षर गुरूनें पाटीवर काढून दिलेलें मोठें अक्षर मोडी ( मोडतें, पुसून टाकितें ) तसें. ही कविता पंतांचीं स्वतंत्र आहे. पंतांच्या कवितेंत घरगुती दृष्टान्त येतात ते सर्वांस कळण्यासारखे असल्यामुळें सर्वांना सारखा आनंद देतात. "गुर्वक्षर" व "मोडी" या शब्दांत चांगले श्लेष आहेत. त्यांच्या आधारावर लाडक्या मुलाच्या स्वभावाचा सामान्य सिद्धांत

साधला आहे. तसाच लाडक्या शिष्याचाही आहे. मिळून एका चरणांत दोन अर्थान्तरन्यास आले आहेत.

पुढें दोघांचें रोमहर्षण युद्ध झालें. तेव्हां देव व पितर यांनीं मध्यें पडून परशुरामाकडून धनुष्य खालीं ठेवविलें.

एकमेकांना अल्पकाळांतच मारूं अशी बढाई कौरव-पांडवांनीं करून आपापली रणरचना केली. येथें उद्योगपर्व संपलें.

व्यासांनीं मयूरेश्वरदेवकरें (गणपतीकडून जसें) महाभारत लिहविलें, तसें श्रीगुरूनें या मयूरेश्वराकडून (मोरोपंताकडून) लिहविलें, असें त्याचें सर्व श्रेय पंतांनीं श्रीगुरूस पर्वाच्या शेवटीं दिलें आहे. येथें त्यांची अभ्यस्त गुरुभक्ति दिसून येते.

## भीष्मपर्व

धृतराष्ट्राची युद्ध पाहण्याची इच्छा नव्हती; पण ऐकण्याची होती. म्हणून संजयाला व्यासांनीं दिव्य दृष्टि दिली होती. तिच्या योगानें त्याला अक्षत राहून इव्या तेथून प्रत्यक्षवत् युद्ध दिसे व तसेंच तो धृतराष्ट्रास कथन करी.

युद्धारंभापूर्वीं कांहीं दुश्चिन्हें दिसलीं, त्यांवरून युद्धनिवारणार्थ व्यासांनीं धृतराष्ट्राला उपदेश केला. त्यावर धृतराष्ट्रानें जें उत्तर दिलें, तें त्याच्या विशिष्ट स्वभावाचें द्योतक आहे. तें पंतांनीं घेतलें नाहीं म्हणून पुढें दिलें आहे.

यथा भवान् वेत्ति तथैव वेत्ता ।
भावाभावौ विदितौ मे यथार्थौ ॥
स्वार्थेहि समुह्यति तात लोको ।
मांचापिलोकात्मकमेव विद्धि ॥ ६०
(भी. अ. ३)

(भावार्थ) महाराज! आपणाला जसें कळतें तसें मलाही कळतें. नाहीं असें नाहीं! काय असतें, काय नसतें तें यथार्थ मला समजतें. सर्व लोकांना स्वार्थाचा मोह पडतो. तर मींही त्यांतलाच एक आहें असें समजा, झालें.

पहिल्या प्रथम कांहीं भौगोलिक माहिती संजयानें दिली. त्यासंबधाचे अध्याय पांडवचरित्राला पोषक नाहींत म्हणून पंतांनीं गाळले असावे. त्यांत एक भूम्यपहार करण्याची जी राजांना अनिवार इच्छा असते तिचें कारण मुळांत आहे तें वाचनीय म्हणून पुढें दिलें आहे.

भूमौच जायते सर्वं भूमौ सर्वं विनश्यति
भूमिः प्रतिष्ठा भूतानां भूमिरेव सनातनम् ॥२०॥
यस्य भूमिस्तस्य सर्वं जगत्स्थावरजंगमम् ॥
तथातिगृद्धा राजानो विनिघ्नन्तीतरेतरम् ॥२१॥
(भी. अ. ४)

(भावार्थ) या भूमीच्याठायीं सर्व कांहीं उत्पन्न होतें व नाश पावतें. भूमीमध्यें सर्व भूतें प्रतिष्ठा पावलीं आहेत. ही भूमि सनातन आहे. ज्याला ही अशी भूमि मिळेल, त्याला हें स्थावरजंगमात्मक जग प्राप्त होईल. तिच्या ठायीं अतिलोभ धरून हे राजे इतरेतरांचा वध करीत असतात.

संजयाच्या नशिबीं पहिलेंच रणवृत्त म्हणून जें कळवावयाचें आलें तें भीष्मपतन होय. तें ऐकून धृतराष्ट्रानें विलाप केला.

मथिला कसा उतरिता रिपुचा काकुत्स्थवीरसा रेंच
कैसें उलेल? विधिनें रचिलें हें हृदय हीरसारेंच॥१६॥
(भी. अ. १)

यांतील दुसरा चरण व्यासांच्या पुढील श्लोकाचें भाषांतर आहे.

अश्मसारमयंनूनं हृदयं सुदृढं मम

यच्छ्रुत्वा पुरुषव्याघ्र हतं भीष्मं न दीर्यते ॥२५॥

नंतर धृतराष्ट्रानें संजयाला युद्धाचें सविस्तर वर्णन कर असें विनविलें. भीष्मांनीं आपल्या वीरांस उद्देशून जें भाषण केलें आहे, तें पंतांनीं गाळलें आहे. तें सरस वक्तृत्वाचा मासला म्हणून पुढें दिलें आहे.

इदं वः क्षत्रिया द्वारं स्वर्गायापावृतं महत् ।
गच्छध्वं तेन शक्रस्य ब्रह्मणः सहलोकताम् ॥ ८ ॥

एष वः शाश्वतः पन्थाः पूर्वैः पूर्वतरैः कृतः ।
संभावयध्वमात्मान=नमव्यग्रमनसो युधि ॥ ९ ॥

× × ×

अधर्मः क्षत्रियस्यैष यद् व्याधिमरणं गृहे ।
यदयोनिधनंयाति सोऽस्य धर्मः सनातनः ॥११॥

( भावार्थ ) हे क्षत्रिय हो ! स्वर्गाचें मोठें द्वार तुमच्यापुढें खुलें झालें आहे. त्यांतून जा म्हणजे इन्द्र व ब्रह्मा ह्यांशीं तुम्हीं सलोकता पावाल. हा तुमचा शाश्वतचा पन्थ आहे. पूर्वी पूर्वी गेलेल्या तुमच्या पूर्वजांनीं हा चोखाळून ठेवला आहे. म्हणून युद्धांत अव्यग्रमन करून आपणाला वाहून घ्या. ××× घरांत कोणत्या तरी व्याधीनें आपल्याला मरण येऊं देणें हें क्षत्रियाचें अधर्माचरण आहे. शस्त्रानें मरण येणें हा त्यांचा सनातन धर्म आहे.

धर्मानें भीष्माचे पाय धरून युद्धांत आम्हांस जय येवो असा आशीर्वाद मागितला. तो त्यांनीं दिला व त्यांस कौरवांकडे लढावें लागतें त्याचें कारण सांगितलें. भीष्म म्हणाले.

अर्थाचा दास पुरुष, पुरुष नव्हे अर्थदास बापा हें ।
सत्य मज कौरवांनीं केलें अर्थेंचि बद्ध बा पाहें ॥९०॥

या श्लोकाचा मूळ श्लोक असा आहे.

अर्थस्य पुरुषो दासो दासस्त्वर्थोन कस्यचित् ।
इति सत्यं महाराज ! बद्धोऽस्म्यर्थेन कौरवैः॥४१॥
( भी. प. अ. ४३ )

हा एक मानसशास्त्रांतील भव्य सत्य कथन करणारा श्लोक भीष्मांसारख्या अधिकारी पुरुषाच्या तोंडून निघालेला आहे. हा भीष्मांप्रमाणेंच चिरंजीव झाला आहे. यांतील रस पंतांनीं आपल्या आर्येंत जशाचा तसाच आणला आहे. हा श्लोक चघळला म्हणजे सर्व जगांतल्या कित्येक थोर थोर पुरुषांच्या व्यवहारांतील कांहीं क्लीब कृतींचें अथवा तसल्याच भाषणांचें रहस्य कळून येतें. नंतर कृष्णानें कर्णाला विचारलें, " तुझ्या प्रतिज्ञेप्रमाणें, भीष्म पतन पावेतों तूं लढणार नाहींस; मग रिकामा बसण्यापेक्षां पाण्डवपक्षाकडून लढसना ?" ह्यावर कर्ण म्हणाला, " हे केशव ! मी दुर्योधनाचें विप्रिय करणार नाहीं. त्याच्या हिताची इच्छा धरणाऱ्या मला जीवाचीही पर्वा नाहीं. " एवढेंच मुळांत आहे. त्यावर मूळ कायम ठेवून पंतांनीं दोन आर्या आपल्या कल्पनेनें रंगवून रचिल्या आहेत. त्यांतील एक दिली आहे.

कर्ण म्हणे विप्रिय तिलमात्र घडो या सुयोधनाचें न ।
कृष्णा ! दारोदारीं नटसा कां मी सुयोध
नाचेन ? ॥१०३॥

यांतील अर्थ उघड आहे. यांत यमक व उपमा हीं चांगलीं साधलीं आहेत.

प्रथमदिन युद्धांत भीष्मांनीं कहर केला, तेव्हां धर्म भ्याला. कृष्णानें आश्वासन दिल्यावरून धृष्टद्युम्न व शिखंडी या दोघांनीं द्रोणाला व भीष्मांना अनुक्रमें मारावें असें धर्म त्यांजवळ म्हणाला. तेव्हां ते बोलले,

जसें तूं इच्छिसि, होईल तसेंचि राया तें ।
बहु हर्षवील विजयें, वृद्ध जसाऔरसें चिरायातें॥२२॥
( भी. अ. ३ )

येथें चिरायातें ( पुष्कळ दिवसांनीं ) झालेल्या औरस पुत्रानें वृद्ध जसा हर्ष पावतो तसा तूं ( हे धर्मा ) विजयानें हर्ष पावशील. तूं जशी इच्छा करतोस तसें आम्हीं ( द्रोण व भीष्म यांचा वध ) करूं असें ते ( दृष्टद्युम्न व शिखंडी ) बोलले. येथें वृद्धपणीं झालेल्या पुत्राची उपमा फार मार्मिक व घरगुती, सर्वांस समजेशी असल्यामुळें आनंद देणारी आहे.

तिसऱ्या दिवशींच्या युद्धांत भीमापुढें कौरवसेना पळतांना पाहून दुर्योधन भीष्मांना म्हणाला हे ! पितामह ! तुम्हांला जें मी बोलतों, तें नीट ध्यानांत घ्या. आमची सेना तुम्हीं जिवन्त असतां पळवे हें तुम्हांस अनुरूप नाहीं. पाण्डुसुतांवर तुमच्या मनांतून अनुग्रह करावा असें दिसतें. म्हणून हा सैन्याचा नाश तुमच्यानें पाहवतो. हेंच भाषण पंतांनीं आपल्या कल्पनेनें अधिक स्पष्ट करून दाखविलें आहे.

असतां तुम्ही पति, पृथापुत्र मथिति या मदीय-
पृतनेतें. ।
नवल ज्वलदनलाचें सर्वस्वें बल हरुनि घृत नेतें ॥४॥

जिकडे वपु तिकडे मन युक्त न शोभेल अन्यथा नातें।
पायें अनन्य लोटुनि लावावें काय अन्य थानातें ॥५॥
( भी. अ. ४ )

तुम्हीं पति ( सेनानी ) असतां पृथापुत्र (हे पाण्डव) मदीय ( माझ्या ) पृतनेतें मथिति ( सेनेचें मंथन करतात ) ही गोष्ट व ज्वलदलनाचें ( प्रज्वलित अग्नीचें ) बल ( दाहशक्ति ) सर्वस्वें ( समूल ) हरुनि घृत ( तूप ) नेतें ही गोष्ट अशा दोन्ही गोष्टी नवल ( सारख्या आश्चर्याच्या ) आहेत. येथें निदर्शना अलंकार आहे. वास्तविक तुपाला प्रज्वलित अग्नीनें जाळून पार नाहींसें केलें पाहिजे. तसें न होतां प्रज्वलित अग्नीला तूपच बलहीन करीत आहे, हें नवल नव्हे काय ? असें कां होतें ? जिकडे वपु ( शरीर ) तिकडे मन असणें युक्त ( योग्य ) आहे. पण नातें ( संबंध ) अन्यथा ( दुसऱ्या प्रकारें असेल ) म्हणजे जिकडे शरीर तिकडे मन नसेल, तर तें न शोभेल ( शोभणार नाहीं ). अनन्य ( अन्य नव्हे, असें आपलें स्वतांचें मूल ) पायें ( पायानें ) लोटुनि अन्य ( दुसऱ्याचें मूल ) थानातें लावावें काय ? कधीं लावूं नये. निश्चित " नये " असें उत्तर मिळालें, म्हणून येथें प्रश्नालंकार आहे. यांत अर्थान्तरन्यासही मिश्र आहे. दुर्योधनाच्या मनांत भीष्मांना उत्साह आणावयाचा होता. तें पहिल्या आर्येंत स्पष्टपणें पंतांनीं अलंकारिक भाषेंत साधून दुर्योधनाच्या भाषणांतील खोंच दुसऱ्या आर्येंत त्याच प्रकारें आणली आहे.

भीष्मांना या भाषणानें चेव येऊन ते म्हणाले, मी अर्जुनाचें निवारण करतों.

अशि करुनियां प्रतिज्ञा विष्णुपदीनंदनें अति त्वरितें।
पाण्डव-चमूपतीचें मथुनि चमू पाडिलें पतित्व रितें
॥ ११ ॥

वीरां न ओढवे गुण तूणींच्या सायका न कर पावे।
भीष्म ग्रीष्मरविच मग तत्तेजें काय कां न करपावे
॥ १२ ॥

दिसतें तेजोमण्डळ जेविं जवें फिरवितां अलातातें।
तेंवि रथातें फिरवुनि केलें, जव दाविला भला तातें
॥ १३ ॥

अशि प्रतिज्ञा करुनियां अतित्वरितें ( अति त्वरा ज्यानें केली आहे अशा ) विष्णुपदी-नन्दनें ( गंगापुत्रानें भीष्मानें ) पाण्डव चमूपतीचें (पाण्डवांच्या सेनापतीचें) जें पतित्व ( सेनानायकत्व ) तें चमू मथुनि ( सैन्याचा नाश करून ) रितें ( रिकामें ) पाडिलें, चमूच नाहीं मग सेनापतित्व कोठें उरलें ? वीरांना धनुष्याचा गुण (दोर) ओढवेना. तूणींच्या (भात्यांतील) सायकां ( बाणांला ) कर न पावे ( पोंचे ) भीष्म हा ग्रीष्मरवि ( ग्रीष्मऋतूंतला रविच ) झाला; मग तत्तेजें ( त्याच्या तेजानें ) काय ( वीरांचीं शरीरें ) कां न करपावे ( करपून जावींच ) जेंवि जसें अलातातें ( कोलितातें ) जवें ( वेगानें ) फिरवितां ( फिरवलें असतां ) तेजोमण्डळ दिसतें तेंवि ( तसें ) रथानें फिरवून तातें ( भीष्मानें ) केलें व जव (वेग) दाविला ( दाखविला. )

पहिल्या दोन आर्यांचा मजकूर पंतांचा स्वतंत्र आहे. एकंदरींत वर्णन सरस आहे. नंतर अर्जुनाचें व भीष्मांचें घोर युद्ध झालें. पंत म्हणतात :

पडतांचि गांठि झाले समरचमत्कार फार न वदवती
लिहितां सरस्वतीच्या सरतिल शत कलशसदृश
नव दवती ॥ २१ ॥

या समरचमत्कारांचें वर्णन करावयास प्रत्यक्ष सरस्वती जर बसली असती, तर कळशी एवढाल्या मोठ्या शंभर दवती सरल्या असत्या. हें अतिशयोक्तीचें उदाहरण आहे. तें मुळांत नाहीं. असल्या वर्णनांत आमच्या सर्व कवींचा हातखण्डा आहे. शक्याशक्यतेला जुळणारी नेमस्त भाषा त्यांना माहित नाहीं असा कधीं भास होतो.

सप्तमदिवस युद्धांत पार्थापुढें कौरवसेना पळत असतां दुर्योधनानें उत्साहपर भाषण केलें

या दुर्योधनवचनें धीर धरुनि परतले सकल शस्त्री ।
नव्हतीच भेटली घरि त्यांला गृह सोडितां सकलश
—स्त्री ॥ १७ ॥
( भी. अ. ८ )

दुर्योधनाचें भाषण ऐकून सर्व शस्त्रधर वीर, धीर धरून परतले हें खरें; पण पंत म्हणतात, त्यांनीं घर सोडलें, तेव्हां पाण्यानें भरलेली कळशी डोक्यावर घेतलेल्या स्त्रीनें पुढें येऊन शुभशकुन केला नव्हता. येथें कौरवांना यश येण्याचा संभव नव्हता असे पंतांनीं ध्वनित केलें आहे. समाजांतील कांहीं रूढ समजुती मध्यें आणण्याची वहिवाट पंतांच्या काव्यांत दिसून येते, तीं त्यांच्या स्वत्वाची एक खूण आहे.

नवमदिवस युद्धांत भीष्मांनीं फार पराक्रम केला. पांडवसेनेचा भंग झाला. भीष्मांनीं अर्जुनाचा रथ ग्रासण्याची वेळ आणली. ती पाहून कृष्ण हातांत प्रतोद घेऊन भीष्मांवर धांवला. त्याचें स्वागत करून भीष्म कृष्णाला म्हणाले, "माझ्यावर प्रहार करून मला मृत्यु दे." त्याविषयीं पंतांनीं एक आर्या रचली आहे.

तूं हरिसा हरि साचा, हरिणी सुरसिन्धु, मीहि पाडससा ।
पाड, ससाध्वस हो अरि, हरिचा पावेल काय
पाड ससा ? ॥ १०१ ॥
( भी. अ. १० )

हे हरि ! ( कृष्णा ! ) तूं हरिसा ( सिंहसा ) साचा ( खरा आहेस. ) सुरसिन्धु ( गंगा, माझी माता) ही हरिणी झाली.मग मी अर्थात तिचा पाडससा (वत्ससा) आहें. तूं मला पाड ( मार, मग तेणें करून ) अरि ( कौरव ) ससाध्वस (सभय) हो ( होवोत ). हरिचा ( सिंहाचा ) पाड ससा कसा पावेल ?

हींत सांग उपमा आहे. प्रश्नालंकारमिश्र दृष्टान्त आहे. शिवाय दामयमक आहे. ही शाळेंतील विद्यार्थ्यांस फार आवडते."तुम्हीं शस्त्र धरून प्रतिज्ञेचा भंग करीत आहांत" असें सांगून अर्जुनानें कृष्णाला मागें फिरविलें. नंतर पाण्डवांनींच भीष्मांना त्यांच्या वधाचा उपाय विचारला. भीष्म म्हणाले शिखंडीला पुढें उभें करून अर्जुनाला माझेवर बाण सोडावयास सांगा." परंतु हा विचार अर्जुनाला मानवला नाहीं. तो दुःसन्तप्त होऊन लाजेनें म्हणाला

गुरुणा कुरुवृद्धेन कृतप्रज्ञेन धीमता ।
पितामहेन संग्रामे कथं योद्धाऽस्मि माधव ॥ ९१॥
क्रीडताहि मया बाल्ये वासुदेव महामनाः ।
पांसुरूषितगात्रेण महात्मा परुषीकृतः ॥ ९२ ॥
यस्याहमधिरुह्याङ्कं बालः किल गदाग्रज ।
तातेत्यवोचं पितरं पितुः पाण्डोर्महात्मनः ॥९३॥
नाहं तातस्तव पितुस्तातोऽस्मि तव भारत ।
इति मामब्रवीद्बाल्ये यः स वध्यःकथं मया ॥९४॥
( म. भी. अ १०७)

( भावार्थ ) हे माधवा ! या धीमान, प्रज्ञावान व सर्व कुरुंत वृद्ध म्हणून मोठ्या अशा माझ्या आजोबाशीं रणामध्यें युद्ध कसें करूं ? हे वासुदेवा ! लहानपणीं मी खेळत असतां मातीनें मळलेल्या माझ्या अङ्गांनीं या मोठ्या मनाच्या महात्म्याला मळविलें आहे. ज्याच्या अंकावर बसून, हे गदाग्रज ! केवळ बाळ म्हणून, तात* ! ( काका ! ) अशी ज्याला ( माझा पिता जो पाण्डु त्याच्या काकाला ) हांक मारली, तेव्हां जो मला बालकाला, म्हणाला 'हे भारत ! मी तुझा तात ( काका ) नाहीं. तुझ्या पित्याचा तात ( काका ) आहें' त्याला मी कसा मारूं ? माझा वध झाला तरी पत्करेल असें अर्जुन म्हणाला व उद्विग्न झाला. हा प्रसंग लहानपणची रमणीय आठवण देणारा भावनापूर्ण असा फार बहारीचा आहे. त्याचें वर्णन सहृदय वाचकांचा जीवच काढील.

* संस्कृतांत तात शब्द लहान मुलाला तसा वडील मनुष्यांना लावतात.

पंतांच्या काव्यांत याचा उल्लेख नाहीं म्हणून मूळ संस्कृत उतारा दिला आहे.

शेवटीं शिखंडीला पुढें करून भीष्मांशीं युद्ध सुरू झालें व अर्जुनानें भीष्मांवर शरसंधान चालविलें व भीष्मांना व्यथित केलें. तेव्हां भीष्म हंसतच दुःशासनाला म्हणाले.

मुसला इव मे घ्नन्ति नेमे बाणाः शिखण्डिनः ।
वज्रदण्डसमस्पर्शा वज्रवेगदुरासदाः ॥ ६२ ॥
मम प्राणानारुजन्ति नेमे बाणाः शिखण्डिनः ।
नाशयन्तीव मे प्राणान् यमदूता इवाहिताः॥६३॥
( भी. प. अ. ११९ )

(भावार्थ) हे मुसळासारखे लागणारे बाण शिखण्डीचे नाहींत. वज्रदण्डासारखा यांचा स्पर्श आहे. वज्राच्या वेगासारखा न आटोपणारा यांचा वेग आहे. निमंत्रण दिलेल्या यमदूतांप्रमाणें हे माझ्या प्राणांचा नाश करीत आहेत. गदेच्या परिघाप्रमाणें यांचा स्पर्श आहे. हे बाण शिखण्डीचे नाहींत. शिखण्डीच्या बाणांत प्राणापहारि वेदना उत्पन्न करण्याचें सामर्थ्य नाहीं. ते माझ्या अंगावर पुष्पराशीप्रमाणें मला वाटले असते. या अर्थाचे हे या कालकर्त्या भीष्मांचे उद्गार गहिंवर आणणारे आहेत. व्यासांनीं ते सोप्या भाषेंत आणले आहेत. मोरोपंतांनींही ते आपल्या प्रकारें प्रौढ भारवती वाणीनें वर्णिले आहेत. दोहोंचा मनावर काय परिणाम होतो तो पाहण्याकरितां पंतांच्या चार आर्यांपैकीं दोन दिल्या आहेत.

करिति व्याकुळ आम्हां सर्वामरशत्रुफणि-
शिखण्डीचे ।
गुरुकुलकमलतरणिचे पार्थाचे शर, न
हे शिखण्डीचे ॥ १०४ ॥
न शिखण्डीचे भेदुनि जातील सुमेरुच्याहि शिखरा जे
वज्राग्निसमस्पर्श व्यालसमक्रूर ते विशिख-राजे १०५
( भी. प. अ. ११. )

आम्हांला व्याकुळ करणारे हे शर ( बाण ) सर्व अमर+शत्रु+फणि+शिखण्डीचे ( सर्व देवांचे शत्रु हेच कोणी सर्प त्यांना मारक अशा मयूराचे ) व कुरु+कुल+कमल+तरणिचे ( कौरवकुलरूप कमळाला लापावयास लावणाऱ्या-सूर्याचे, पार्थाचे ) आहेत. हे शिखण्डीचे नाहींत. हे विशिखराजे ( बाणांचे राजे ) सुमेरूच्याही शिखराला भेदून जातील. त्यांचा स्पर्श वज्राग्निसम आहे. हे व्याळसम क्रूर आहेत. हे शिखण्डीचे नाहींत.

दोघेही-व्यास व मोरोपंत– सहृदय वाचकांत समरसता उत्पन्न करतात व त्यांना असें भासवतात कीं, हे बाण भीष्माला लागत नसून आपल्यालाच पीडा करीत आहेत.

पुढें दोन्ही पक्षीं तुमुल युद्ध झालें एवढेंच मुळांत आहे. त्याबद्दल पंतांनीं एक आर्या घातली आहे.

त्यासमयीं स्वपरांची गणिली तुमच्या न हानि
कटकांहीं
स्वर्गासि पावले बहु भट परि न पितामहा निकट-
कांहीं ॥ ११३ ॥

ही आर्या सोपी आहे. हींत पडक्षरीं यमक आहे. भीष्मांवर चालून जातां जातां त्यांच्याजवळ जाण्यापूर्वी भट ( सैनिक ) दूर असलेल्या स्वर्गाला सुद्धां पोंचले; पण भीष्म जवळ असतां त्यांच्याजवळ पोचले नाहींत. म्हणजे ते मध्येंच मारले गेले म्हणून असें झालें. येथें विरोधाभास अलंकार चांगला साधला आहे.

या युद्धांत भीष्मांचें शरीर अविद्ध असें द्व्यंगुल सुद्धां उरलें नाहीं. दक्षिणायनांत बुधाला मृत्यु येऊं नये म्हणून उत्तरायण होईतों भीष्म शरपंजरीं पडून राहिले.

हें मयूरकृत भीष्मपर्व अनुक्रमानें सहावें, व्यासकृत भीष्मपर्वाप्रमाणें चांगलें उतरलें असावें अशी प्रतीति आल्याचें पंतांनीं उपसंहारांत नमूद करून ठेवलें आहे ते असें

हें भीष्मपर्व पावो साधुश्रुतिशष्कुली-नभा सावें
श्रीव्यासकृत मयूरेश्वरविलिखित वेगळें न भासावें.

## द्रोणपर्व

भीष्म पतन पावल्यावर कुरुसेनेची काय स्थिति झाली तिचें वर्णन व्यासांनीं आठ श्लोकांत केलें आहे. त्यांतील कांही मासल्याकरितां दिले आहेत.

पतिते भरतश्रेष्ठे बभूव कुरुवाहिनी ।
द्यौरिवापेतनक्षत्रा हीनं खमिव वायुना ॥२५॥
विपन्नसस्येव मही वाक्चैवासंस्कृता यथा ।
विधवेव वरारोहा शुष्कतोयेव निम्नगा ।
वृकैरिव वने रुद्धा पृषती हतयूथपा ॥ २७

× × ×

विष्वग्वाताहता रुग्णा नौरिवासीन्महार्णवे ॥ २९ ॥
(महा. द्रो. प. अ १)

(भावार्थ) नक्षत्रहीन जसें आकाश, निःश्रीक; वायुविहीन जसें नभ शून्य; पिकें नष्ट झाल्यामुळें जशी मही निःसार; असंस्कृत वाणी जशी कर्तव्यांत असमर्थ; निरलंकारा जशी विधवा; शुष्कतोय झालेली जशी नदी निरुपयोगी; धुरीण मृग मृत झाल्यामुळें लांडग्यांनीं वेढलेली जशी चित्रमृगी आसन्नमरण; अनेक दिशांनीं वाहणाऱ्या वाऱ्यांनीं हलणारी महासागरांत जशी नौका संकट ग्रस्त; तशी भरतश्रेष्ठ भीष्म पतन पावल्यावर कुरुसेना झाली. या सोप्या व सुंदर वर्णनाचें भाषांतर न करतां किंवा सार न काढतां हें वाचून वाचकाच्या मनावर होणारा जो परिणाम तो अगदीं निराळ्या शब्दांत पण तितक्याच अलंकारिक व सोप्या भाषेंत पंतानीं आणला आहे तो असा

भीष्म पडतांचि गेले सर्वांचेही पळांत आवांके ।
नसतां धुरंधर वृषभ बाळवृष भरें करुनि आ वांके ४
(द्रो. प. अ. १)

(भावार्थ) कौरव सैन्याचे धुरीण असे जे भीष्म ते पतन पावल्यावर सर्व सैन्याचें अवसान एका पळांत नष्ट झालें. धुरीण वृषभ नाहींसा होतांच त्याच्या जोडीच्या वृषभाचें अवसान तसेंच नष्ट होतें व तो त्यावर पडलेल्या भाराखालीं 'आ' पसरून वांकतो. इतकें सुन्दर तात्पर्य अर्थतःकाढणें ही पंतांची स्वत्वाची खूण आहे. हा बाल वृषभाचा दृष्टान्त अप्रतिम आहे.

कर्णाच्या उपदेशावरून द्रोणाचार्यांनां सेनापति नेमण्यांत आलें. द्रोणाचार्यांनां धृष्टद्युम्नाच्या हातून मृत्यु आला तें संजयमुखानें ऐकून धृतराष्ट्रानें पुष्कळ विलाप केला. याच्या वर्णनाकडे व्यासांनीं चार श्लोक लावले आहेत. त्यांतील कांहीं चरण निवडून घेतले आहेत.

* * *

अश्मसारमयं नूनं हृदयं सदृढं मम । १०
यच्छ्रुत्वा निहतं द्रोणं शतधा न विदीर्यते ११

* * *

शोषणं सागरस्येव मेरोरपि विसर्पणम् १२

* * *

पतनं भास्करस्येव न मृष्ये द्रोणपातनम् १३

(भावार्थ) खरोखर, माझें हें कठिण हृदय वज्राचें सार काढून केलें असलें पाहिजे; कारण द्रोणाचा वध झालेला ऐकून त्याचे शंभर तुकडे होत नाहींत. द्रोणाचें पतन हे द्रोणाचें नसून हें सागराचें शोषण आहे; मेरूचा स्थानभ्रंश आहे. सूर्याचें भूवर पतन आहे !

पंतानीं आठ आर्या घालून हा विलाप विस्तृत केला आहे. तो असा.

धृतराष्ट्र विलाप करी, बहु आपण आपणासि निन्दुनि घे ।
स्मृति हरपे करपेची, न तन्नयनांतूनि अश्रुबिन्दु निघे ॥ १७ ॥

\+ \+ \+

भीष्मद्रोण रविशशी गिळिले पांचाळ काळराहूनीं ।
निववित होते कीं ते जननयनां सर्व काळ राहूनी ॥ १९ ॥
मरण न ये उर न उले जरि हें बहु शोकानें तापविलें ।

विधि न धरी भेदाया कां या धृतराष्ट्र-पर्वता-
पवितें ॥ २० ॥
कविवृंद सदुपदेशें तुज शिणवुनि देवि !
पाणि ! तळमळले ।
हा कोळसा कराया शुद्ध धुतां, व्यर्थ पाणि
तळ मळले ! ॥ २१ ॥
बहुजन बुडवुनि शोकीं दुष्टा ! दुर्योधना
बुडालास ।
मकरालय लंघाया ! मत्ता मशका ! कसा
उडालास ? ॥ २२ ॥
गज गोष्पदीं बुडाला ! हा दैवा सिंधु शोपिला
मशकें ।
न शकें सोसाया हें, वधिला तो केसरी कसा
शशकें ? ॥ २३ ॥
( द्रो. अ. १ )

एकोणीसाव्या आर्येत रविशशीशीं भीष्म व द्रोण यांचा अभेद कल्पून पंतांनीं रूपक तयार केलें आहे. तसेंच त्यांना गिळणारे पांचाळ ( शिखंडी व धृष्टद्युम्न ) यांस काळराहू म्हणून दुसरें रूपक साधलें आहे. रविशशी सर्व काळ दृश्य नसतात; पण भीष्मद्रोण हे सर्वकाळ जनांत राहून त्यांना आनंदित करीत होते. असा उपमेयाचा उपमानावर उत्कर्ष दाखवून व्यति- क अलंकार चांगला साधला आहे. एकवीसाव्या आर्येत दुसऱ्या चरणांत, पाणितळाला ( तळहाताला ) संगतीनें कोळशानें आपला गुण दिला असें सांगून कवीनें तद्गुण अलंकार योजला आहे. सबंध चरणांत निदर्शना अलंकार आला आहे. तेवीसाव्या आर्येत पहिल्या दुसऱ्या, व चवथ्या चरणार्धांत असंभव अर्थनिष्पत्ति करून असंभावना अलंकार प्रदर्शित केला आहे.

पुढें धृतराष्ट्राला कृष्णाचें भय वाटून तो म्हणाला.

तो ईश्वर कृष्ण करें कवळिल कदना कराल
करवाल ।
सांगा तुम्हीं कवि कुशल काय कसें मग
कराल करवाल ? ॥ ३८ ॥

या आर्येतील पहिला चरण मुळाप्रमाणें आहे. तो ईश्वर कृष्ण कदना ( युद्धाकरितां ) करें ( हातानें ) कराल ( तीक्ष्ण ) करवाल ( असि ) कवळिल ( धारण करील ). मग तुम्हीं कवि ( मज्ञ लोक ) आमचें कुशल ( हित ) कसें कराल व करवाल ( करून घ्याल ? ) या आर्येत कवर्णाच्या वारंवार उक्तीनें च्छेकानुप्रास आला आहे. नंतर धृतराष्ट्रानें द्रोणयुद्धाचें सविस्तर वर्णन करावयास विनविलें.

मोरोपंतांचें आर्याभारत हें महाभारताचें संक्षिप्त वृत्त आहे. महाभारताला संक्षेप देतांना मोरोपंतांनीं एक तत्त्व साधारणपणें लक्षांत ठेवलेलें दिसतें, तें हें कीं, ज्या वृत्ताला संक्षेप दिला असता पाण्डवांच्या कथेला हानि होत नाहीं, त्या वृत्ताला अवश्य संक्षेप देणें. उदाहरणार्थ. महाभारत द्रोणपर्व अध्याय २३. ज्या अध्यायांत पाण्डवांकडील वीरांच्या रथ, हय, धनुष्यें इत्यादि सामग्रीचें वर्णन आहे, तो पंतांनीं गाळला आहे- त्याचप्रमाणें उभयदलांतील वीरांचीं शंभर द्वंद्वें झालीं, तीं वर्णन करणाऱ्या महाभारतांतील पंचविसाव्या अध्यायाची वाट पंतांनीं " द्वंद्वशतें किति वर्णूं ? " एवढ्या एका चरणार्धानें लाविली आहे. ( पहा द्रो. अ. २ आ. ४१ )

असो. भगदत्तानें आपला हत्ती अर्जुनावर सोडला त्याविषयीं पंत म्हणतातः

विजयविशिखार्त होतां, पूर्वीं दुष्करहि आय-
कोन करी ।
भगदत्ताचें कथिलें अधनाचें जेविं बायको न
करी ॥ ६६ ॥

विजयविशिखार्त ( अर्जुनाच्या बाणानें पीडित ) होतां ( झाल्यावर ) शिवाय पूर्वीं दुष्करहि आयकोन ( पूर्वीही अर्जुन दुर्जय आहे असें ऐकून ) तो करी ( हत्ती ) भगदत्ताचें ( आपला यजमान जो भगदत्त त्यानें ) कथिलें ( सांगितलेलें ) जेविं अधनाचें ( अधनानें सांगितलेलें ) त्याची बायको न करी ( ऐकत नाहीं ) त्या प्रमाणें न ऐके.

येथें अधनाच्या बायकोची जी उपमा पंतांनीं दिलेली आहे,तीवर काव्यसंग्रहकार टीकेंत म्हणतात, " दरिद्री पतीचें बायको ऐकत नाहीं असाच अनुभव सीता दमयन्ती इत्यादिकांची चरित्रें लिहिणाऱ्या पंतांना सर्वत्र आला काय ?" या ठिकाणीं पंतांना न म्हणतां "व्यासांना" म्हणावयास पाहिजे होतें; कारण वरील आर्येचा दुसरा चरण मूलाबरहुकूम आहे.

स करी भगदत्तेन प्रेर्यमाणो मुहुर्मुहुः ।
न करोति वचस्तस्य दरिद्रस्येव योषिता ॥४२॥
( महा. द्रो. अ. २९ )

नंतर भगदत्तानें आपला अंकुश अमोघ अशा विष्णवस्त्रानें अभिमंत्रित करून पार्थावर सोडला तेव्हां श्रीकृष्णानें पार्थाला वांचविण्याकरितां आपला उर मध्यें घातला. तेव्हां " न धरीं शस्त्र करीं मी " ह्या आपल्या प्रतिज्ञेचें तूं रक्षण करीत नाहींस अशी पार्थानें कृष्णाला आठवण दिली. तेव्हां तें अमोघ अस्त्र भगदत्ताला कसें प्राप्त झालें तें सांगून कृष्ण म्हणाला.

त्या अस्त्रें अभिमंत्रित भगदत्तांकुश तुला न सोसवता
अथवा तुझेंचि उर हें भाव सख्या ! त्वन्मनीं नसो सवता. ॥ ७४ ॥

विष्णवस्त्रानें अभिमंत्रित केलेला अंकुश तुला सोसवता नाहीं. पण एवढें कशाला ? हे सख्या पार्था, जो उर मध्यें आला, तो तुझाच समज. तुझ्या मनांत याहून निराळा भाव नसो. ही उक्ति यमकाकरितां घातली आहे खरी; पण तींत भक्तवत्सलता अगदीं निरुपम उतरली आहे.

अर्जुनाच्या बाणांचें भय वाटून शकुनि पळाला एवढेंच मूळांत आहे; त्या विषयीं पंत म्हणतात.

माया-क्षय-भीत शकुनि सूतासि म्हणे रथा पिटाळावें ।
जरि रणमरण हित, अहित-मर्दन-कामें तथापि टाळावें ॥ ८३ ॥ द्रो. अ. २,

शकुनि सूताला म्हणाला " रथ पिटाळून रणाबाहेर घे, " ' कां मामा भ्यालां कीं काय ? ' असें सूत विचारील ही शंका घेऊन मामा म्हणतात "छे ! छे ! जरि रणमरण ( रणांत लढून येणारें मरण ) हित ( श्रेयस्कर आहे ) तरी अहित-मर्दनकामें ( शत्रूचा वध करण्याची इच्छा करणारानें ( अस्मादिकांसारख्यानें ) तें मरण टाळावें !" यांत खरा विनोद आहे. आपण भिऊन पळतों असें नसून शत्रूला पुढें केव्हां तरी मारण्याची आपली इच्छा आहे म्हणून जीव सांभाळून आम्ही ठेवीत आहों असें सांगून शकुनि पळणें हशांवर नेत आहे !

नंतर द्रोणांनीं चक्रव्यूह रचिला. अभिमन्यूनें त्यांत मोठया हिमतीनें प्रवेश केला. उभयदलें भिडलीं. त्यांचें पंतकृत वर्णन असें आहे.

रथ धडकले भडकले हय शस्त्रजवन्हि धडकले वरते ।
अन्योन्य द्वयंगुलही राहों देती न धड कलेवर ते ३२
( द्रो. अ. ३ )

युद्धाच्या तडाक्याचें हें वर्णन फार सरस आहे. कर्ण व अभिमन्यु यांचें युद्ध झालें. त्याला संक्षेप देण्याचें पंतांच्या मनांत आलें. पण विस्तारभयाची नेहमींची सबब त्यांनीं पुढें न करतां " या युद्धाचें व्यासेतरानें केलेलें वर्णन गबाळ होईल असें सांगून युद्धवर्णनाला संक्षेप दिला आहे. पंत म्हणतातः

शस्त्रास्त्रवृष्टि करतां घन कर्ण गमे, सुवर्णनग बाळ ।
किंबहुना ? व्यासेतररचित सविस्तार सुवर्णन गबाळ ॥ ७९ ॥

कर्ण व दुर्योधन या दोघांना अभिमन्युनें पळविलें तें ऐकून धृतराष्ट्राला अश्रद्धापूर्वक आश्चर्य वाटलें. तें पंतांनीं उत्तम रीतीनें प्रदर्शित केलें आहेः

अंध म्हणे रे संजय ! हें त्या पौत्रास वर्ष सोळावें ।
लोळावें मांडीवरि तेणें द्रोणादिकांसि घोळावें ! ॥८५॥

येथें असंभावना अलंकारासह अद्‌भुत रस चांगला साधला आहे. धृतराष्ट्राची खात्री करण्याला संजय पुढें म्हणालाः

कुरुसैन्यांत गमे ज्यापरि रंभाकाननांत वारा हो !
त्या विजयश्री देवुनि परिरंभा कां न नातवा
राहो ? ॥ ८८ ॥

जो अभिमन्यु कुरुसैन्यांत ज्यापरी ( जसा ) रंभाकाननांत ( केळीच्या वनांत ) वारा त्यापरि (तसा) गमे ( दिसला ) त्या नातवा ( तुझ्या नातवाला ) विजयश्री परिरंभा ( आलिंगन ) देवुनि कां न राहो ( स्थिर ) राहो ? येथें पहिल्या चरणांत मधुर उपमा, दुसऱ्या चरणांत प्रश्नालंकार व दोहोंत अर्ध चरणभर अन्त्य यमक असे अर्थाचे व शब्दाचे अलंकार साधले आहेत.

मग अभिमन्यूला तोंड फिरवावयाला लावून मागून एकाला बहूंनीं मिळून प्रहार करावा असा द्रोणांनीं उपदेश केला. तो सफल झाला. तेव्हां धर्मानें पुष्कळ विलाप केला.

अर्जुन-कृष्ण-सुभद्रा-कृष्णा-कौंतींस काय समज ावूं ?
काळ न भेटे कैसा ? तद्वदनीं पुत्रकायसम जावूं ? २
अद्यापि उत्तरेचें मुख पीत असेल बहळ हळदीनें !
म्यां जेविं लब्धसंनिधनाशें, करिजेल न हळहळ दीनें
॥ ३ ॥ ( द्रो. अ. ४ )

पहिला चरण मुळांत आहे. इतर नाहींत. "लग्नाच्या वेळीं बहळ (दाटसर) लावलेल्या हळदीनें पिंवळें झालेलें उत्तरेचें मुख अद्यापिही तसेंच पिंवळें असेल, हे शब्द वाचणाऱ्याना जीव करपविणारे आहेत. शेवटीं धर्म म्हणाला, जसा लब्धसंनिधनाशें ( जवळ आला आहे नाश ज्याचा अशानें ) शोक करूं नये,तसा म्यां दीनें हळहळ न करिजे, करूं नये.

धर्माला व्यासांनीं दर्शन दिलें व धर्माच्या प्रश्नावरून त्याला मृत्युस्वरूप समजून देऊं लागले व पूर्वी नारदानें अकंपन राजाच्या याच प्रश्नाला जें उत्तर दिलें त्यासंबंधीं ते पूर्ववृत्तान्त सांगूं लागले.

पूर्वी,बहुभारार्ता ऐसें चतुरानना धरा विनवी
वाटे भय, दाटे, नच आटे, किति म्यां प्रजा
धरावि नवी ॥ १५ ॥

( भावार्थ ) पूर्वी बहुभारार्ता ( प्रजेच्या पुष्कळ भारानें पीडित झालेली धरा (पृथिवी ) चतुराननाला ( ब्रह्मदेवाला ) विनवी ( विनविती झाली ) कीं, वाटे भय ( मला या गोष्टीचें ) भय वाटत आहे. दाटे ( प्रजेच्या वृद्धीला दाटी होत आहे.) नच आटे ( ती कमी होत नाहीं ) मग म्यां ( मी ) नवी ( नवी नवी अधिकाधिक होत जाणारी ) प्रजा किती धरावी ( तिचा भार आणखी किती सहन करावा ! ) यांत स्वभावोक्ति अलंकार चांगला साधला आहे.

व्यासांनीं मृत्युस्वरूप धर्माला समजून सांगितल्यावर धर्म त्यांना विनवून म्हणाला "मला राजर्षिचरितें सांगा " त्यावरून त्यांनीं प्रथम सृंजय राजाची कथा सांगितली. या राजाकडे एकदां पर्वत व नारद असे दोघे आले. तेथें त्यांची कन्या आली. ही कोण असें पर्वतानें विचारता राजा म्हणाला, भगवन् ही माझी कन्या वरवर्णिनी आहे. इतकेंच मुळांत आहे. त्याबद्दल पंत म्हणतात

भूप म्हणे आली वरवर मागावयासि पर्वता !
तनया ।
हे कन्याकृति चिंताऱ्हदिनीशत; तरति
सर्व तात न या ॥ ४७ ॥

हे कन्या कृति चिंताऱ्हदिनीशत ( कन्यारूपी चिंता नदीचें शत आहे ) त्याला सर्वच तात न तरति ( तरून जात नाहीत ) दुसऱ्या ओळींतील सिद्धान्त रोज अनुभवास येणारा आहे. नारदानें पुढें अकंपनाला ययातीची कथा सांगितली. ययातीनें नानाविध यज्ञ केले असें मुळांत आहे. त्याविषयीं पंत म्हणतातः

सत्रें चातुर्मास्यें त्यांची संख्या बरी कथावि किति !
स्वल्पचि रसिक मत वदति. बहुत लिहुन काय
कवि कथा विकिति ? ॥ ५४ ॥
( द्रो. अ. ५ )

येथें मूळांत चातुर्मास्य यागांची संख्या मुळींच दिलेली नाहीं. मग पंतांवर ती सांगण्याची अशि काय जबाबदारी होती, कीं त्यांना ती संख्या विस्तार-

भयास्तव देतां आली नाहीं, अशी सबब सांगावी लागली ? बाकी रसिक स्वल्पच वदतातः—थोडी तिथें गोडी. कवि ( सुज्ञ ) आपणची लिहिलेली कथा विकीत नाहींत. विकते तर दर पृष्ठाला नियमित मूल्य ठरवून पृष्ठें बहूत वाढविते. येथें पांच अक्षरी यमक साधण्या करितां पंतांना जातां जाता कवि, आपल्या काव्यकथा अर्थविदे ( अर्थ मिळवण्या करितां ) लिहीत नसतात म्हणून ते उगाच भारुड वाढवीत नाहीत. म्हणून स्वल्पता हा गुण त्यांच्या काव्यांस अधिक गोडी आणतो असें जें म्हणून ठेवलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

नंतर नारदानें संजयाला भरताची कथा सांगितली. तींत यज्ञप्रसंगानें त्यानें काय काय दानें दिलीं त्यांचें वर्णन मूळ सवाश्लोकांतलें पंतांनी एका आर्येच्या चरणांत चरणभर एक समास घालून त्यात आणलें आहे व आपली समासाची हौस पुरवून घेतली आहे.

धन-धान्य-गृहक्षेत्र-ग्रामरथ-द्विरद-धेनु-हयदानें ।
दिधली नको नको तों त्या भरतानें कुबेर-भय-
दानें ॥ ३० ॥ ( द्रो. अ. ६ )

वरील आर्येतील चरणासारखे चरण पंतांच्या काव्यांत अनेक आहेत. मासल्याकरिता म्हणून हा एक दिला आहे.

इकडे संध्याकाळ झाल्यावर अर्जुन शिबिराकडे निघाला. त्याचें मन लवूं लागलें. तो म्हणाला

कंठ गहिंवरे भरला, शिरली हृदयांत केशवा !
धडकी ।
येतें रडें वृथा कां ? बा माझी प्रकृति काय गा
रडकी ? ॥ २ ॥

अतुल प्रताप लोकीं ज्या खलबलजलधि वाडवा-
भाचा ।
तो कृष्णा ! आज तुझा मज आला कां न आडवा
भाचा ! ॥ ९ ॥

* * *

बोले, कृष्णमुखींचा वेणु तसा परम लाडिका वाणी
जो स्पर्शे शिशुहि, न घे गुरुसन्निध पर मला
डिकावाणी ॥ १४ ॥

जो बहु परपृतनांसीं, गोपींसी बाळकृष्णसा रमला
दावा हो ! सत्वर तो स्वगुरु-वचन-गीत-कृष्णसार
मला ॥१५॥

× * ×

तुमच्या भुजशस्त्रांतें धिक् हा निःसार हो खटाटोप
शिर ज्या न रक्षवे तो, कार्याचा काय ओखटा
टोप ॥ २१ ॥

× * ×

कुंतीस काय सांगूं ? कृष्णेला दाखवूं कसें वदन ?
दुष्कर मला सुभद्रासांत्वन, दुर्दर्श उत्तरासदन २४

× * ×

समयीं कोठें गेल्या ? बा तुज सोडूनि गुरुजनवराशी ?
वाहेल आधिच्या किति ती मृदुल प्रकृति नित्य
नव राशी ॥ २८ ॥
( द्रो. अ. ७ )

अर्जुनाचा शोक व्यासांनीं ६०/७० श्लोकांत आणला आहे त्याबद्दल पंतांनीं ३०/३२ आर्या घातल्या आहेत. व्यासांप्रमाणेंच करुणरसाचा परिपोष पंतांनीं केला आहे. आर्या २ व आर्या ९ या मुळाबरहुकूम आहेत चवदाव्या आर्येचा पहिला चरण हें मुळाचें भाषांतर नाहीं. ज्या मूळ श्लोकाचा भाव पंतांनीं अगदीं निराळ्या शब्दांत सांगितला आहे, तो श्लोक असा आहे.

अपश्यतस्तद् वदनं का शान्तिर्हृदयस्य मे ।
तन्त्रीस्वनसुखं रम्यं पुंस्कोकिलसमध्वनिम् ॥ ३६ ॥
( द्रो. अ. ७२ )

ज्यांतील निघणारा शब्द वीण्याच्या सुरासारखा सुखकारक आहे, कोकिळाच्या स्वरासारखा आहे तें रम्य वदन मला दिसलें नाहीं, तर माझ्या हृदयाची शान्ति कशी होईल ? या सुन्दर वर्णनांत नुसता एकजिनसी करुणरस भरलेला आहे. शिवाय पंतांनीं अभिमन्यूच्या भाषणाला कृष्णमुखीच्या वेणूरवाची गोडी आणून करुणरसात भक्ति मिसळवून त्या वर्णनाला अधिकच शोभा आणली आहे. या १४ व्या

आर्येचा दुसरा चरण यमकाकरितां घातलेला सुन्दर अर्थ साधून देत आहे तो असा. मी ज्याला गुरुसन्निध ( वडील माणसें जवळ असतां ) न घें ( घेत नसें ) पर ( पण ) तो आपण होऊनच मला डिकावाणी ( जो ) स्पर्शे ( येऊन चिकटतसे ). १५ व्या आर्येचा पहिला चरण पंतांचा स्वतंत्र आहे. दुसरा चरण मुळाप्रमाणें आहे. त्यांत अभिमन्यु पितृवचनरत होता असें म्हटलें आहे त्याबद्दल गुरुवचनरूप गीताला अभिमन्युरूप हरिण भुलत असे असें पंत म्हणतात. २१ वी आर्या मुळाप्रमाणें आहे. २४ वी आर्या मात्र करुणरसाची सीमा आहे. मुळांतील सुभद्रा व द्रौपदी यांच्या पंक्तीला कुन्तीला व उत्तरेला बसवून पंतांनीं शोकसागराला पूर्ण भरती आणली आहे. इतकी सुन्दर आर्या विरळा. अमर झालेल्या आर्यांत ही अमर आहे. २८ वी आर्या ही पंतांची स्वतंत्र आहे. इतका शोक केल्यावर शेवटीं मात्र अर्जुनाचें अर्जुनत्व दाखविणारा अर्जुनानें एकच प्रश्न विचारला तो असा.

अभिमुख पर प्रहारें पडला कीं, धर्मराज ! सांगावें ।
प्रभुजी ! न जें यशस्कर तें स्वगुरुसमक्ष तोंक कां ॥
गावें ? ॥ ३४ ॥

ही आर्या फार सरस आहे. पहिला चरण मुळाला धरून आहे. दुसरा यमकाकरतां घातलेला पहिल्याचरणांतील रसाची वृद्धिच करीत आहे. ३४ वी आर्या मुळास सामान्यतः धरून आहे. कृष्णानें मग अर्जुनाचें सांत्वन केलें व उद्यां सूर्यास्ताच्या आंत जयद्रथ वध करीन व तसें न घडल्यास अग्निकाष्ठ भक्षण करीन अशी अर्जुनानें प्रतिज्ञा केली व घ सुभद्रेला भेटून तिचें सांत्वन कर असें अर्जुनानें कृष्णाला विनविलें.

विजय म्हणे माधवजी ! दावाया वदन न स्वसे लाजा ।
शोकाग्नि तिचा विझवा, भिजवा पुसून नयन स्वसेला
जा. ॥ १९ ॥ ( द्रो. अ. ८ )

हिचा अर्थ सरळ आहे. ढळढळां रडणाऱ्या आपल्या बहिणीचे डोळे स्वतःच्या शेल्यानें पुसून भिजवा ही प्रेमाची भाषा पंतांच्या पदरची आहे. सुभद्रेनें पुष्कळ विलाप केला, तो व्यासांनीं ३०।३५ श्लोकांत आणला आहे त्यास संक्षेप देऊन त्याचें वर्णन सहा आर्यांत पंतानीं केलें आहे.

ऐकुनि म्हणे सुभद्रा हा वत्सा !
काल काय हा निधना ? ।
झाली कशी अकस्मात् धनलुब्धाच्या
समूळ हानि धना ? ॥ २७ ॥
शोकीं कसे बुडविले माझे, असु उत्तरासुसह सारे ।
झालासि स्वप्नींचा निधिसा तूं ! दृष्टनष्ट सहसा
रे ! ॥ २८ ॥
धिक् पाण्डुयदुबळातें रक्षाया न शकलें
मुलाला जें ।
स्वपतिपराक्रमवर्णनशीलत्वें मीहि बा ! तुला लाजें
॥ २९ ॥
झालें व्यर्थ वृकोदर भावोजीचें बलाढ्यपण
आजी ।
वाटे मरेल शोकें, नातू आहेत फार पण आजी
॥ ३० ॥
हा वत्सा ! धैर्य निधे ! हा वत्सा जनमनोहराकारा !
हा वत्सा ! कुलतिलका ! हा वत्सा सर्व सद्
गुणाधारा ! ॥ ३१ ॥
जी शूरसाधुधार्मिकपितृसुरगुरुविप्रभक्त-परमगति ।
प्राप्त असो तुज वत्सा ! विरह न देउ कदापि
पर मग ती ॥ ३२ ॥

२७, ३०, ३१ व ३२ या आर्यांचे पहिले चरण व २८।२९ या आर्यांचे दुसरे चरण व ३१ समग्र आर्या हीं मुळाला धरून आहेत. पण अर्जुनाच्या बलाचा धिक्कार मुळाप्रमाणें त्याचें नांव घेऊन प्रत्यक्ष रीतीनें न करतां सुभद्रेनें तो अप्रत्यक्ष रीतीनें म्हणजे स्वपतीच्या पराक्रमाचें वर्णन उठल्या बसल्या करीत राहण्याच्या स्वतःच्या शीलाचाच धिक्कार

[illegible]न केला आहे. त्यांत फार शालीनता भरली आहे. ही योजना पंतांची स्वतःची आहे. ३० व्या आर्येच्या दुसऱ्या चरणांत जें अनुमान पंतांनीं काढलें आहे, तें स्वाभाविक आहे. मुळांतील भावार्थ पंतांनीं सामान्यतः आणला आहे. पण एक उत्तम श्लोक किंवा त्याचा भावार्थ पंतांनीं वगळला आहे तो असा·

एह्येहि तृषितो वत्स स्तनौ पूर्णौ पिबाशु मे ।
अंकमारुह्य मंदाया अतृप्तायाश्च दर्शने ॥ १६ ॥
( महा. द्रो. प. अ. ७८ )

वत्सा ! ये ! अरे, तुला तलफ आली असेल ! मला कसा पान्हा फुटला आहे ! तुझें दर्शन कितीही वेळां झालें, तरी अतृप्त राहणाऱ्या या मंदभागिनीच्या अंकावर आरूढ होऊन तो सत्वर पी बरें ! इ. व्यासांच्या या वाक्यांत मातृप्रेम अतिशय दाटून तें पाझरूं लागलें आहे.

सारी रात्र कृष्णाला झोप येईना. तेव्हां कृष्ण दारुकनामक आपल्या सारथ्याला म्हणाला, अर्जुनाहून मला कोणी अधिक प्रिय नाहीं. अनर्जुन झालेला हा लोक मला पाहणें शक्य नाहीं. त्याची प्रतिज्ञा खरी करून दाखविणें आहे. हा सरळ अर्थ पंतांनीं आपल्या अलंकारिक पण तितक्या सरळ भाषेत आणला आहे तो असा.

भक्तीं जसा महात्मा देहींहि तसा न दारुका रमला ।
या विजयवेदवचना यावा लागे सदा रुकार
मला ॥ ५२ ॥
निजरक्षणाधिक ध्वजरक्षण राजासि दारुका ! घडतें
मोलें राजशिराहुनि बहु असतें काय दारु कापड
तें ? ॥५३॥

भावार्थः–हे दारुका ! माझा आत्मा भक्ताच्या देहांत जसा रमतो तसा माझ्या देहांत रमत नाहीं. म्हणून या विजयाच्या वचनाला वेदवचनाप्रमाणें मला रुकार द्यावा लागतो ! येथें सुंदर अर्थ व सहा-अक्षरी यमक साधून पहिल्या चरणांत व्यतिरेक व दुसऱ्यांत रूपक साधलें आहे. पुढें कृष्ण म्हणाला, हे दारुका ! स्वतःच्या रक्षणाहून ध्वजरक्षणच राजाला अधिक असलें, म्हणून तुला असें वाटतें काय, कीं राजाला आपल्या शिराहून दारु ( लांकडाची काठी ) व कापड यांनीं बनविलेले ( निशाण ) मोलानें एरव्ही अधिक असतें ? येथेंही सुंदर अर्थ व सहा अक्षरी यमकही साधून मधालंकार साधला आहे.

दुसऱ्या दिवशी युद्धाला अर्जुन निघाला. कृष्णानें हातांत चाबूक घेतला तेव्हां कृष्णाची भक्तवत्सलता दाखविणारी एक आर्या पंतांनीं घातली आहे.

अनुभवती रूपाची एकस्थिति एक हानि पट सूत
तैसे हे कृष्ण सखे एक रथी एक हा निपट सूत ८
( द्रो. अ. ९ )

तन्तू व पट दिसण्यांत निराळे असले,तरी वस्तुतः एकच आहेत. एकाची स्थिति (अस्तित्वांत असणें) जसें दुसऱ्यावर अवलंबून असतें, तशी एकाची हानि ( लय ) ही दुसऱ्यावर अवलंबून असते. म्हणजे जसें तन्तु व पट यांचें तत्त्वतः ऐक्य आहे तसेंच दिसण्यांत एक रथी (रथांत बसणारा) व एक सूत ( रथ हांकणारा ) असे सखे कृष्ण ( अर्जुन व कृष्ण ) निराळे दिसले, तरी तत्त्वतः एकच आहेत. पंतांचा वेदांतशास्त्राशीं परिचय होता असें ही आर्या सांगते.

कर्णाची भीमाशीं गांठ पडली तेव्हां कर्ण भीमाला हंसत हंसत म्हणतो,

तूवरका ! औदरिका ! टाकुनि आलास कां महानस रे !
भ्याडा ! अणिकांत सरो, दुसरा, वीरांत, काम हा
न सरे १७५
बहु अशन-सूद-ताडनपंडित, तूं रणमुर्खा न कोविद
रे ! ॥
भीरु जयश्रीस तसे, कन्येला वर जसे नको,
विदरे ॥ १७६ ॥
मजसीं भिडसी भ्याडा ! सिंहासीं जेविं विप्रताप
ससा ।
बाळा ! तपोवनाश्रित हो तूं रणभीरु, विप्र ताप-
ससा ॥ १७७ ॥
द्रो. अ. १२

या भाषणाचे मूळ श्लोक सात आहेत. त्याकडे पंतांनीं चार आर्या लावल्या आहेत. त्यांपैकीं तीन वर दिल्या आहेत. सामान्यतः मूळांतील अर्थाला या धरून आहेत. १७५–७६ आर्यांचे दुसरे चरण स्वतंत्र आहेत व ते नेहमींप्रमाणें यमकाकरितांच आहेत. १७६ व्या आर्येच्या दुसऱ्या चरणांतील उपमा सुन्दर असून नित्यव्यवहारांतील आहे.

जयद्रथवध झाल्यावर अर्जुनाची व भीमाची भेट झाली, तेव्हां "मला कर्ण असें असें टोंचून बोलला" असें अर्जुनाला सांगून भीम म्हणाला

ऐसें म्हणेल त्यातें मारावें तत्क्षणीं न सोडावें
हें त्वांचि मत्प्रतिज्ञावच, दीनापत्यसेंचि पोसावें
॥ ३६ ॥
( द्रो. अ. १५ )

मला अपमानपूर्वक कर्ण बोलला. मी त्याचा वध करीन अशी प्रतिज्ञा केली आहे. तिचें पोषण तूं केलें पहिजे. हा अर्थ मुळाला धरून आहे.दीनापत्याची उपमा स्वतंत्र आहे; पण हाच अर्थ अधिक स्पष्ट करून पंत एका स्वतंत्र आर्येत म्हणतात:

जसि आपली, तसि बुडों दे बुध पंकांत गाय न पराची
गान पटु सखा समयीं सांवरितो तान गायन पराची ॥ ३७ ॥

पहिल्या चरणांतील उपमा सुन्दर आहे. स्वतः गाय पाळून ज्याला तिची किंमत कळून आली आहे, तो बुध मनुष्य जशी आपली गाय चिखलांत बुडूं देत नाहीं, तशीच तो दुसऱ्याची देत नाहीं, असा सुन्दर अर्थ तिनें साधला आहे. त्याहून सुन्दर अर्थ दुसऱ्या चरणांतील दृष्टान्तानें साधला आहे. आपला गायक मित्र तान घेतांना कोठें फंसत आहे तें अज माबून तेथूनच ती तान उचलून जसा त्याचा गान-पटु सखा ( साथीदार ) तो पुरी करतो व त्याची बाजू संभाळतो, तशी माझी कर्णवधाची प्रतिज्ञा, प्रतिज्ञा पुरी करण्याच्या कामांत प्रवीण असा तूं ती फंसूं न देता पुरी कर व माझी बाजू संभाळ.

जयद्रथाचें रक्षण द्रोणाच्या हातून झालें नाहीं अशी निंदा दुर्योधनानें कर्णाजवळ केली. तेव्हां त्याची समजूत घालतांना कर्ण म्हणालाः

अनुकूल दैव असतां न समर्थ करावयासि हानि यम;
होतां तें प्रतिकूल प्रबलहि दुर्बलचि होय; हा
नियम १५ ॥
( द्रो. प. १६ )

हींत पंतांचें आवडतें यमक आलें आहे.

नंतर भीमपुत्र घटोत्कच व अश्वत्थामा यांचें वाग्युद्ध झालें, त्यांत घटोत्कच अश्वत्थाम्याला म्हणाला

जे समरीं अनिवर्ती पाण्डव त्यांचा कुमार हा वडिल
आणिल मनांत तरि, यमकासरचर्में स्वर्दुंदुभी
मढिल ॥ ८२ ॥
( द्रो. अ. १६ )

पहिला चरण मुळाला धरून आहे. दुसरा चरण स्वतंत्र आहे. यमकाकरितां नाहीं. त्याचा अर्थ चांगला आहे.

हा मनांत आणिल तर प्रत्यक्ष यमाच्या महिषाचा वध करून त्याचें कातडें आणून त्यानें आपल्या यशाचा डंका वाजवणाऱ्या दुदुंभीला (नगाऱ्याला ) मढवील. यांत निर्भयपणा, क्रूरता शत्रुसैन्याचा वध इ० शौर्याचे प्रकार ध्वनित केलेले आहेत. ते त्याच्या राक्षसत्वाला उचितच आहेत.

दुर्योधनाजवळ आपलें प्रागल्भ्य प्रकट करणाऱ्या कर्णाचा कृपाचार्यांनीं निषेध केला, तेव्हां ते म्हणाले

शूर भुजांनीं क्षत्रिय, शब्दांनीं विप्र, पार्थ चापानें
केवळ मनोरथांनीं कर्णा ! तूं शूर न प्रतापानें! ३७
(द्रो. अ. १७ )

हें मुळाचें शब्दशः भाषांतर आहे त्यांत चांगल्या पैकीं अर्थ असल्यामुळें दिलें आहे. येथें परिसंख्या अलंकार साधला आहे.

पुढें नरोवाकुंजरोवा हे प्रकरण उद्‌भवून द्रोणाचार्यांनीं शस्त्रसंन्यास केल्यावर द्रोणवध धृष्टद्युम्नाच्या हातून झाला. पार्थाला व्यास दर्शन झालें. त्यांना

पार्थानें विचारलें, " जेव्हां जेव्हां मी समरांगणांत जातों, तेव्हां तेव्हां मला एक दिव्य पुरुष साक्षात्कारीसा दिसतो तो कोण ?" व्यास म्हणाले, "तो शंकर आहे. मागें एका प्रसंगीं त्याची स्तुति करण्यास भूलोकीं चला असें ब्रह्मदेव अमरांना म्हणाला व त्यांना घेऊन त्याची त्यानें अशी अशी स्तुति केली." यांत भूलोकीं चला इतकेंच वाक्य आहे.त्या अर्थाची पंतांनीं एक आर्या घातली आहे.

येतों चला भ्रमाया संसारीं चाकवत; चुकाना कीं.
कैंचें अमृत मिळेल ? न चाखाया चाकवत
चुका नाकीं २३ ॥ (द्रो. अ. २४)

संसारांत चक्रवत् भ्रमण करावें लागतें तें चुकत नाहीं असें सांगून तेथें स्वर्गांतील अमृत कसचें मिळेल ? असा प्रश्न करून तेथें स्वर्गीं नसणारी चाकवताची व चुक्याची भाजी मिळेल. असें पंतांनीं सांगितलें आहे. येथें चाकवत चुका या साध्या भाज्यांसारख्या साध्या पदार्थांचा उल्लेख केला आहे. तसा अनेक स्थळीं आढळतो. साध्या पदार्थांचा उल्लेख करणें ही एक पंतांच्या स्वभावाची खूण आहे.

नित्याप्रमाणें हें पर्व श्रीरामपदीं अर्पण केलेलें आहे.

## कर्णपर्व

भीष्म व द्रोण यांच्या निधनानंतर कर्णाला दुर्योधनानें सेनापतित्व दिल्यावर त्यानें युद्ध कसें केलें तें सांगतांना संजय म्हणाला

अद्भुतकर्णशरासनघनजनितामित विशुद्ध
शरधारा ॥
तापविती, कांपविती, निर्मिति, तटिनी
जपाकुसुमकारा ॥ १७ ॥ (क. अ. २)

विलक्षण पराक्रमी जो कर्ण त्याच्या चापरुप मेघापासून उत्पन्न झालेल्या असंख्य बाणरूप धारा शत्रूंनां तापवीत होत्या, कांपवीत होत्या व त्यांच्या रक्तानें ( जपाकुसमकारा ) जास्वंदीच्या फुलाप्रमाणें रक्तवर्णाच्या नद्या निर्माण करीत होत्या. "रक्तवर्णाच्या" या शब्दावरून रक्तांच्या नद्या हें ध्वनित केलें आहे.

वरील आर्येच्या पहिल्या ओळींतील पल्लेदार समास तींतील वीर रसाला पोषक झाला आहे. ही ओळ मुळाला धरून आहे व दुसरी स्वतंत्र आहे. तींत तापविती इ० तीन क्रियांना धारा हा एकच कर्ता प्रदीप्त करीत आहे म्हणून तेथें कारकदीपक अलंकार साधला आहे.

मग द्रोणनिधनानंतरच्या पुढील युद्धांत उभयपक्षीं कोणीकोणी कसेकसे वीर मारले व कोणकोण शेष उरले तें धृतराष्ट्रानें विचारल्यावरून त्यांचें निवेदन करतांना संजय म्हणाला, "कर्णपुत्र प्रमुख इतके इतके शेष उरले आहेत. त्यांच्यामध्यें तुझा पुत्र दुर्योधन जयोत्सुक असा शोभत आहे." तेव्हां धृतराष्ट्र म्हणाला.

गुरु, कर्ण भीष्म मेले, उरले ते मृतचि;
काय परि सांगा !
वीर खरे ते गेले; शुद्धजयश्री कधीं न वरि सांगा!
॥ १३ ॥ (क. अ. ५)

स्वजय-प्रासादाचे पडले मोडोनि भीष्मगुरु खांब
शोकभरें मज मूर्छा आली क्षणमात्र संजया !
थांब ॥१४॥

धृतराष्ट्राच्या म्हणण्याचें तात्पर्य मुळाप्रमाणें आहे. पण १४ व्या आर्येचा पहिला चरण स्वतंत्र आहे. जयश्रीरूपप्रासाद हें एकरूपक व भीष्म गुरुरूपी खांब हें दुसरें रूपक हीं एकमेकांवर अवलंबून असल्यामुळें येथें परंपरित रूपक साधलें आहे. दोन्ही आर्यांनीं करुण रस चांगला साधला आहे. त्याचा पाक धृतराष्ट्राच्या मूर्छेनें पुरा केला आहे.

कर्णाच्या मरणाची वार्ता धृतराष्ट्राला खरी वाटली नाहीं.

शोषण जलराशीचें, संसर्पण जेविं रत्नसानूचें
अद्भुत वृषमरण गमे, कीं गगनाहूनि पतन
भानूचें ॥ २ ॥ (क. अ. ६)

ती समुद्राच्या शोषणाप्रमाणें इ० वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें लटकी वाटली.

नृपति बहु विलाप करी सूतासिं म्हणे अहा कसें घडलें?
ब्रा ! संजया ! अकस्मात् , रविबिंब गळोनि भूतळीं
पडलें ॥ ३ ॥

वरील दोन्हीं आर्या यथामूल आहेत. कर्णनिधनाला दिलेल्या असंभव प्रकाराच्या उपमा जेवढ्या मूळांत आहेत तेवढ्या पंतांनीं घेतल्या नाहींत. त्यांनीं वगळलेल्यापैकीं एक अशी आहे. ती उत्तम म्हणून दिली आहे.

कर्मयोरिव वैफल्यं उभयोः पुण्यपापयोः ६
(म. क. अ. ८)

ज्याच्या-त्याच्या पापकर्माचें किंवा पुण्यकर्माचें फल प्रत्येकाला मिळालेंच पाहिजे, हा हिंदुधर्मशास्त्राचें वैशिष्ट्य दाखविणारा एक धार्मिक सिद्धान्त आहे. त्याच्यावर पुरातन कालापासून अद्यापपर्यंत प्रत्येक हिंदूची श्रद्धा आहे इतकें त्याचें महत्त्व आहे. धृतराष्ट्र म्हणाला "कर्माला विफलत्व आलें असें कोणी म्हणेल, तर तें जसें कोणाला खरें वाटणार नाहीं तसें मला हें कर्णाच्या मरणाचें वृत्त खरें वाटत नाहीं."

धृतराष्ट्र पुढें म्हणाला.

वज्राहुनि कठिण हृदय, शोकघनाहत तऱ्ही तगे, न चिरे।
बा! दग्धपक्षबल मी संपातिद्विज तसा तगेन-चिरे ॥ १५ ॥
पावककुण्डांत शिरूं? कीं सेवूं संजया महा विष मी?।
किंवा चढों पडाया मरणार्थ महाद्रिच्या शिरीं विषमीं?॥ १६ ॥

× × ×

हे गांधारी जरि शतपुत्र, मुनींच्या अनुग्रहें व्याली।
झाली वंध्याचि पहा. बहु नियति क्रौर्य धरि, न हे व्याली ॥ २५ ॥

कर्णमरणाची वार्ता ऐकूनही मी मरत नाहीं, तेव्हां माझ्या नशिबीं आणखी जगावयाचें आहे. पण तें जगणें संपातीच्या जगण्याप्रमाणें आहे. संपाति द्विज (पक्षी) सूर्यमंडळ गांठावयास गेला असतां दग्धपक्ष-बल (पंख जळून गेल्यामुळें हतबल) होऊन महेन्द्र पर्वतावर जसा पडून राहिला तसा मीहि दग्धपक्षबल (माझ्या पक्षांतील सैन्य दग्ध झाल्यावर) नुसता पडून जिवन्त राहीन; असा धृतराष्ट्राच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. या आर्येच्या दुसऱ्या चरणांतील संपातीची उपमा पंतांची स्वतंत्र आहे. दग्धपक्ष-बल हा समानधर्म मुळाला धरून आहे व तो संपातीला लागू असल्यामुळें त्याची उपमा येथें फार खुलून दिसत आहे. सोळावी आर्या मुळास धरून आहे. २५ व्या आर्येंत धृतराष्ट्राच्या दुःखाची खोली अजमावलेली आहे. धृतराष्ट्र म्हणाला माझी पत्नी मुनीच्या प्रसादानें शंभर पुत्र प्रसवली; पण शेवटीं अपुत्राच झाली! नियतीनें जेवढें क्रौर्य धारण केलें आहे, तसें व्याली (सर्पीणही) धारण करीत नाहीं. यांत शतपुत्र गांधारी वंध्या झाली या म्हणण्यांत विरोधाभास अलंकार आला असून नियति व्यालीहून क्रूर आहे या म्हणण्यांत व्यतिरेक अलंकार आला आहे.

कर्णानें व्यूह रचून युद्धाला आरंभ केला. त्या वेळीं अर्जुनानें भराभर बाण सोडले. त्याचें वर्णन करतांना पंत म्हणतातः

नवनव निघती विजयशर माहेरीं गीत जेविं दळपांत।
संशसकांत शिरती, हरिणांच्या जेविं सिंह कळपांत ॥ १६
(क. अ. १२)

पहिल्या चरणांतील सुंदर उपमा पंतांची स्वतंत्र आहे.

माहेरीं मुली जात्यावर दळावयाला बसल्या, म्हणजे त्यांना मोकळेपणा असतो. संकोच नसतो; म्हणून एकीमागून एक ओव्या भराभर सुचून त्यांच्या तोंडांतून जशा भराभर निघून जातात, तसे अर्जुनाच्या धनुष्यांतून नवेनवे बाण भरभर सुटत गेले. असली उपमा देण्यांत पंतांचा हातखण्डा आहे.

कृपाचार्य व धृष्टद्युम्न यांचें संकुल युद्ध झालें. त्यांत धृष्टद्युम्नाचा पाडाव व्हावयाची वेळ आली. अशा संकटसमयीं कर्तव्य काय (युद्ध कसें करावें)

तें त्याच सुयोधन एवढेंच मुळांत आहे; तें पंतांनीं एका आर्येंत विस्तृतपणें सांगितलें आहे.

न दिसे गुण, शर, न चले कर, पोकळ होय मुष्टि
इष्वसनीं ।
धृष्टद्युम्न भ्रमला, न सुचे कर्तव्यलेशही व्यसनीं
॥ ५ ॥ ( क. अ. १६ )

येथें स्वभावोक्ति अलंकार चांगला साधला आहे. पार्थाच्या पुढें कर्णाचा टिकाव न लागून कर्णाचा पराभव झाला. तेव्हां सूर्य अस्तगिरीवर जाऊन ठाकला होता असें मुळांत आहे. त्याविषयीं पंत म्हणतात,

पार्थ जयातें पावे, तो रविहि अस्तगिरिचिया
शिखरा ।
कर्ण पराभव समयीं रुचला भृगुपात हा तयाशि
खरा ॥ ३१ ॥
( क. अ. १९ )

पहिल्या चरणांत पार्थ जयातें पावे व रविहि अस्त गिरीच्या शिखरावर पावे असें आहे. येथें " पावे " हा शब्द मध्यावर दीपासारखा उभा राहून दोन वाक्यांना प्रदीप्त करीत आहे; म्हणून दीपक अलंकार येथें झाला आहे व तो क्रियाविषयक असल्यामुळें त्यास कारक दीपक म्हणतात. रवीचें अस्ताला जाणें नेहमीच्या सृष्टिक्रमाप्रमाणें आहे; तरी पंत म्हणतात कर्णाचा ( आपल्या पुत्राचा ) पराभव रवीला पाहवेना म्हणूनच त्यानें अस्तगिरिशिखरावरून कडेलोट करून घेतला ! ही उत्प्रेक्षा संदर आहे. परंतु रवीच्या अस्ताशीं कर्णपराभवाचा संबंध नसतां तो कवीनें जोडला आहे म्हणून ही उत्प्रेक्षा अतिशयोक्तीशीं मिश्र झाली आहे. पुढें संजयानें अर्जुनकृत सुभद्राहरणादिक पराक्रमाचें वर्णन केलें एवढेंच मुळांत आहे. पण पंत म्हणतात, अशा अर्जुनाशीं वैर करून सुयोधन खल असून धन्य झाला; कारण त्याची विरोधभक्ति जशी रावणाची रामाशीं* होती तशी होती.

* लेंढनच आसीच विरोधभक्ति परमेश्वराशीं होती. ती [illegible] पंडित [illegible] हें काव्य वाचल्यावर कळेल.

प्रभुशींहि वैर करतां कुणाहि पावे प्रसिद्धिला लोकीं ।
रामद्वेषी सीतादुःखद दशकंठ खल जसा तो कीं
॥ ११ ॥ ( क. अ. २० )

येथें पहिल्या चरणांत सामान्यनियम कथन केला आहे व त्याच्या समर्थनार्थ एक विशेष उदाहरण दाखल केलें आहे म्हणून हा अर्थांतरन्यास अलंकार झाला. याच रात्रीं वीरसभा भरली होती. तींत कर्णानें केलेली स्वतःच्या पराक्रमाची प्रशंसा; अर्जुनापेक्षां कांहीं बाबतींत तो श्रेष्ठ कसा, दोघांत साम्य कसें, यांचें कर्णकृत निदर्शन; पार्थ विजयी होतो तो कृष्णासारखा सारथि आहे म्हणून, असें कर्णकृत प्रतिपादन व मला शल्य सारथी मिळवून देशील तर मी जयी होईन अशी दुर्योधनास कर्णानें केलेली सूचना; ती प्रमाणें

अरुण रवीचा सारथि, दहनाचा वायु, यत्न कीं
विधिचा ।
सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्यबळपयोनिधिचा १२
( क. अ. २१ )

या शब्दांत दुर्योधनानें शल्याला केलेली जोराची विनंति; तीमुळें कुल, ऐश्वर्य व श्रुत यांचा गर्व वाहणाऱ्या शल्याला आलेला क्रोध व

भूमि विदारीन शरें, तेजें शोषीन वारिराशि, खरी ।
गोष्टि तुला कथितों, मीं पिष्ट करिन कौरवेश्वरा !
शिखरी ॥ २३ ॥
( अ. २१ )

या शब्दांत शल्यानें केलेली गर्वोक्ति; " अशा महा-पराक्रमी पुरुषाला, मला त्या नीच सूताचें सारथ्य सांगतोस " या शब्दांत शल्यानें व्यक्त केलेला आपला अपमान; शल्याचें रागानें वीरसभेंतून उठून जाणें; " मला पार्थाधिक कर्ण व कृष्णाधिक तूं " अशी शल्याची दुर्योधनानें घातलेली समजूत; " कर्ण सूतपुत्र नाहीं, कारण मृगी सिंहाला कशी प्रसवेल !" असा दुर्योधनाचा शल्याशीं युक्तिवाद व शल्यानें सारथ्य करण्याची दिलेली कबुली; हा सर्व प्रकार

व्यासांनीं व पंतांनीं फार माधुर्यानें वर्णन केला आहे. म्हणून व्यासाचे मूळ ३१ ते ३२ अध्याय व पंतांचे २० व २१ हे दोन अध्याय वाचावे. त्यांत पंतांची कृति मुळाला पुरुषाच्या सांवलीप्रमाणें चिकटून असलेली आढळेल.

वीरसभेंत मला देवकीपुत्राहून विशेष म्हटलेंस यावरून मी तुझ्यावर " बहुत खूष " ( प्रीतिमान् ) आहें हा मी कर्णाचें सारथ्य करण्यास सज्ज आहें " असें वचन देतांना शल्यानें एक अट घातली ती अशीः

"सारथि होतों परि मी प्रभु,सूतातें म्हणेन कां हां जी।
गांजीन परि सहावें, म्हणिजे वैद्यें दिली सुधा कांजी !
॥ ४० ॥

मी क्षत्रिय राजा या सूताची हांजी हांजी करणार नाहीं. मी याला हवें तसें बोलून गांजीन; तरी उलट यानेंच माझी हांजी हांजी केली पाहिजे. उदाहरणार्थ जसें वैद्यानें कांजी दिली तरी ती अमृत आहे असें रोग्यानें म्हटलें पाहिजे तसें. येथें पंतांनीं हांजी हांजीचा प्रकार उत्कृष्ट तऱ्हेनें वर्णन केला आहे. तिचा अनुभव त्यांना कोठें आला होता ?

असो. ही अट मान्य झाली. रथावर कर्ण चढला व शल्याजवळ " मी यंव करीन त्यंव करीन, अर्जुनावर असे बाण सोडीन" अशी प्रौढी मारूं लागला. तेव्हां शल्य म्हणाला " हें बोलणें तुला शोभत नाहीं. " तोच आशय पंतांनीं आपल्या अलंकारिक भाषेंत आणला आहे. तो असा.

शल्य म्हणे सूतसुता ! कां गा अवमानिसी
सु-भव्य-जना ?
वंशजहि शूर्प न गुणें लंघी सभ्यादृता शुभ-
व्यजना ! ॥ १७ ॥
( क. अ. २४ )

शूर्प ( सूप ) वंशज कळकापासून उत्पन्न झालेलें असतें तसा शुभ-व्यजन वाऱ्याचा पुरवठा करून सुख देणारा व्यजन ( पंखा ) सुद्धां वंशज ( कळकापासूनच उत्पन्न झालेला) असतो. पण सूप हें चांगल्याच्या हातीं जात नसतें. पंखा सभ्यादृत असतो.म्हणजे सभाजनांकडून आदरला जातो.म्हणून सूप, गुणांनीं व्यजनाला न लंघी;पंख्याहून श्रेष्ठ ठरत नाहीं. त्याप्रमाणें तूं सूतपुत्रा ! कुन्तीपासून पाण्डवांप्रमाणेंच उत्पन्न झालेला असून तूं सूतकुलांत वाढवला गेल्यामुळें राजकुलांत वाढलेल्या पाण्डवांवर जय मिळवूं शकणार नाहींस. हा गोड अर्थ, पंतांनीं स्वतंत्रपणें साधला आहे. सद्-वंशज या शब्दांत श्लेष आहे. तो आमच्या कवींचा आवडता आहे.

एका हातांत व्यासांच्या कर्णपर्वांतील विस्तृत अध्याय ३६ ते ४४ याचा कांहीं भाग व अध्याय ४५ व दुसऱ्यांत पंतांचे त्याच पर्वांतील २४ ते २९ साधारणतः संक्षिप्त अध्याय घेऊन वाचावयास पाहिजेत. कर्ण व शल्य हीं जीं दोन विशिष्ट सौन्दर्याचीं चित्रें व्यासांनीं रंगवलीं आहेत, त्यांस मराठी वेष देतांना पंत अगदीं व्यासांशीं समरस झाले आहेत. या अध्यायांतील वाटेल तो श्लोक काढून तो पंतांच्या भाषांतरित आर्येशीं ताडून पहावा. दोघांत रूप एकच दिसेल. मासल्याकरितां कांहीं दिले आहेत.

### व्यास

शल्य कर्णाच्या वल्गनेचा धिक्कार करतांना म्हणतो
शृगालोऽपि वने कर्ण ! शशैः परिवृतो वसन्
मन्यते सिंहमात्मानं यावत्सिंहं न पश्यति
॥ २८ ॥
( महा. क. अ. ३९ )

### पंत

शशमंण्डळांस कोल्हा म्हणतो 'मी सिंह' वल्गना
करितो
जोंवरि न पाहिला गज-मुक्ताफळ-कवळ-भक्षिता
हरि तो ! ॥ १२ ॥
( क. अ. २७ )

हें अन्योक्तीचें सर्वमान्य उदाहरण आहे. गजाच्या गण्डस्थळाचें विदारण करून आंतील मुक्ताफळाचें भक्षण करणारा असें सिंहाला विशेषण लावून जितकें

कोल्ह्यांत व सिंहांत अंतर आहे तितकें कर्णात व अर्जुनांत अंतर आहे, असें पंतांनीं व्यासांपेक्षां अधिक उत्कर्षानें दाखविलें आहे.

कर्णानें शल्याचें बोलणें ऐकून घेऊन लागलेंच उत्तर दिलें तें

**व्यास**

गुणान्गुणवतां शल्य ! गुणवान्वेत्ति नागुणः
त्वं तु शल्य ! गुणैर्हीनः किंज्ञास्यसि गुणाऽगुणम् ॥२॥
( म. क. अ. ४० )

**पंत**

कर्ण म्हणे गुणवत्गुण जाणे गुणवन्त, अगुण नेणेंची ।
प्रसवे तीच अभिज्ञा ! शल्या ! तैशी न वांझ वेणेची ॥ १४ ॥
तूं गुणहीन गुणागुण कैसा गा ! जाणसील ? अंधानें
कैसें नाट्य पहावें कीं स्वर्गी सुत असत्यसंधानें ?
॥ १५ ॥ ( क. अ. २७ )

येथें श्लोकाच्या पहिल्या चरणाबद्दल १४ व्या आर्येचा पहिला चरण घालून तेंच म्हणणें आर्येच्या दुसऱ्या चरणांत वांझ स्त्रीची उपमा पदरची देऊन अधिक स्पष्ट केलें आहे. येथें प्रतिवस्तूपमा अलंकार साधला आहे. तीच रीति श्लोकाच्या दुसऱ्या चरणाविषयीं १५ व्या आर्येत अनुसरलेली आहे. नंतर कर्णानें केलेली वीरोक्ति पाहा.

**व्यास**

तौ वा मामद्य हन्तारौ हनिष्येवाऽपि तावहम् ।
नाहं बिभेमि कृष्णाभ्याम् विजानन्नात्मनो बलम्
॥ १८–१९ ॥
( म. क. अ. ४० )

**पंत**

ते मारतील मज कीं त्यांला मारीन, मी स्वबळ जाणें ।
कृष्णाला कर्ण न भी; तनु टाकुनि एकदां असे जाणें ॥ ३३ ॥
( क. अ. २७ )

"ते मला मारतील किंवा मी त्यांनां मारीन. मी कर्ण, कृष्णांला ( कृष्ण व अर्जुन या दोघांला ) भीत नाहीं. माझें बळ केवढें आहे तें मी जाणतों." हा एवढा अर्थ मुळाप्रमाणें तंतोतंत पंतांनीं साधून " ही तनु एकदां केव्हां तरी टाकुन प्रत्येकाला जाणेंच आहे" असें कथून पंतांनीं या वीराच्या भाषणांत अधिक उत्साह भरून वीररसाला असामान्य ऊत आणला आहे. पर्जन्य काळीं महावात सुटला असतां भरतीच्या वेळीं लाटांवर लाटा उसळत असतांना समुद्र जें रूप दाखवितो, त्याकडे जसें नुसतें बघत राहावेसें वाटतें, तसें ही आर्या वाचून पदोपदीं वीररसाच्या लाटांवर लाटा उसळविणाऱ्या तिच्या अर्थावर बसलेलें मन तेथून हालत नाहीं. ही आर्या उत्तमोत्तम आहे.

## हंसकाकीय उपाख्यान

महाभारत अध्याय ४१ वा पंत अ. २८; यांतील वरील आख्यान तर अथपासून इतिपर्यंत वाचण्यासारखें आहे तें फार हास्यरसोत्पादक आहे.

समुद्रतीरावर वसणाऱ्या धनिकाच्या कुमारांनीं उडविलेल्या उच्छिष्टावर पुष्ट झालेला काक मत्त होऊन तेथें प्राप्त झालेल्या हंसाशीं 'मला उडण्याचे शतपात ( शतप्रकार अथवा गती ) येतात' अशी प्रौढी मारतो व एकपात जाणणाऱ्या हंसाची हुर्यो करून त्याच्याबरोबर समुद्रांत दूरवर स्पर्धा करण्यास उडत जातो. कावळा लवकर दमून पाण्यांत पडतो व त्याच्या नाकांत व तोंडांत पाणी शिरतें. तेव्हां हंस म्हणतो.

**व्यास**

किं नाम पतितं काक ! यत्त्वं पतसि सांप्रतम् ।
जलं स्पृशसि पक्षाभ्याम् तुण्डेन च पुनः पुनः ॥ ५४ ॥
प्रब्रूहि कतमे तत्र पाते वर्तसि वायस ५५।१
( म. क. अ ४१ )

### पंत

तुणामध्यें पक्षगुणीं शिकती काका ! क्षणाक्षण जळाला !
या वाणिचें नाम कथीं, दे अकुनि सर्व संशय
जळाला ॥ ५५ ॥

वद काय नाम काका ! या पातांचें.शतीं असे हा कीं ?
त्याहूनि वेगळाची ? स्पष्ट कथीं मौन एकदां टाकीं !
॥ ५६ ॥ ( क. अ. २८ )

नाकातोंडांत पाणी शिरून काक मरावयाची वेळ आली आहे तरी हंस वेड्याचें सोंग घेऊन त्याला विचारीत आहे "अरे ! तुझ्या गतीच्या कोणत्या प्रकाराचें प्रदर्शन करीत आहेस ? एकदां चोंचीनें, एकदां पंखांनीं, पाण्यास स्पर्श करितोस. तुझ्या शंभर गतींच्या प्रकारांत हा येतो कीं नाहीं ? का वेगळाच कांहीं काढला आहेस !" यांच्यामध्यें विनोद आहे. त्याचें मार्दव अनुपम आहे. तलवारीचा वार सफाईनें केला असतां तो ज्याला लागतो त्याला तो कांहीं वेळ कळतसुद्धां नाहीं. तिलक्याच सफाईचा हा उपहासाचा प्रकार आहे.

कधीं कधीं पंत नव्या आर्या घालून व्यासांचा अर्थ खुलवून सांगतांना आढळतात. मद्रदेशांतील लोकांची निंदा कर्णानें केली. त्यावर शल्यानें उत्तर दिलें तें

### व्यास

न कर्ण ! देशसामान्यात् सर्वः पापं निषेवते ४६
( म. क. अ. ४५ )

### पंत

अरि पापदेशवासी, तरि न करी पाप सर्व जन कांहीं ।
नित्य खळांतचि असतां साधु खळाच्या गुणां
शिकत नाहीं ॥ ४७ ॥
( क. अ. २९ )

पंकांत पद्म न मळे; काकांच्या दुर्गुणा शिके न पिक ।
चंदन परगंध न घे; होय तृणांमाजि तृणचि काय
पिक ? ॥ ४८ ॥

साधु खळांत राहून त्याचे गुण घेत नाहीं हे. असद्गुण अलंकार हे पंतांचे स्वतंत्र आहेत.

यमकाकरितां आर्येच्या दुसऱ्या चरणांत एखादा अलंकार घालावयाचा असा पंतांचा प्रघात आढळतो, तसा त्यांचा दुसरा असा प्रघात आढळतो कीं, मुळांतील अलंकार बदलून नवा घालावयाचा. उदाहरण पाहा. अर्जुनानें संशप्तकांना नागास्त्र सोडून पाशबद्ध केलें. त्याचें वर्णन व्यासांनीं केले तें

ते बद्धाः पादबन्धेन पाण्डवेन महात्मना ।
निश्चेष्टाश्चाभवन् राजन्नश्मसारमया इव ॥ २५ ॥
( म. क. अ. ५३ )

व्यास म्हणतात, शत्रु पाशबद्ध झाल्यावर अश्मसार मय वस्तु जशी निश्चेष्ट होते, तसे ते झाले. हेंच पंतकृत वर्णन पहा.

खलसेना निश्चेष्टा केली बांधोनियां तिचे पाय ।
काय यशः पय घ्याया बांधियली फार मारकी
गाय ! ॥ ४१ ॥
( क. अ. ३३ )

यशोरूपी दुग्धदोहनार्थ शत्रूचें पदबन्धन मारक्या गाईचें पदबन्धनच कीं काय अशी पंतांनीं केलेली उत्प्रेक्षा सरस आहे. या पदबंधनाचा उल्लेख व्यासांनी ४।५ वेळां मुळांत केला आहे. तितके वेळां पंतांनीं त्याचा उल्लेख आपल्या आर्यांत करून स्वतंत्र अलंकारांची योजना केली आहे. पण काव्यसंग्रहकारांना अशी शंका आली आहे कीं, यांतील आर्या कांहीं आर्यांचीं पाठान्तरें असावीं; पण त्या तशीं नसून मुळाचींच भाषान्तरें आहेत. पहा. महा. क. अ. ५३. श्लोक २४, २५, २८, २९ व ३२; व. क. ३३ आर्या. या पर्वांत व्यासांशीं पंतानीं जितक्या वेळीं टक्कर दिली, तितक्या वेळां दुसऱ्या कोणत्याही पर्वांत दिलेली आढळत नाहीं. असें मागें दिलेल्या व पुढें दिलेल्या श्लोकांवरून व आर्यांवरून दिसून येईल.

अश्वत्थाम्यानें केलेला पराक्रम पाहून अर्जुनाच्या अंगांत शैथिल्य आलें आहे असें वाटून कृष्ण त्याला म्हणाला

### व्यास

कच्चिद्वीर्यं यथापूर्वं भुजयोर्वा बलं तव ।
कच्चित्ते गाण्डिवं हस्ते रथे तिष्ठसि चार्जुन ॥१३६॥
कच्चित्कुशलिनोबाहू मुष्टिर्वा न व्यशीर्यत ॥ १३७ ॥
( महा. क. प. अ. ५६ )

### पंत

खेळसि कीं तूं भाण्डसि ? आहे बळ तव भुजांत कीं नाहीं ?
चाप असे कीं त्यजिलें बाहूंनीं शक्तिधैर्यही- नाहीं ॥३१॥
आहेसि कीं रथावरि ? निजला नाहींस कीं ? रणाजिर हें,
न गृह; न पर्यंकहि, हा रथ: सुख येथें निजेचिया विरहें ॥ ३२ ॥
( क. अ. ३५ )

अरे ! तूं खेळ चालविला आहेस का युद्ध चालविलें आहेस ? तूं घरांत आहेस कीं रणांत आहेस ? इ० कृष्णाच्या भाषणातील प्रसंगोचित क्रोध पंतांनी आपल्या आर्यांत फार सरस रीतीनें साधला आहे. येथें निश्चयनामक अलंकार साधला आहे. जेथें शंका व तिचें समाधान निश्चित प्रकारें करण्यांत येतें, तेथें हा अलंकार होतो. या भाषणानें चेतना उत्पन्न होऊन अर्जुनानें पराक्रम केला, तो पाहून दुर्योधन आपल्या वीरांस उद्देशून म्हणालाः

### व्यास

यदृच्छयैतत् संप्राप्तं स्वर्गद्वारमपावृतम्
सुखिनः क्षत्रियाःकर्ण लभन्ते युद्धमीदृशम् ॥२॥
( म. क. अ. ५७ )

### पंत

स्वर्गद्वार उघडलें हें दुर्लभ पुण्यपर्व; कां मरणीं भ्यावें ? त्यजितां नश्वर वपु साधति नित्य सर्व काम रणीं ॥ ४२
( क. अ. ३५ )

यांत वीररस ओतप्रोत भरला आहे.

कर्णाकडून धर्माचा पराजय झाला व तो शिबिरांत परत आला. त्याविषयीं पंत म्हणतात.

पल्यंकावरि पडला पाण्डुपृथापुत्र पावला पीडा ।
वैरिविजित विक्षतवपु विमुखत्वें वीरवर वरि व्रीडा॥६॥
( क. अ. ३९ )

पंतांचा विशेष भर अर्थालंकारांवर आहे. मनोहर अर्थ साधाण्याकडे आहे. तथापि क्वचित् प्रसंगीं शब्दलंकारही त्यांनीं काव्यांत योजिले आहेत. त्याचें वरील आर्या हें एक चांगल्यापैकीं उदाहरण आहे. पहिल्या चरणांत "प" या व्यंजनाची पुनरावृत्ति झाली आहे. म्हणून वृत्त्यनुप्रास साधला आहे व दुसऱ्या चरणांत व आणि र या अनेक व्यंजनांची पुनरावृत्ति साधल्या मुळे छेकानुप्रास साधला आहे.

आतांपर्यंत दिलेल्या कांहीं आर्यांवरून असें दिसून येईल की, आर्येच्या पहिल्या चरणांत मूळ अर्थ आणून यमक साधण्याकरतां तिच्या दुसऱ्या चरणांत उपमादि सुन्दर अलंकार पंत घालीत आले. मात्र हें यमक दोनचार अक्षरी तरी लागे; उगाच टला ट व पला प जुळवणारें चाललें नाहीं. पुढील आर्येंत फक्त एकाक्षरी यमक आहे व तें निर्यमक आर्या रचण्याची पद्धत नसल्यामुळे तेवढें साधणें अवश्यच होतें. तरी पंतांनीं आपली स्वतःची कल्पना लढवून पहिल्या चरणांतील अर्थ दुसऱ्या चरणांत स्वतंत्र दृष्टान्तानें कांहीं ठिकाणीं स्पष्ट केला आहे. उदाहरणार्थ पुढील आर्या घ्या.

द्रौणि पुन्हा पार्थासीं युद्ध करायासि आदरें आला ।
पथिक क्षुधित ब्राह्मण दातृगृहा जेंवि फारदा घाला ॥ १० ॥
( क. अ. ३९ )

हा क्षुधित ब्राह्मणाचा दाखला नित्य अनुभवांतला असून या ठिकाणीं उचितच आहे.

धर्माला कर्णाचे बाण लागून तो शिबिरांत परत गेला.तेव्हां भीमाला अर्जुन म्हणाला, "मी धर्माकडे त्याच्या चवकशीला जातों. तूं इकडे संशप्तकांनां आंवरून धर; नाहीं तर त्यांनां मारल्याशिवाय मला येथून हालतां येणार नाहीं." त्यावर भीम म्हणाला "मी त्यांना माझ्या पराक्रमावर गुतवून ठेवतो" एवढेंच मुळांत आहे. त्याविषयीं पंतांची आर्या अशी आहेः

भीम म्हणे संशप्तक कौरव मज सर्व पावले जा ! गा !
आहे निकट निज गदा जगदाद्य दयाळु देवही
जागा ! ॥ ५६ ॥
( क. अ. ३९ )

भीम म्हणतो "संशप्तकचसे काय, पण त्यांच्यासह कौरवांसही अडवून धरतों. ते माझ्या ताब्यांत घेतले. ही पावती घे. तो सर्व भार माझेवर आहे. त्याची काळजी तुला नको. त्यांचा समाचार मी घेतो. कारण ही माझी गदा जवळच सतत सज्ज आहे. दुसरें, त्याहून प्रबळ कारण असें कीं, हा दयाळु देव आमच्या कल्याणार्थ सदैव जागत असतो." येथें कार्याचें कारण समर्पक असल्यानें काव्यलिंग अलंकार साधला आहे. दुसऱ्या चरणांत छेकानुप्रास आहे. भीमाचा आत्मविश्वास व कृष्णावरची त्याची निष्ठा त्याच्या भाषणांत चांगली दिसून येत आहे. या चरणांतील "पावले" हा शब्द फार सुंदर व बृंहितार्थ ( पुष्कळ अर्थ भरलेला ) आहे.

जसा यमकाकरतां पंत नवीन भाग आपल्या आर्यांत आणतात, किंवा व्यासांचा अभिप्राय स्पष्ट करण्याकरतां आणतात, तसाच कधीकधी व्यासांच्या विचाराचा प्रबळ ओघ पुढें चालु ठेवण्याकरितां नवीन भाग आपल्या आर्यांत आणतात व तो भाग सुन्दरही असतो. वर सांगितल्याप्रमाणे धर्म व अर्जुन यांची भेट झाली, तेव्हां धर्म अर्जुनाला म्हणाला, "सर्व सेना पहात असता कर्णानें कवच व ध्वज इत्यादि माझ्या वस्तू भग्न केल्या, तेव्हा तूं जर आज त्याचा वध करणार नाहींस, तर मला माझें जीवित अप्रिय होईल." मुळांत इतकेंच आहे त्याचा ओघ पुढें चालवण्या करता पंत म्हणतात.

बंधुमनोरथपादप सफळ करावा तुवां वसंतानें
व्यसनार्णवमग्नोद्धारें न्यावे ख्यातीस नांव संतानें ॥४०॥
( क. अ. ४३ )

येथें बन्धूच्या मनोरथाचा पादपाशीं अभेद कल्पून जें रूपक साधलें आहे, त्याच्यावर सापेक्ष असें दुसरे रूपक अर्जुनाशीं वसंताचा अभेद कल्पून पंतांनी साधलें आहे. म्हणून हें परंपरित रूपक साधलें आहे. शिवाय यमकाकरितां संतानाचा संकटविमग्नांस मुक्त करून वंशाची कीर्ति वाढविण्याचा महिमा वर्णन केला आहे.

कधीं कधीं पंत अकल्पित अर्थ असलेली भाषा वापरतात ती सुखदायक होते.

पुढें धर्माकडून परत आल्यावर अर्जुनानें धर्माचें कुशल भीमाला कळविलें,तेव्हां भीमाच्या तोंडीं मुळांत नसलेलें वाक्य पंतांनी घातलें आहे.

'आहे स्वस्थ नृप' असें जातांचि सुवृत्त जेधवां सांगे
भीम म्हणे राधे ! हा स्वपराहितहेतु पाळिला
कां गे ! ॥ ४१ ॥
( क. अ. ४४)

धर्माला कर्णापासून कांहीं अपाय तर झाला नाहीं ना अशी जी भीमाला शंका आली होती,तिचें निवारण अर्जुनानें केल्यामुळें मनाला स्वस्थपणा वाटतांच त्या अस्वस्थतेचें कारण जो कर्ण त्यासंबधानें तेथें हजर नसलेल्या राधेला संबोधून भीम म्हणाला 'राधे ! लहानपणींच याच्या गळ्याला नख कां लावलें नाहींस ? याला का वाढविलास? हा आपल्या व शत्रूच्या पक्षाचें अहित करणारा निघाला आहे. तसा ता निघताना !' इंग्रजींत याला अपॉस्ट्रोफी अलंकार म्हणतात. या

अलंकाराचें रहस्य फक्त वर्ण्य विषय-धर्माच्या कुशलतेची जी चिंता ती सोडून तेथें हजर नमलेल्या राधेला संबोधून कांही बोलण्यांत आहे. कर्णाला न वाढविण्याचें स्वपराहितहेतु हें विशेषण कारण दिल्यामुळें येथें परिकर अलंकार साधला आहे.

पुढील युद्धांत भीमानें दुःशासनाचा वध केला व प्रतिज्ञेप्रमाणें त्याचें रक्त भीम प्याला तें पाहून शत्रूचे लोक हा राक्षस आहे असें समजून पळाले इतकें मुळांत आहे. त्याचें वर्णन स्वतंत्र रीतीनें पंतांनीं केलें आहे.

रिपु शूर दूर तेथूनि तें दारुण कर्म पाहतां पळती
किति पडती किति दडती किति एकांची धृता-
युधें गळती ॥ १८ ॥
( क. अ. ४५)

हें वर्णन सरस असून ही आर्या अमर झाली आहे. येथें एककालिक अनेक क्रिया दाखविल्या आहेत, म्हणून समुच्चय अलंकार साधला आहे.

एक गोष्ट अशी आढळून येते कीं अनेकाक्षर यमक साधण्याची पंतांची प्रवृत्ति हें कर्णपर्व रचतांना फार प्रबळ झाली नव्हती, म्हणून मुळांतील अर्थ पंतांनीं कधीं कधीं जशाचा तसा आर्याभारतात आणलेला दिसतो

दुःशासनाचें रक्त पितांना भीम म्हणतो

**व्यास**

स्तन्यस्य मातुर्मधुसर्पिषोर्वा
माध्वीकपानस्यच सत्कृतस्य ।
दिव्यस्य वा तोयरसस्य पानात्
पयोदधिभ्यो मथिताच्च मुख्यात् ॥३०॥
अन्यानि पानानिच यानि लोके ।
सुधामृतस्वादुरसानि तेभ्यः ॥
सर्वेभ्य एवाभ्यधिको रसोऽयम् ।
ममाद्यचास्याहितलोहितस्य ॥ ३१ ॥
( म. क. अ. ८३ )

**पंत**

मथित दधि, दुग्ध, घृत, मधु, माध्वीक,
सुधारसादि जे अन्य ।
जें दिव्य सरित् सलिलहि मातेचे सर्वरसवर स्तन्य॥१५॥
जे जे लोकीं असती रस ती त्यांची न माधुरी थोडी ।
परि अरिच्या रक्तरसीं मज बहु त्याहूनि लागली गोडी
॥ १६ ॥
( क. अ. ४५ )

असें म्हणून झाल्यावर लागलेंच भीम म्हणतो.
किंवा कुर्यान्मृत्युना रक्षितोसि ३२ (म.क. अ.८३)

यांत भीम म्हणतो, " काय करूं रे ! तुला मृत्यूनें पाठीशीं घेतलें व तुझें रक्षण केलें" हें भाषण पंतांनीं येथून उचलून दुसऱ्या स्थानीं नेलें आहे व तें स्थान व त्याचा संदर्भ पाहिला म्हणजे त्यांचें औचित्य फारच दिसून येतें. पहा कसें तें. " पीतों हें रक्त तुझें" असें दुःशासनाला पुनः एकदां भीमानें म्हटलें व पुढें "तूं आम्हाला गौर्गौः म्हणून हंसलास. मला कालकूट पाजिलेंस; जतुगृहांत जाळलेंस; द्यूतांत राज्य हरण केलेंस; द्रौपदीचे केश धरिलेस" २० त्याच्या पापाचे पाढे भीमानें वाचले. त्यानंतर लागलेंच त्याच्या तोंडीं वरील व्यासाचें वाक्य घातलें तें असें.

काय करूं ? काळानें अभय दिलें घेतलासि तूं पदरीं
॥ २९ ॥ ( क. अ. ४५ )

येथेंच हें वाक्य पाहिजे. कारण भीम म्हणतो, " अरे ! तुझीं पापें अनेक असून अगदीं घोर प्रकारचीं आहेत. त्या प्रत्येकाबद्दल तुझा वध एकएकदां करावयास पाहिजे. तसें केलें असतें. पण माझा नाइलाज झाला. तुला मृत्यूनेंच एकदां जेव्हां पदरीं घातलें तेव्हांच तुझें मरण कायम झालें. म्हणून पुनः पुनः तुझा जीव घेणें उचित असूनही तो घेता आला नाहीं " या भाषांतरित शब्दांचें स्थलांतर करण्यांत पंतांनीं जे औचित्य दाखविलें त्याची प्रशंसा करावी तेवढी थोडीच !
पुढें अर्जुन व कर्ण यांचें संकुलयुद्ध झालें. कर्णाची मृत्युवेळ जवळ आली. ब्रह्मशापानें पृथिवी कर्णाच्या

रथाचें चक्र गिळून बसली. तेव्हां कर्ण खालीं उतरून पार्थाला विनवूं लागला.

रथचक्र उद्धरूं दे श्रुति शास्त्रज्ञा महारथा कुळजा।
साधु न हाणिति अरिला पाहति अधृतायुधव्यथा-
कुळ ज्या ॥ ६८ ॥ ( क. अ. ४८ )

"हे पार्था ! तूं एक मुहूर्तभर थांब. तों मी हें दुर्दैवामुळें महीनें गिळलेलें चक्र वर काढतों. हा युद्धधर्म असा आहे; तो तुला शूराला पाळला पाहिजे." पहिल्या चरणांत विशेषणें घातलीं आहेत तीं साभिप्राय आहेत, म्हणून येथें परिकर अलंकार साधलेला आहे. या विशेषणांचा परिणाम पार्थावर इतका झाला होता कीं, कृष्णाला वाटलें कीं हा कदाचित् कर्णाचें म्हणणें मान्य करील व आलेली संधि घालवील. म्हणून याला उत्तर परस्पर कृष्णानें दिलें. त्याचे मूळ दहाबारा सुन्दर श्लोक आहेत. कृष्णानें कर्णाच्या पातकाचें गीत "क्व ते धर्मस्तदा गतः" या घालुपदासह गाऊन दाखविलें. पंतांनीं तीच धाटणी ठेऊन यथार्थ भाषांतर समसंख्याक आर्यांत केलें आहे त्यांत नवीन पंतांचें असें कांहीं विशेष नाहीं. परंतु भाषांतर उत्तम झाल्यानें या सर्व आर्या अमर झालेल्या आहेत म्हणून उद्धृत केल्या आहेत.

कृष्ण म्हणे राधेया ! भला बरा स्मरसि आज धर्मातें
नीच व्यसनीं बुडतां निंदिति देवासि न स्वकर्मातें,॥१॥
जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन, शकुनि एकमति झालां
कैसे कपटद्यूतीं चित्तींहि न धर्म लंघितां भ्यालां ? ॥२॥
जेव्हां सभेसि नेली पांचाळी मानिलें मनीं शर्म
तेव्हां गेला होता कोठें राधासुता ! तुझा धर्म ? ॥३॥
राज्य न देसी, करवुनि वनवासाज्ञातवासही, जेव्हां।
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना ! तेव्हां ? ॥४॥
केले दग्ध जतुगृहीं त्वां पाण्डव वारणावतीं जेव्हां
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना ! तेव्हां ? ॥५॥
चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले नृपें; असें खोटें।
कर्म करवितां, कर्णा ! होता तव धर्म, तेधवां
कोठें ? ॥ ६ ॥

फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा ! सांग ?
॥ ७ ॥
'शाश्वत नरकीं पडले पति पहिले पंढतिल, वरीं अन्या'
बोलुनि असें सभेंत द्रुपदाची गांजिली तुवां कन्या॥८॥
खरदुर्वाक्यशरशतें भेदित होतासि जेधवां मर्म
तेव्हां गेला होता कोठें राधासुता ! तुझा धर्म ? ॥९॥
अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म
तेव्हां गेला होता कोठें राधासुता ! तुझा धर्म ?
॥ १० ॥
पूर्वी धर्म न रुचला, त्यजिला निपटूनि तो जसा कुचला !
आतांचि बरा सुचला ? धर्म गृहा सर्व व्हा परासु
चला ! ॥ ११ ॥ ( क. अ.४९ )

शेवटली आर्या पापांचें प्रायश्चित्त काय मिळणार आहे तें जरा निराळ्या शब्दांत सांगत आहे. कर्णपर्व पुरें करतांना बाबूजीराव नाईक यांच्या पदरीं पंत होते, त्यांची भीष्माशीं तुलना करून त्यांचा कृतज्ञपणें पंतांनीं उल्लेख केला आहे. तो भीष्मपर्वांत का केला नाहीं ?

## शल्यपर्व

कर्णनिधात झाल्यावर शल्याकडे सेनापतित्व आलें. त्याचा वध युधिष्ठिरानें केला व पुढें दुर्योधनाचा वध भीमानें केला. तें ऐकून धृतराष्ट्रानें दीर्घ विलाप केला. तो पंतांनीं संक्षिप्त रीतीनें वर्णन केला आहे. तो उत्तम आहे. म्हणून त्यांतील कांहीं आर्या मासल्याकरितां दिल्या आहेत.

राजा विदुरासि म्हणे, "हतभाग्यें म्यांचि
घात हा केला; ।
बा ! हाणिली सुरभिला जेंवि, तुझ्या तेंवि
लात हांकेला ॥ १० ॥
न शिके त्याच्या बोल न बाला;
मंदार सांवरिल काय ।
पतनेच्छुचा न, न वरिल बाला,
मंदा; रसा वरिल काय ? ॥ ११ ॥

× × ×

येथें धृतराष्ट्र मूर्च्छित होतो. सावध झाल्यावर तो पुन्हा म्हणाला

" सावध दीनहि होउनि
अंध म्हणे संजया कसें साहूं ? ।
राहूं परवश होउनि कैसा ?
कोणासिं सांग मी बाहूं ? ॥ १५ ॥
पांच न मेले,मेले त्यांहुनि बहु सुकर बाळ वीसपट ।
या चिंतेसि मदात्मा सांपडला सुकर
बाळवीस पट ॥ १६ ॥
जे अल्प अल्पबळ रिपु, झाले जय पात्र तेच
उरफाटे ।
शतसुत शोकें न तसें पाण्डवकुशलेंचि
फार उर फाटे ॥ १७ ॥
दैव महाबळ, जेणें केली वंध्यांचि नीति कणिकाची ।
सुतघातकर्मीमनुति न सोसेल मला शिवीहि
अणिकाची ॥ १८ ॥
अंधपण वरें,अरिच्या केव्हां तरि पाहतोंचि तोंडास ।
घेतोंचि काळिजाचा हतसुतशतशोकसर्प तो
डांस ॥ १९ ॥

× × ×

हुरहुर बहु खोटी रे, उर ! उर न क्षणहि काळजा !
तडक ।
असु हो ! निघाची न चुका पुत्रप्रस्थानकाळ,
जा तडक ॥ २६
हतभाग्यास मज मरण कैंचें धात्या ! अगा !
दयाळो ! हें ।
ऐसें करणें होतें तरि घडलें उर कशास बा ! लोहें॥२७
( श. अ. १ )

आर्या १५, १६ चरण १, १७ चरण २, १८ चरण २, २७ चरण २, बहुतेक मुळाला धरून आहेत बाकी सर्व आर्या पंतांच्या पदरच्या आहेत. ११ वी आर्या फार सुंदर आहे.

( भावार्थ ) "तूं हांक मारून मला उपदेश केलास. तिकडे मी लक्ष दिलें नाहीं. मीं अवहेलना केली तें सुरभीला कामधेनुला लाथ मारण्यासारखें केलें. बा ! विदुरा ! हा माझा मींच घात केला."

" जो पुरुष ( मं शिके ) शिकत नाहीं, त्याच्या बाला ( बापाला ) बोल ( दोष ) मं ( नाहीं ). मंदार ( कल्पवृक्ष ) पतनेच्छुचा ( पडण्याची इच्छा करणाऱ्याचा काय ( देह ) सांवरील ( सांवरणारे ) न ( नाहीं ). त्याला तो पडूनच देईल. कारण इच्छा पुरवण्याचें कल्पवृक्षाचें कामच आहे. कोणी पतनाची इच्छा करील, त्याला तो पतनच देणार; बाला ( उपवर मुलगी ) मंदा (मूर्खाला ) न वरील ( वरणार नाहीं ). तशी रसा (पृथ्वीही ) मूर्खाला ( दुर्योधनाला ) वरणार नाहीं. न शिकणारे व पतनेच्छु इ. अप्रस्तुत पुरुषांचा उल्लेख करून प्रस्तुत जो दुर्योधन त्याचा बोध येथें होत आहे; म्हणून येथें अप्रस्तुत-प्रशंसा साधली आहे. आर्या सोळावी तशीच सरस आहे. "पांच (पाण्डव न मेले,पण त्यांच्याहून वीसपट ( शंभर ) बाळ ( माझे सुत, ) सुकर ( सु म्हणजे चांगल्या हस्तांचे म्हणजे युद्धकुशल ) असे असून मेले. त्यामुळें पट ( कापड ) जसें सुकर ( अगदीं सुलभपणें ) वाळवीला खाण्यास सांपडतो तसा माझा आत्मा चिंतारूप वाळवीला खाण्यास सांपडला." ही उपमा फार सुंदर आहे.

मुळांत पंत जो फरक करीत तो का करीत, कसा करीत तें आतांपर्यंतच्या विवेचनावरून कळून आलेंच असेल. या फरकांचें जितकें सूक्ष्म निरीक्षण करावें तितकें थोडेंच होईल. उदाहरणार्थ वरील धृतराष्ट्रविलाप घ्या. त्यांत धृतराष्ट्र म्हणतो " अंधपण बरें.नाहीं तर चुकून तरी शत्रूचें तोंड पाहिलें असतें" हे शब्द पंतांच्या पदरचे आहेत. ते घालून धृतराष्ट्राच्या पदरांत पंत फार दुष्टपणा बांधीत आहेत असें वाटतें. पण त्यांच्या अंतरस्थ स्वभावाचे द्योतक असे शब्द याच विलापांत आहेत व ते व्यासकृत वर्णनांतच आहेत.

अहो बत महद्दुःखं यदहं पाण्डवान् रणे ।
क्षेमिणश्चाव्ययांश्चैव त्वत्तः सूत शृणोमि वै ॥ ३ ॥
( म. श. अ. २ )

यांत कौरव मेल्याचें दुःख धृतराष्ट्राला होत नसून पाण्डव जिवन्त आहेत, अव्यय ( कुशल ) आहेत याचेंच होत आहे. ( पहा आर्या १६ व १७ ) या आर्यांत आरंभिलेलें धृतराष्ट्राच्या याच दुष्ट स्वभावाचें वर्णन १९ वी आर्या पुरें करीत आहे.

कुशल छबी काढणारा कारागीर कांचेवर एखाद्याचें छायाचित्र घेऊन त्याचें पक्कें चित्र कागदावर घेण्यापूर्वी छायाचित्रांतील व्यंगें कुंचलीच्या एका हळू केलेल्या स्पर्शानें सुधारून घेतो, तसाही प्रकार पंतांनीं अनेक ठिकाणीं केला आहे. त्यांपैकीं एक उदाहरण पुढें आहे.

आशा बलवती राजन् पुत्राणां तेऽभवत्तदा ।
हते द्रोणेच भीष्मेच सूतपुत्रेच पातिते ॥ १६ ॥
( म. श. अ. ८ )

( भावार्थ ) भीष्मादि वीर खपल्यावर तुझ्या पुत्राची जयाशा फार बलवती होती असें मुळांत आहे; पण आशा बाळगण्याला कारण नसतांनां ती बाळगणें किंबहुना न बाळगण्याला कारण असतांनां ती बाळगणें म्हणजे शुद्ध वेडेपणा आहे एवढेंच नव्हे, तर मुळींच आशा बाळगणें हाच वेडेपणा आहे,असा सामान्य सिद्धांत घालून पंतांनी निराळेंच वळण मूळ अर्थाला दिलें आहे. पंत म्हणतात.

आशा वेडी गया ! जरि भीष्म द्रोण कर्णही खपला ।
तरि शल्याला कुरुपति जय साधिल म्हणुनि बहु रणीं जपला ॥ ३ ॥ ( श. अ. २ )

शल्य हा कमी पराक्रमी नव्हता. तो रणांत उभा राहला, तेव्हां त्याच्यापुढें कोणी उभा राहूं शकला नाहीं, एवढेंच मुळांत आहे. तेथें पंत म्हणतात

मध्यान्हीं भानुकडे तैसें शल्याकडे पहावेना ।
रवितेज जेविं घूका तैसें तत्तेज तें सहावेना ॥ ४४ ॥

शल्याच्या शरविसर्जन पद्धतीचें वर्णन पंतांनीं वरप्रमाणेंच सरस केलें आहे तें.

नरवर गरधरखरतरशर करकर दांत खाउनी मोडी ।
फोडी कवच उरःस्थळ; वाटे तो वात त्या द्रुमा तोडी ॥ ८४ ॥

र या व्यंजनाच्या पुनरावृत्तीनें पहिल्या ओळींत वृत्यनुप्रास चांगला साधला आहे. करकर या शब्दाचा अर्थ त्याच्या उच्चारानेंच सूचित झाला आहे. असल्या शब्दांस वीररसात्मक कवितेंत विशेष मान आहे.

शल्यवध झाल्यावर दुर्योधन ऱ्हदामध्यें लपून बसला. हें पर्व तुलसीदल मानून कवीनें इतर पर्वांप्रमाणेंच रामचरणीं अर्पण केलें आहे.

## शल्यपर्वान्तर्गत गदापर्व

ऱ्हदांत जाऊन लपलेल्या दुर्योधनाला धर्म म्हणाला, " तूं बाहेर ये. वाटेल तें शस्त्र हातात घे. वाटेल त्या पाण्डवाशी युद्ध कर व त्याला जिंकलेंस, तर तूं सर्व राज्य घे. " हें धर्माचें वाक्य ऐकून कृष्णाला राग आला. तेव्हां कृष्ण म्हणाला, " धर्मा ! हें काय केलेंस ? गदायुद्धांत दुर्योधनाला न्यायानें जिंकणारा असा वीर नाहीं. मोठ्या पराक्रमानें भीष्मासारख्यांचा पाडाव करून जे यश मिळविलेंत, जो विजय मिळविलात, तें सर्व यश, तो सर्व विजय, हीं दोन्हीं तूं पुन्हां ' पाण्डवातील एकाला गदायुद्धांत जिंकलेंस तर तूं सर्व राज्य घे ' असा पण लावून, संशयात टाकलीस ! ही केवढी अबुद्धि अथवा बुद्धिहीनता ! " कृष्ण पुढें खेदानें म्हणाला,

नूनं न राज्यभागेषा पाण्डोः कुन्त्याश्च संततिः ॥ १६ ॥
अत्यन्तवनवासाय सृष्टा भैक्ष्याय वा पुनः ॥१७॥
( म. श. अ.३३ )

हा श्लोक बहारीचा आहे. तो अमर झाला आहे.

( भावार्थ ) ही पाण्डु व कुन्ती यांची संतति राज्य भोगावयाला जन्मास आलेली नाहीं. हिचा जन्म वनवास भोगण्याकरितां, भिक्षा मागत हिंडण्याकरतांच आहे ! तो तसा नसता, तर तुम्हीं अगदीं कळतें आहे, कळतें आहे असें दाखवीत दाखवीत,

ऐन प्रसंगीं शेवटीं आतां हित हातास लागणार तोंच तें घालविण्याची व्यवस्था कशी करून बसले असतेत ! ! तुम्हीं असे मूढ कसे कुणाला ठाऊक ! ! !

कृष्णाप्रमाणें व्यवहारांत पुष्कळ कार्यकर्त्या पुरुषांना असा अनुभव येतो.

असो. वरील व्यासकृत श्लोकाचें पंतकृत भाषांतरही बहारीचें असून अमर झालें आहे. तें असें:

बहुधा हे पाण्डुपृथासंतति अधिराज्यभागिनी नोहे !
वनवासभैक्ष्ययोग्या; तरिच कळत कळत
हितपथीं मोहे ॥ ९ ॥
( ग. अ. १ )

धर्माची अट मान्य करून दुर्योधन गदा घेऊन युद्धास सज्ज झाला. दुर्योधनाशीं गदायुद्ध करण्यास भीमाची योजना झाली. दोघांचें प्रथम वाग्युद्ध झालें. त्यांत भीमानें प्रथम दुर्योधनाच्या दुष्कृत्यांचे पाडे वाचले. त्याचा उपहास करतांना उलट दुर्योधन म्हणालाः

तुज लाविलें स्वतेजें स्यांच्र कढीभात वरण घाटाया ।
वांटाया प्राज्य पुरण, पापड, पोळ्या प्रभूत
लाटाया ! ॥ १६ ॥
( श. अ. २ )

ही आर्या पंतांचीं पदरची असून अमर झाली आहे. पंतांच्या आर्यांत प्रो. राजारामशास्त्री भागवत यांच्या शब्दांत म्हणावयाचें म्हणजे अक्षरांची वजाबाकी करणारी कूट रचना कधीं कधीं केलेली आढळते. त्यांतील एक प्रसिद्ध रचना ( सभा. प. अध्यायं सहा आर्या तेवीस येथें ) आली आहे. तशीच पुढील एक आहे.

शूर सकार शकारीं व्हाया दे द्विपदुरांत फटकारा ।
भट भीमेतर असता तरि तेव्हां रक्षिता नच
टकारा ! ॥ १८ ॥
श. अ. ३ )

गदायुद्धाला आरंभ झाला, तेव्हा दुर्योधनानें पहिला प्रहार भीमावर केला. तो इतका जोराचा होता, कीं त्याबरोबर दुर्योधनाचें वर्चस्व स्थापित व्हावयाला पाहिजे होतें व त्यांच्या प्रतिपक्ष्याचें निष्प्रभत्व सिद्ध व्हायला पाहिजे होतें. पण त्याचा प्रतिपक्षी भीमच पडला, म्हणून या दोन्ही गोष्टी अशक्य झाल्या. शूर या शब्दामध्यें जो शकार आहे, तो काढून तेथें सकार स्थापन करण्याकरतां म्हणजे शूर या शब्दाचें रूपान्तर सूर ( म्हणजे सूर्य ) या शब्दांत करण्याकरितां दुर्योधनानें द्विपदुरांत ( शत्रूच्या उरांत ) फटकारा मारला. तो शत्रु जर भीम नसता, दुसरा कोणी असता, तर भट या शब्दात जो टकार आहे तो जाऊं देता व आपण मग नुसता भ म्हणजे नक्षत्र होऊन दुर्योधनरूपी सूर्यापुढें फिका पडला असता. पण भीमानें तसा प्रकार होऊं दिला नाहीं. हें कूट पंतांचें स्वतंत्र आहे. व क्लिष्टही कमी नाहीं.

या युद्धांत कृष्णानें अर्जुनाकडून सुचविल्याप्रमाणें नाभीच्या खालीं भीमानें दुर्योधनाच्या शरीरावर प्रहार केल्यामुळें त्याच्या मांडीचा चूर झाला.

प्राण जाण्यापूर्वी दुर्योधन कृष्णाला म्हणाला, "तूं कपटानें आमचा वध करविलास." कृष्णानें उत्तर दिलें, "तुमच्या नाशाची कारणें तुम्हींच दुरितें आहेत." याला दुर्योधनानें जें उत्तर दिलें तें वाचण्यासारखें आहे.

अधीतं विधिवत् दत्तं भूःप्रशास्ता ससागरा ।
मूर्ध्निस्थितममित्राणां कोनुस्वन्ततरो मया ॥५०॥
यदिष्टं क्षत्रबन्धूनां स्वधर्ममनुपश्यताम् ।
तदिदं निधनं प्राप्तं कोनु स्वन्ततरो मया ॥५१॥
देवार्हा मानुषा भोगाः प्राप्ता असुलभा नृपैः ।
ऐश्वर्यं चोत्तमं प्राप्तं कोनु स्वन्ततरो मया ॥५२॥
ससुहृद् सानुगश्चैव स्वर्गं गन्ताहमच्युत ।
यूयं निहतसंकल्पाः शोचन्तो वर्तयिष्यथ ॥५३॥
न मे विषादोभीमेन पादेन शिर आहतम् ।
काका वा कंकगृध्रा वा निधास्यन्ति पदं
क्षणात् ॥ ५४ ॥ (म. श. अ. ६१)

दुर्योधन म्हणालाः "एवढे पराक्रम मी केले; मी वेदपठण केलें. विधिवत् दान दिले. सागरान्त महीचें राज्य केलें ! शत्रूंच्या डोयीवर पाय दिला. याहून स्वन्ततर कोण आहे ? स्वन्त म्हणजे चांगला

आहे अन्त ज्याचा असा प्राणी जो मी, त्या माझ्याहून स्वन्ततर म्हणजे अधिक स्वन्त ( चांगल्या अन्ताचा ) असा कोण आहे ? मींच त्रैलोक्यमोहन असा भारत एक आहें. पहा, स्वधर्म पाळणाऱ्या क्षत्रियांना इष्ट असें मरण ज्या मला युद्धांत प्राप्त झालें आहे, त्याहून स्वन्ततर कोण आहे ? आणखी पाहा ! जे भोग भोगण्यास एक देवच योग्य आहेत, ते व मनुष्यांनीं भोगण्याचे जे भोग आहेत व जे राजांना प्राप्त होण्यास जड जातात ते सर्व ज्या मीं भोगले आहेत, व उत्तम ऐश्वर्य भोगिलें आहे त्याहून स्वन्ततर कोण आहे ? शिवाय सांगतों ! मी माझ्या मित्रांसह, अनुगांसह, कृष्णा ! स्वर्गाची प्राप्ति करून घेतली आहे आणि तुम्हीं नष्टमनोरथ असे येथें शोक करीतच रहाणार ! भीमानें माझ्या शिरावर लत्ता प्रहार केला याबद्दल मला मुळींच खेद होत नाहीं ! आतां क्षणभरानें काकगृध्रादि पक्षी माझ्या शिरावर पाय देऊन बसणारच आहेत !''

यांतील स्वन्ततर हा शब्द फार खुबीदार आहे, तो पंतांना तसाच ठेवावासा वाटला. त्यांनीं तो तसाच राखून आणखी स्पष्ट करून सांगीतला आहे. तो असा

राजा म्हणे विसरलें मी, सांगा करून पाठ वेदा न।
पात्रीं न दिलें ऐसें एकहि मजला न आठवे
दान ॥ ३५ ॥
अखिलाहि भोगिली स्या पृथ्वी परमस्तकीं दिला पाय ।
स्वतंतर कवण मजहुनि ! आतां कर्तव्य राहिलें
काय ? ॥ ३६ ॥
( ग. अ. ६. )

मूळ व भाषांतर फार सरस आहे.''कोनु स्वतंतरो मया '' (म्हणजे आतां कर्तव्य राहिलें काय) या पालुपदाच्या आर्या आणखी आहेत,त्या मुळावरून वाचाव्यात. हे श्लोक व या आर्या फार बहारीच्या आहेत. दुर्योधन दुष्ट होता;पण त्याचें हे बाणेदार उत्तर व त्यात भरलेला उद्दामपणाच त्याच्याविषयी श्रोत्यांच्या मनांत सहानुभूति उत्पन्न करीत आहेत. यांत शांत रसाचें वीररसाशीं मिश्रण होऊन दुर्योधनाचें भाषण इतकें सरस उतरलें आहे कीं, खुद्द व्यासांनांही दुर्योधनाचें कौतुक करावेंसें वाटलें. व्यास म्हणतातः

अस्य वाक्यस्य निधने कुरुराजस्य धीमतः
अपतत् सुमहद् वर्षं पुष्पाणां पुण्यगन्धिनाम् ॥ ५५ ॥

× × ×

सिद्धाश्च मुमुचुर्वाचः साधुसाध्विति पार्थिव !

× × ×

अत्यद्भुतानि ते दृष्ट्वा वासुदेवपुरो गमाः
दुर्योधनस्य पूजां तु दृष्ट्वा व्रीडामुपागमन् ॥५८॥

( भावार्थ ) '' हें बुद्धिमान कुरुराजाचें मरणसमयींचें भाषण संपतांच आकाशांत पवित्र पुष्पवृष्टि झाली ! सिद्ध पुरुषांच्या तोंडांतून '' साधु साधु '' असे प्रशंसापर उद्गार आपोआप निघाले × × × व दुर्योधनाची अशी पूजा झालेली पाहून श्रीकृष्णादिकांना लाज वाटली !'' शाबास दुर्योधना ! शाबास ! उरुभंग करण्याची भीमाची प्रतिज्ञा पुरी झाली; पण धर्मादि राजांना हा अधर्म झाला असें वाटलें. त्यांची समजूत घालतांना कृष्ण म्हणाला, '' भीष्मादिवीर सरळपणें मृत झाले नसते. '' या वेळीं या वीराच्या बरोबर कर्णाचा उल्लेख करतांना पंतांनीं आपल्या सरस वाणींत जो कर्णाचा गौरव केला आहे, त्याविषयींची आर्या फार सुन्दर आहे.

तिमरा कर्ण श्रीमान् , ज्याचें उघडें कवाड,
घर हात।
आले यत्सदनीं, सुश्वशुरगृहींसेच, बाडव रहात
॥ ५१ ॥
( ग. अ. ६ )

औदार्यानें शोभणाऱ्या कर्णाच्या श्रीमन्तीचें वर्णन अधिक चांगलें थोडक्यांत होणें नाहीं.

नेहमींप्रमाणे रामपदीं अर्पण केलेलें हें पर्व पंतांसही सरस वाटलें असें दिसतें. पंत म्हणतात.

हें पर्वपुष्प वाहें श्रीरामपदीं मयूर तो भावें
शोभावें साधुशिरीं यासि मधुरसिक वृंद
लोभावें ॥ ४० ॥ ( ग. प्र. १० )

## सौप्तिक पर्व

हें पर्व अगदीं लहान आहे. पाण्डवपक्षीय सुप्त असतां त्यांच्यावर अश्वत्थाम्यानें छापा घातला म्हणून या पर्वास सौप्तिक म्हणजे सुप्तांविषयींचें पर्व असें म्हणतात. दुर्योधन गदायुद्धांत पतन पावल्यावर पाण्डवांनां भिऊन शेष कौरव वीर, खोल अरण्यांत पळाले. रात्र अंधारी होती, म्हणून एका न्यग्रोध वृक्षाच्या तळीं पडले. थकून गेल्यामुळें कृपादी सर्व निद्रावश झाले; पण अश्वत्थाम्याला क्रोधानें झोंप येईना. त्या वृक्षाच्या शाखांचा आश्रय सहस्रशः वायसांनीं घेतला होता, तेव्हां त्यांचा शत्रु जो घुबड त्यानें त्या वायसांचा वध ते निद्रित असतांनां केला. " अशाच प्रकारें पाण्डव निद्रित असतां तूं त्यांचा वध कर " असा उपदेश मला या घुबडानें केला असें अश्वत्थाम्याला वाटून त्यानें पाण्डवांचा वध करण्याचा निश्चय केला. कृतवर्मादिकांस जागें करून आपला बेत त्यानें त्यांस कळविला. असें करणें त्यांस अधर्मच वाटला. तिकडे लक्ष न देतां अश्वत्थामा पाण्डवांच्या शिबिराकडे जावयास निघाला. पथांत महाभूत दिसलें. त्याला प्रसन्न करून घेऊन त्याजवळून अश्वत्थाम्यानें एक खड्ग मिळविलें. त्यानें या छाप्यांत पाण्डव, कृष्ण व सात्यकि यांशिवाय सर्वांस मारिलें. हें पराक्रमाचें वृत्त अश्वत्थाम्यानें मरणोन्मुख दुर्योधनाला सांगितलें. तें ऐकून प्राण सोडतांना दुर्योधन म्हणाला.

हें प्रिय गुरुसुत कथिन, मज देऊनि निरोप
पाठवा नाकीं
घडलों असेन अप्रिय मागें तें किमपि आठवाना
कीं ! ॥ ४७ ॥
त्यजिलें शरीर, आज्ञा द्या, तुमची आमुची
पुन्हा भेट
स्वर्गीं घडेलचि, गुरो, शोकसमुद्रांत धैर्य हें बेट
( सौ. अ. २ ) ॥ ४८ ॥

हा निरोप दुष्टाचा, दुष्ट हेतु साध्य झाल्याचें वृत्त नुसतें ऐकून का घेतलेला असेना. तो भावनापूर्ण आहे. हा मुळाप्रमाणें आहे. धैर्याला शोकसमुद्रांतील बेटाची दिलेली उपमा सुन्दर असून पंतांची स्वतंत्र आहे. ती यमकाकरितां घातलेली आहे हें उघड आहे.

## ऐषीक पर्व

इषीका म्हणजे दर्भाची लहान काडी. ती अभिमंत्रून अश्वत्थाम्यानें " अपाण्डवाय " ( पाण्डवांचा संपूर्ण नाश होवो ) असें म्हणून ब्रह्मास्त्र सोडिलें. या विषयाचें हें पर्व असल्यामुळें याला ऐषिक पर्व असें नांव दिलेलें आहे.

अश्वत्थाम्याच्या छाप्याचें अघोर वर्तमान धर्माला कळल्यावर या महायुद्धाच्या फळाचें वर्णन त्यानें थोडक्यांत चांगलें केलें आहे. तें पंतांनीं गाळलें आहे म्हणून त्यांतील एक चरण दिला आहे. धर्म म्हणाला

जयोऽयमजयाकारो जयस्तस्मात्पराजयः ॥ १२ ॥
( ऐ. प. अ. २ )

" अरे ! पराजयाला जयाचें स्वरूप व जयाला पराजयाचें स्वरूप आलें आहे. "

द्रौपदीला हें अश्वत्थाम्याचें अनन्वित कृत्य कळल्यावर तिचें धर्माशीं भाषण झालें. त्याविषयीं पंतांनीं तीन आर्या घातल्या आहेत. दोन मुळाला धरून आहेत व एक स्वतंत्र आहे. ती अशी

कृष्णा म्हणे न झालें ऐसें वैर्‍या कुमारा अन्य
धन्य प्रभुधर्मा ! तूं, अन्य नयनिपुण असा न
राजन्य १७ ( ऐ. अ. १ )

यांत स्त्रीस्वभावानुरूप द्रौपदीनें धर्माला मारलेला टोमणा यथार्थ आहे. स्त्रीस्वभावाचें वर्णन करतांना पंत त्याच्याशीं अगदीं समरस होतात. त्याचें वरील एक उदाहरण आहे. अश्वत्थाम्याचा वध तुमच्या हातून झाला नाहीं, तर मी प्रायोपवेश करीन असें ती धर्माला म्हणाली. धर्म म्हणाला, "त्याचा वध झाल्याचें तुला कसें समजेल तो दूर पळाला आहे. " द्रौपदी म्हणाली, " त्याच्या शिरीं मणि आहे तो मला आणून द्या " धर्मानें

कांहीं होईल असें तिला वाटलें नाहीं. म्हणून मागील प्रसंगाची आठवण देऊन भीमाला तिनें चेव आणला. त्याचें वर्णन पंत आपल्या स्वतंत्र शब्दांत करतात.

ती भीमा श्वासें दे दहनाला जेंवि तेज नव धसनी
स्त्रीप्रिय जे धरितील न कां विप्राचाहि ते जन वध
मनीं ? ॥ ३२ ॥
( ऐ. अ. १ )

पहिल्या चरणांतील उपमा फार सुन्दर आहे. दुसऱ्या चरणांत प्रश्नालंकार योजून भीमाचें स्त्रीदाक्षिण्य उत्तम रीतीनें वर्णन केलें आहे. या दुसऱ्या चरणावरून एवढें दिसतें कीं, भीमाच्या स्वभावाची खुरी परीक्षा पंतांनां झाली होती. स्त्रीची मनीषा भीमानेंच पुरवावी. कुबेराच्या उद्यानांतील कमळ भीमानेंच आणलें. स्त्रीचा अपमान केला म्हणून कीचकाशीं सामना करण्यांत भीमच आखाड्यांत उतरला. दुर्योधनाची मांडी यास करणाकरतां भीमानेंच गदाप्रहारानें चुरून टाकिली. इत्यादि प्रकारें आपल्या प्रिय स्त्रीचें प्रिय करणारा भीम हा पाण्डवांत एकच होता. ही भीमाची खरी परीक्षा पंतांनीं केली होती, म्हणून स्त्रीप्रिय हे शब्द वरील आर्येत त्यांनीं योजिले आहेत, हें उघड आहे. पुढें तो मणि भीमानें आपल्या रमणीला आणून दिला हें सांगावयास नकोच.

हें पर्व नित्याप्रमाणें श्रीरामपदींच अर्पण केलेलें आहे.

## स्त्रीपर्व

हें पर्व फार शोकमय आहे. दुर्योधनवधवृत्त संजयानें धृतराष्ट्राला जेव्हां सांगितलें, तेव्हां तो शोक करूं लागला. विदुरानें त्याला उपदेश केला तो फार प्रौढ आहे. त्यांतील कांहीं वचनें सुभाषितें होऊन बसलीं आहेत. त्यांतील थोडीं मासल्याकरतां दिलीं आहेत.

सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः ।
संयोगा विप्रयोगान्ता मरणान्तं च जीवितम् ॥३॥
× ×

अभावादीनि भूतानि भावमध्यानि भारत ।
अभावनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ ६ ॥
× × ×

भैषज्यमेतद्दुःखस्य यदेतन्नानु चिन्तयेत् ॥२७॥
+ × +

यस्यां यस्यामवस्थायां यत्करोति शुभाशुभम् ।
तस्यां तस्यामवस्थायां तत्फलं समुपाश्नुते ॥३३॥
येन येन शरीरेण यद्यत् कर्म करोति यः ।
तेन तेन शरीरेण तत्फलं समुपाश्नुते ॥३४॥
( म. स्त्री. अ. २ )

(भावार्थ) वस्तूंच्या संचयाचा शेवट खचित त्यांच्या क्षयांत आहे; चढण्याचा पडण्यांत आहे; संयोगाचा वियोगांत आहे व जन्माचा मरणांत आहे.

भाव हा नामरूपात्मक आहे. त्याच्या आधीं अभाव असतो व शेवटीं पुन्हां निधन ( अभाव ) असतो. आदौ अन्तीं ज्याचा अभाव असतो, तें भावरूप मध्य सुद्धां अभावरूपच समजावें.

दुःखाचें चिन्तन न करणें हें त्यावर औषध आहे. ज्या ज्या यौवनादिरूप अवस्थेंत शुभ किंवा अशुभ कर्म करावें त्या त्या अवस्थेंत त्याचें फल भोगावें. ज्या ज्या शरीरांत जें जें कर्म करावें, तें तें त्या त्या शरीरांत भोगावें.

या सर्वश्लोकांचें सार पंतांनीं आपल्या शब्दांत घातलें आहे तें.

कालोपद्रुत लोक न पावेचि त्राण हा. निजायाचें
आम्हांतुम्हां स्मशानी, पावोनि प्राणहानि जायाचें
॥५॥ ( स्त्री. अ. १)

व्यासांनीं धृतराष्ट्रास दर्शन दिलें व उपदेश केला त्यांत पुढीलप्रमाणें सुन्दर वाक्यें आहेत.

यादृशोजायते राजा तादृशोऽस्य जनोभवेत्॥१२॥
(म. स्त्री. अ ८ )

भावार्थ ( यथा राजा तथा प्रजा ). येथें पंतांनीं मुळास संक्षेप दिला आहे, व्यास अदृश्य झाले व संजयानें धृतराष्ट्राला प्रेतकार्यें करावयास सुचविलें.

तेव्हां धृतराष्ट्राला काय वाटलें तें पंतांनीं आपल्या शब्दांत फारच हृदयद्रावक रीतीनें वर्णन केलें आहे.

अंध म्हणे बा ! ज्यांहीं पाजावें त्यांसि सलिल पाजीव।
॥ ७ ॥ (स्त्री. प. अ. १)

ज्या धृतराष्ट्राची क्रिया ज्या पुत्रपौत्रादिकांनीं तिलांजली देऊन वास्तविक करावी त्या पुत्रपौत्रादिकांची क्रिया त्यांस तिलांजलि देऊन त्याच धृतराष्ट्राला करावी लागली हा उलटा प्रसंग धृतराष्ट्रावर जसा आला, तसा प्रसंग जेव्हां संसारी लोकांवर येतो, तेव्हां त्यांच्या तोंडून असेंच वाक्य येतें.

मग राजा शोक करणाऱ्या स्त्रीवृन्दासह गंगातीरीं गेला. तेथें शेष उरलेले कृपादि कौरव भेटले व त्यांनीं गान्धारीप्रभृति कौरवस्त्रियांस गदा व सौप्तिक या पर्वांतील सर्व वृत्त सांगितलें. ते म्हणाले, युद्धांत पतन पावल्यानें त्यांस ( वीरांस ) उत्तम लोक प्राप्त झाला आहे. ते स्वर्गांत उज्ज्वल देह धारण करून अमरांप्रमाणें संचरत आहेत. एवढें मुळांत आहे. त्याविषयीं पंत म्हणतात.

युद्धेंचि देव झाले न करुनियां अश्वमेध सुत नाकीं
दुःखावरि सुख शोभा ! मग मुक्ता, प्रथम वेध,
सुत नाकीं ॥ १९ ॥

( भावार्थ ) दुःखाचा अनुभव घेतल्यावर प्राप्त झालेलें सुख शोभतें. याला दृष्टान्त प्रथम मुलीचें नाक टोंचतात; तेव्हांचें वेज बुजूं नये म्हणून आंत सूत ओंवतात. हे दोन्हीं दुःखाचे प्रकार भोगल्यावर मागून नथ घालावयाचें सुख जें मिळतें, तें चांगलें शोभतें असा अनुभव रोज येत असतो; म्हणून हा सुन्दर दृष्टान्त वाचकांना पटून फार आनंद होतो. सुन्दर अर्थ साधून देणाऱ्या या आर्येंत अंत्याक्षरी यमक आहे तें सिवायच.

कृपादि वीर पाण्डवांच्या भयानें निघून गेले. "मग पाण्डव धृतराष्ट्राच्या अनुज्ञेनें गान्धारीस भेटावयास गेले" एवढें मुळांत आहे त्याविषयीं पंत म्हणतात

आज्ञापिलें पित्यानें, मग ते पाण्डव सकृष्ण
चुलतीतें ।
गेले भेटाया, सुतशोकज्वलनें सुतप्त चुल, तीतें"
॥ ५७ ॥ (स्त्री. प. अ. २)

सुतशोकाग्नीनें तप्त झालेल्या चुलतीला चुलीची उपमा दिलेली फार सुन्दर आहे व ती यमकाकरितां घातलेली आहे हें उघड आहे. कुन्ती शस्त्रांनीं क्षत झालेल्या आपल्या एकेका मुलाला भेटली असें मुळांत आहे. अशा प्रसंगीं वीर मातेला काय वाटतें तें स्वतःच्या कल्पनेनें पंतांनीं उत्तम रीतीनें वर्णन केलें आहे.

सहदेवातें कुंती पोटाशीं धरुनियां म्हणे हाय !
गाय सुकविजन यश, परि वीरांची परम दुःखिता
माय ॥ ६२ ॥
( स्त्री. प. अ. ३ )

"वीर युद्धांगणीं पतन पावले, म्हणून कविजन त्यांचें यश गातील, त्यांत त्यांनां सुख होतें. पण ह्या वीरांची माता मात्र फार दुःखित होते रे सहदेवा ! " असें कुंती त्याला पोटाशीं धरून म्हणाली.

द्रौपदीची व गान्धारीची भेट झाली, तेव्हां तिचें सांत्वन करण्यास गान्धारी म्हणते:

ती देवी तीस म्हणे, मागों बहु काय तुज
कुलीनेला ! ।
काळें पदार्थ दिधला होता तेणेंचि तो मुली !
नेला ! ॥ ६९ ॥

शाहून तत्त्वज्ञान त्यांस समजत नाहीं, अशा लोकांच्या तोंडून अशा प्रसंगीं निघणारी उक्ति गान्धारीच्या मुखीं पंतांनीं या आर्येंत घातली आहे. असलीच आणखी एक आर्या पाहा.

अर्थ अपरिहार्यचि जो झाला गेला; वृथाचि
हा शोक ।
शोक सफळ जरि असता, मेल्याला उठविते
न कां लोक ! ॥ ७१ ॥

या आर्येतील पहिला चरण मूळाप्रमाणें आहे. पण दुसरा नवीन आहे. शोक करून जर फळ मिळते, तर लोक शोक करीत सारखे राहते व मृताला उठविते. शोकाची व्यर्थता याहून सुन्दर रीतीनें सांगतां येणार नाहीं.

गान्धारीला व्यासांनीं दिव्य दृष्टि दिली, तिच्यामुळें गांधारी समरनिरीक्षण करून ती कृष्णाशीं बोलत आहे. अशी या स्त्रीविलाप पर्वाची रचना आहे. या प्रसंगाचीं व्यासकृत व पंतकृत अशीं दोन्हीं वर्णनें फार सरस आहेत. एकच शोकरस सर्वत्र भरलेला आहे. पण तो भिन्न भिन्न शब्दांनीं व कल्पनांनीं अलंकृत आहे. म्हणून व्यासांची व पंतांची कृति अशा दोन्हीं बरोबर वाचल्या पाहिजेत. गान्धारीच्या शोकानें एकदमच पेट घेतला आहे.

तें सर्व स्त्रीचेष्टित गांधारी दिव्य दृष्टिनें पाहे ।
कृष्णासि म्हणे, कोणी स्त्री मजसम दुःखिता जगीं
आहे ? ॥ ६ ॥
( स्त्री. प. अ. ४ )
कुडकिति शवें पहा पतिसुत वळखायासि नायका
लागीं ।
या कमल-वन-विहाग शिरल्या हंसीच्च काय
कामार्गी ? ॥ ७ ॥
+ + + +
शोधुनि जोडिति हातें पतिपुत्रशिरादि अवयव
धडा जे ।
ताडण भरवपूचा मक्षिकसीं तेंवि न सुलभ डाजे
॥ ११ ॥
अपश्यत्सन तिष्ठन्ती सर्वं दिव्येन चक्षुषा ॥ २ ॥
पश्यैताः पुण्डरीकाक्ष स्नुषा मे निहतेश्वराः ॥१८॥
रक्तोत्पलवनानीव विभान्ति रुचिराणिच ।
मुखानि परमस्त्रीणां परिशुष्काणि केशव ४३ ॥
शिरः कायेन संधाय प्रेक्षमाणा विचेतसः
अपश्यन्त्यो परं तत्र नेदमस्येति दुःखिताः॥५२॥
( स्त्री. प. अ. १६ )

७ व ११ या आर्यांत ४३ व ५२ या श्लोकांचा मजकूर आला आहे. "हे केशव ! पाहा ! राजघराण्यांतील स्त्रियांचीं रुचिर मुखें सुकून गेलेल्या रक्तकमलांचीं वनेंच आहेत असा भास होत आहे ! हुडकून आणलेलें शिर धडाला लावून पाहतां तें त्याचें नव्हे व दुसरें कोठें मिळत नाहीं म्हणून त्या भांबावलेल्या राजस्त्रिया दुःखित होत आहेत !" हें राजस्त्रियांच्या दुःखांत निराशा मिश्रित करणारें व्यासकृत वर्णन वाचून वाचक फार कळवळतात.

राजस्त्रियांच्या दुःखाचें वर्णन करतांना त्यांच्या रुचिर मुखांकडे व्यासांचें लक्ष वळल्यामुळें तीं मुखें त्यांना कमलवनें भासलीं. त्याचें वर्णन करूनही व्यासांना त्यांच्या दुःखाचा विसर पडला नाहीं. उलट तीं वनें शुष्क होतीं असें म्हणून ठेवल्यानें व्यासांचें वर्णन फार उचित प्रकारानें केलेलें आहे असेंच ठरतें. पण मोरोपंतांनीं पाहा काय केलें आहे तें ! "कमलवन" या व्यासांच्या शब्दावरून त्यांनीं या वर्णनांत नवीन पण सदृश कल्पना प्रविष्ट केली ती अशी. पंत रणांगणाला मोठें सर समजून वीरांची शिरें त्यांत रुजलेलीं कमलें समजले व सहर्जांच वरची पायरी चढतांना राजस्त्रियांस ते हंसी समजले व त्यांच्या सौंदर्यावरच पंतांची दृष्टि बद्ध होऊन राजस्त्रियांच्या दुःखाचा त्यांना विसर पडला असें वाचकाला वाटूं लागतें. व्यासांनीं कमळवनाविषयीं तीं शुष्क होतीं असें जसें म्हणून ठेवलें, तसें कांहीं पंत हंसींविषयीं म्हणून ठेवते, म्हणजे "त्या हंसी रणरूपी कासारीं आऊन पोहतात, तीं त्यांत शिररूपी कमळें कामुकी मजांनीं तुडवलेलीं दिसलीं, तर राजस्त्रियांच्या

नैराश्यमिश्रित दुःखाचें वर्णन व्यासांप्रमाणें सरस वठले असतें. परंतु राजस्त्रियांचा या हंसींचा विहार अनुचित दिसतो, एवढेंच. हा प्रसंग यमकाच्या नादीं लागून ओढवलेला दिसतो. या अकराव्या आर्येचा दुसरा चरण पंतांचा स्वतंत्र असून मार्मिक आहे.

आतापर्यंत शोकाचा विषय गान्धारीच्या सुना होत्या. आतां गान्धारीनें दुर्योधनाचें शव पाहिलें. विषयांत अंतर पडलें. पण शोकांत अंतर पडलें नाहीं. गान्धारी पुढें शोक करीत राहिली.

कृष्णा पहा ! सुतेजा जोडा होता जगांत हा रविला।
हार विलासवतीनें जेविं क्षितिनें तसाचि
हारविला १५

\+ \+ \+

रडत नसें पुत्रातें; स्वर्गा गेल्या न सोडिली संधा
कृष्णा रडतें मी या दीना हतबांधवा धवा
अंधा ॥ २१ ॥

विटले कंसारातें ! संसारा तेचि एक जन धन्य ।
अन्य व्यर्थची गेले मेले विषयार्थ करुनियां
जन्य ॥ २२ ॥

\+ \+ \+

मुख चुंबिती सुताचें पतिवरि कर फिरविती पहावेना
कृष्णा ! कोणाचा तरि शोक करिल ? हें मला
सहावेना २४

१५ वी आर्या पंतांची स्वतःची आहे. व्यासांच्या सत्राव्या अध्यायाच्या ४ थ्या श्लोकांत नुसता एक हार शब्द आला आहे. बाकी अर्थाअर्थी त्या श्लोकाचा या आर्येशीं अधिक संबंध पोंचत नाहीं. या आर्येत नेहमींचें अन्त्य यमक व निराळे दोन चरणांत जुळणारें असें दामयमक अशीं दोन यमकें आलीं आहेत. त्यांनीं व आंतील अर्थानें ही आर्या फार गोड झाली आहे. गान्धारी म्हणते, "भानुमतीनें दुर्योधनाला आपल्या गळ्यांतील हार घेतला पण क्षितीनें तो हार हरविला. हार गळ्यांत घालते एक व तो हरवते दुसरीच ! असा येथें असंगति नामक अलंकार साधला आहे.

२१ वी आर्या मुळाप्रमाणें आहे. तींत काव्य-लिंगनामक अलंकार आला आहे. "म्हणून" किंवा "कारण" या कार्यकारणसंबंध दाखविणाऱ्या शब्दाशिवाय कार्यकारणसंबंध दोन वाक्यांत आला, म्हणजे हा अलंकार सिद्ध होतो. पुत्रातें ( पुत्रास्तव ) रडत नसें; कारण (तो) स्वर्गाला गेला; मी हतबांधवा अंधा म्हणून दीना हे कृष्णा ! मी रडतें. बाविसावी आर्या स्वतंत्र आहे. संसारास विटलेल्याचा महिमा यांत उत्तम प्रकारें वर्णिलेला आहे. २४ वी आर्या मुळा-प्रमाणें सामान्यतः आहे. यानंतर दुसऱ्याचा मृत्यु होऊन स्वतः मृत्यु पावलेल्या अभिमन्यूविषयीं विलाप करणारी उत्तरा गान्धारीच्या नजरेला पडली. तिच्या विलापाचें वर्णन उत्तमोत्तम आहे.

अंकीं मस्तक घेउनि ती बाळा उत्तरा पहा पतितें ।
चुंबुक धरुनि बोलविते "लिहिलें ऐसें कसें
महापतितें ? ॥ ४१ ॥

म्हणते मौन त्यजुनि स्मितपूर्वक एक बोल बोला जी ।
ती कोंस निवेल तुमच्या प्रियवागमृतींच नित्य
लोला जी ? ॥ ४२ ॥

हा जन सखी ममाजी तुमचा मोडूनि काय पद र
–मला ? ।

चुकलें क्षमा करावी, पसराया उशिर काय पदर
मला ? ॥ ४३ ॥

\+ \+ \+

नेत्रें उघडूनि पहा दासी तुमचीच हे नव्हे अन्या
भलती स्पर्शेल कसी ? मी सत्य विराटनृपतिची
कन्या ॥ ४६ ॥

हा सातवा परिचया मास, पहा गणुनि लोटले साच ।
इतुक्यांत कसे विटलां ? साधु म्हणति सख्य
साधुसी साच ॥ ४७ ॥

× × ×

श्रीकृष्णजी तुम्हांला पाहुनि रचिला तुम्हां असाचि गुणें।
सुकुशळ विधि, परि पडलें मुख्य प्रेमीं गुणींच फार उणें ॥ ५० ॥
कृप, कर्ण, जयद्रथ, गुरु, गुरुपुत्र क्रूर हे, जसा काळ
धिक् त्यांतें अन्यायें विरथ करुनि मारिला जिहीं बाळ ? ॥ ५१ ॥

\+ + +

तुजवांचुनि वांचुनि सुख कैंचें ? हा काय भार, तार मला।
ने हंस मानसीं निजहंसीविण काय भारता ! रमला ॥ ५४ ॥

\+ + +

बहु अप्सरा सुरसुता आहेत मनो विनोदकुशला हो।
पाणि ग्राह्यत्वातें तोहि जन उशीर,हाहि कुश लाहो ॥ ५६ ॥
ये:न कशि तरि सखयाप्रति पायांची न वाहुंदे शपथ।
न विसंबेल पळहि मज, आणिल तव शोक पुसत देशपथ ॥ ५७ ॥
आयांतें दायांतें म्हणत्यें मज लाविली बळेंच सवें।
कां मोडितां तुम्हींच; क्षण आतां स्वपतिवेगळें न सवें ॥ ५८ ॥
पतिजवळुनि कां नेतां नेउनि हितबोध करुनि खोलींत।
तुमच्याहि असे अंतर पडलें कां गे ! क्रियेंत बोलींत ? ॥ ५९ ॥
जड सोडवितां हृदयीं देहमनोमयचि उरविला पतिचा
गांधारीनें कथिला भिजवी प्रभुचेहि उर विलाप तिचा" ॥ ६० ॥

"अभानें तूं सुखसुप्त असल्यामुळें मी ( उत्तरा ) एवढा विलाप करीत असतांही माझ्याशीं तूं भाषण करीत नाहींस," एवढेंच मुळांत आहे. याच्यावर पंतांनीं ४१ व ४२ या दोन आर्या घातल्या आहेत त्या वाचकाचा जीव पोळीत आहेत असें वाटतें. ४३ वी आर्या पंतांची स्वतंत्र आहे. ४६ व्या आर्येला थोडा मुळांत आधार आहे. ४७ व्या आर्येचा पहिला चरण मुळाप्रमाणें आहे व दुसरा पंतांचा आहे. ५० वीचा पहिला चरण मुळाप्रमाणें असून दुसरा चरण फक्त एकाक्षरीयमक साधीत असल्या मुळें तो यमकाकरतां घातलेला नसून स्वतंत्र आहे. बळ, वीर्य तेज व डोळे यांनीं कृष्णाशीं सादृश्य असलेला पति मला लाभला असतां मीच गुणानें उणी म्हणून तो मला सोडून गेला, असा कमीपणा उत्तरा आपल्याकडे घेत आहे. यांत आणलेला विनय पंतांचा स्वतंत्र आहे. ५१ वी आर्या मुळाप्रमाणें आहे. ५४ व्या आर्येला मुळांत पुसट पुसट आधार आहे. ५६ व्या आर्येचा पहिला चरण मुळांत आहे. पण रणांतील मरणाबरोबर प्राप्त झालेल्या अप्सरा व मी (उत्तरा) यांतील साम्य अथवा वैषम्य दाखविणारा या आर्येचा दुसरा चरण पंतांचा आहे. तो फारच उत्कृष्ट आहे. उत्तरा म्हणते, तोहिजन ( अप्सरा ) उशीर ( वाळा ) आहेत व मी कुश ( दर्भ ) आहे. हे दोन्ही जन तुला पाणिग्राह्यत्वें लाहो प्राप्त होवोत. दोन्हीही पाणिग्राह्य म्हणजे पाणिग्रहण करण्यास लग्न लावण्यास व पाणि म्हणजे हस्त त्यानें घेण्यास योग्य आहेत. अप्सरा वाळ्याप्रमाणें सुवासिक म्हणून पाणि ग्राह्य; पण मी उत्तरा दर्भाप्रमाणें पवित्र म्हणून पाणिग्राह्य आहे. लग्नाच्या स्त्रीच्या पावित्र्यामुळे दाखविलेला श्रेष्ठपणा पंताचें रसिकत्व दाखविते. "लवकरच तुझ्यामागून येतें" एवढ्या मुळावर ५७ वी आर्या रचिलेली आहे. मी पळभरही तुझ्यामागे रहाणार नाहीं. तूं ज्या देशाला जात आहेस, त्याला त्याची वाट पुसत पुसत माझा शोक मला नेईल त्याकरितां तुझ्या पायांची शपथ वाहाण्याचे सकोः ती वाहिली काय व न वाहिली काय सारखीच. ५८ व ५९ व्या आर्यांना मुळांत आधार आहे; तो एवढाच कीं, अनुगमन करूं पाहणाऱ्या उत्तरेला

मत्स्यराजकुलांतील स्त्रियांनीं तेथून ओढून नेले. अर्थात् ती त्या वेळीं गरोदर असल्यामुळें गर्भरक्षणाकरितां अनुगमनापासून तिला परावृत्त करणें अवश्य होतें! नव्हे, त्या राजस्त्रियांचें कर्तव्य होतें. एवढ्या मुळावर अंतःकरणाला हालवून सोडणारें, पूर्वीचें हृद्गत कथन करणारें, करुणरसानें ओथंबलेले शब्द उत्तरेच्या तोंडांतून पंतांनीं कसे स्रुत केले आहेत ते रसिकांना सांगावयास नकोच. उत्तरा म्हणते "अहो आर्यांनो, अहो दार्यांनों! तुम्हींच ना मला माझी समजूत घालून अथवा फुसलावून मला खोलींत दवडीत असा? व खोलींत जाण्याकरतां आर्जवेंकरून येण्याची सवें (सवय) मला लावून आतां मला त्यांच्याकडे मी होऊन जात असतां मला ओढून थांबवून नेतां! तुमच्या तेव्हांच्या बोलण्यांत व आताच्या कृतींत कांहीं मेळ असूंद्यां'! ५, ६ ह्या आर्यांतील जड देह राहिला व मनोमय देह गेला हा वेदान्त पंतांचा व प्रभूलाही प्रभून रडूं येऊन त्याचा ऊर भिजला हा मखलाशी तांचीच. स्त्रीपर्वांतील उत्तरादर्शन जसें सरस आहे, तसेंच कर्णदर्शन आहे असें दिसून येईल. याच्या मुळांतील १४ श्लोकांस पंतांनी संक्षेप दिला नाहीं पंतांनीं दोन आर्या अधिकच घातल्या आहेत व त्या कर्णाची उपमाता जी राधा तिच्या तोंडीं घातल्या आहेत. त्या अशा.

राधा म्हणत्ये हा! मज पुत्रवतीचीच लागली दृष्टि।
पुत्रा! शून्या झाली तुजवांचुनि जेविं रविविना सृष्टि
॥ ५ ॥ (स्त्री. प. अ. ५)

\+ \+ \+

द्विज हो! संतत तुमच्या जो आशीरमृतवृष्टिनें ओला।
पार्थदवानें केला कल्पद्रुम भस्म तो कसा बोला ॥ ७ ॥

५ वी आर्या पंतांची स्वतंत्र आहे. राधा म्हणते, "काय चमत्कार आहे. ? वंध्या स्त्रीची दृष्ट पुत्रवतीला लागणें शक्य आहे; पण येथें मला पुत्रवतींची दृष्ट लागली. पुत्रवती स्त्रिया म्हणतात, राधेचा पहा कसा पुत्र आहे! आमचा कसा नाहीं तसा! सातव्या आर्येचा पहिला चरण स्वतंत्र आहे. पण "भूमौ विनिहतः शेते वातभग्न इवद्रुमः" या एक मूळ चरणावर या आर्येचा दुसरा चरण पंतांनीं रचिला आहे. त्यांत मार्मिकपणा फार आहे.

यापुढें वृषसेनेचा (कर्ण पत्नीचा विलाप) येतो तो फारच उत्कृष्ट आहे.

वृषसेना राणि म्हणते नाथा! तुज न विजयें, न गुरुशापें
वधिलें कृष्णाक्षोभें, अथवा माझ्याचि पूर्वकृत पापें ॥ १० ॥
ब्रह्मण्य! शूर, दाता, बुध, सर्वांगोपभोग जो कर्ता,।
हर्ता शत्रुपद्रव, दुष्टें महि! मारिला कसा भर्ता? ॥ ११ ॥
मजतुजहि समचि भजला, उपभोगें तोषला; विलासवती।
अन्या स्वर्गीं नेणें; त्यासि कसा दोष लाविला सवती! ॥ १२ ॥
मज कां गिळिलें नाहीं पापे! रथ चक्र गे! कसें गिळिलें?।
दे उत्तर ऐकोंदे कां न वदसि? तोंड काय गे! खिळिलें? ॥ १३ ॥

× × ×

अल्पावशेष केला अवयव खाउनि वृकादिकीं जरि तो
तरि दृष्टिप्रीति पहा कृष्णचतुर्दशतिथींदुसा करितो! ॥ १४ ॥
धर्मा त्रयोदशाब्द न, ज्याच्या चिंतेकरूनि निज लागे
तो हा पुन्हा नुठाया वसुधे! तुज दृढ धरूनि निजला गे! ॥ १५॥

येथें दहाव्या आर्येंतील वृषसेना ही वृषाची म्हणजे कर्णाची सेना नव्हे. मुळांत कर्णपत्नी असें आहे.

"पश्य कर्णस्य पत्नीं त्वम् वृषसेनस्य मातरम्" असें गान्धारी श्रीकृष्णाला सांगत आहे. (पहा स्त्री-पर्व श्लोक १० अ. २१) व तसाच सुषेण माता रुदती भृशार्ता असा तिचा उल्लेख पुढें बाराव्या श्लोकांत आहे. १२ व्या आर्येचा अर्थ काव्यसंग्रहकारांनीं वृषसेनोद्दिष्ट असा लावला आहे, तरी तो ओढून ताणून लावलेला दिसतो. वरील सर्व आर्या कर्णपत्नीच्याच तोंडात शोभणाऱ्या आहेत. त्यापैकीं १० ते १३ आर्या पंतांच्या स्वतंत्र आहेत. त्या व विशेषतः १३ वी आर्या या अगदीं निकरावर आलेल्या स्त्रीच्या तोंडीं विशेषतः उपरिनिर्दिष्ट कर्णपत्नी ज्या प्रसंगांत सांपडली आहे, त्या प्रसंगीं कोणत्याही भावनावश स्त्रीच्या तोंडीं शोभण्यासारख्या आहेत. "हे ! महि ! तूं रथचक्र गिळिलेंस तर त्याबद्दल मला कां गिळिलें नाहींस"? हा प्रश्न कर्णपत्नीने विचारतांच मही कशी निरुत्तर झाली आहे व "तूं बोलत कां नाहींस ? तुझी वाचा कां बसली"? इ. एकावर एक उच्चारलेली लहान लहान भेदक वाक्यें योजून कर्णपत्नीच्या मनाच्या स्थितीचें चित्र पंतांनीं फार सुन्दर काढिलें आहे. स्त्रियांच्या भावना स्पष्ट करुन दाखविण्यांत पंतांचा हातखण्डा आहे. १३ व १४ या आर्या मुळांत आहेत. १३ वींत पंत म्हणतात. "कृष्णपक्षाला आरंभ झाल्या दिवसापासून पुनवेच्या पूर्णचंद्राची क्षय प्रतितिथीला होत होत चतुर्दशीला त्याचा अंश एककला प्रमाण जरी उरला असला, तरी तो जसा दृष्टीला सुख देतो, तसा हा कर्णाचा देह त्यांतील अवयव वृकादिकांनीं खाऊन खाऊन अल्पावशेष केला आहे, तरी सुद्धां दृष्टीला सुख देत आहे.

वास्तविक हा कर्णाचा देहावशेष दृष्टीला सुखकारक होऊं नये अशी सर्व परिस्थिति प्रतिकूल असतां तो सुखकारक होतो म्हणून येथें कवीनें विभावना अलंकार साधला आहे. परंतु मुळांत "सुख देत नाहीं" असें आहे. पंतांची आर्या या "नकार गाळल्यानें कशी सरस लागते हें दाखविण्याकरिता मूळ श्लोक दिला आहे. तो असा. तिसऱ्या चरणांतील नकाराकडे लक्ष दिलें म्हणजे वरील म्हणणें कळेल.

अल्पाव शेषो ऽपि कृतो महात्मा ।
शरीरभक्षैः परिभक्षयद्भिः ।
द्रष्टुं न नः प्रीतिकरः शशीव ।
कृष्णस्य पक्षस्य चतुर्दशाहे ॥ १३ ॥
(म. स्त्री. प. अ. २१)

व्यासांच्या संस्कृतीचा त्यांच्यामागून झालेला कवि जो कालिदास तोही चंद्राच्या अशा क्षीणतेलाच त्याच्या वृद्धीपेक्षा अधिक मान देतो. उदाहरणार्थ पुढील श्लोक पाहा.

पर्यायपीतस्य सुरैर्हिमांशोः ।
कलाक्षयः श्लाध्यतरोहि वृद्धेः ॥२९॥(रघु स. ५)

१४ वी आर्या फार बहारीची आहे. हींत तर पंतांनीं अधिक रसिकता व प्रयोजकपणा दाखविली आहे. हींतील भावना फार प्रबल आहे.

उद्विग्नः सततं यस्मात् धर्मराजो युधिष्ठिरः ।
त्रयोदशसमा निद्रां चिन्तयन्नाध्यगच्छत ॥ ७ ॥
(म. स्त्री. अ. २१)

हा या आर्येचा मूळ श्लोक आहे. कर्णाची खरी योग्यता किती होती तिचें यथार्थ चित्र या श्लोकांत आहे. वास्तविक याश्लोकांत गान्धारीनें कर्णाचें शव पाहिल्यावर तिच्या मनांत जो विचार आला, तो तिनें सटकन प्रथम प्रकट केला व मग कृष्णाला कर्णपत्नी तिनें दाखविली. असें असतां पंतांनीं हा श्लोक गान्धारीच्या तोंडांतून काढून कर्ण पत्नीच्या तोंडांत घातला आहे. यांत औचित्य फार आहे. "बारा वर्षें वनवासांत व एक वर्ष अज्ञातवासांत अशा तेरा वर्षांत धर्माला ज्याच्या चितेनें झोप लागली नाहीं, तो कर्ण आता त्याची माता जी धरणी तिला धरून तिची मांडी उशाला घेऊन निजला ! तो पुन्हा उठणार नाहीं." दुसरा चरण पंतांचा स्वतंत्र आहे.

(अपूर्ण)

विष्णुदासांनी चिपळूणकर लहानपणीं ओटीवर बसून संध्याकाळीं ही आर्या आपल्या सहाध्यायांस घोळून घोळून म्हणून तिचा आस्वाद घेत असत, अशी एक आख्यायिका आहे. हें श्लोककार्य याच सुरांत पुढें चालू आहे. त्यांतील काय गाळावें ? सर्वच घेण्यासारखें ! भीष्मांविषयीं व्यासकृत व पंतकृत उद्‌गार सरस आहेत.

यामागें धर्मांचें पाण्डव पुसतील तत्त्व कोणातें ?
हा ! राजनीति विधवा झाली ! बैसेल धरुनि कोणातें !
॥ ३३ ॥ ( स्त्री. प. अ. ५ )

( भावार्थ ) भीष्मांच्या मागें धर्मतत्त्व उघड करून सांगणारा कोणी उरला नाहीं ! तेव्हां धर्मविषयक प्रश्न निघाल्यास पाण्डव कोणाला जाऊन त्याचा निर्णय करण्यास विनंती करतील? राजनीति विधवा झाली. तिला आतां कोनांत बसून रहावें लागणार ! शिव ! शिव ! काय तिची दशा ही !

पहिला चरण मुळाप्रमाणें आहे. दुसरा स्वतंत्र आहे. ही आर्या अमर होण्यास लायक आहे. पण हिचें अवतरण शीरोलेखांत घेतलेलें आढळत नाहीं. तें अद्यापि भीष्मतुल्य धर्मनीतिज्ञ पुरुषाच्या अभावामुळें नसेलना ?

रामस्मरण करून हें पर्व पंतांनीं संपविलें आहे.

## शान्तिपर्व

या पर्वाचे मूळ अध्याय ३६५ आहेत. त्यांपैकीं पंतांनी फक्त ५५ च घेतले आहेत. नारद धर्माकडे आले असतां त्यांना धर्म म्हणाला' 'कुन्तीनें तोयदान-प्रसंगीं सांगितलें कीं कर्ण हा सूर्यापासून झालेला तिचा मुलगा होता. तो तिनें उपजतांच पेटींत घालून गंगेत सोडून दिला. तो राधेनें वाढविला. त्याविषयीं पंत म्हणतात

तो भाग्यें सांपडला राधेला अर्पिला अधिरथानें
द्रवलीं उदयीं शशिमणिपात्रेंशीं, न धरतीच
धिर थानें १२
( शां. अ. १ )

राधेला सुटलेल्या पान्ह्याला शशीचा उदय झाला असतां चंद्रकान्त मण्याला सुटणाऱ्या द्रवाची उपमा पंतांनीं दिली आहे ती सुन्दरांत सुन्दर आहे.

धर्म पुढें म्हणाला, कुन्तीनें आणखी सांगितलें की तिनें कर्णाजवळून युद्धापूर्वी वचन घेऊन ठेवलें होतें कीं तिचे अर्जुनासकट किंवा कर्णासकट पांच पुत्र उरतील. यावर धर्माचे विचार पंतांनी स्वतंत्रपणें वर्णन केले आहेत ते असे—

हें वृत्त तोयदानीं वदली तेव्हांचि मज न
आइकवे ।
ऐसी दुसरी लोकीं त्वां आइकिली नसेल
आइ कवे ! ॥ २१ ॥

कुन्तीच्या कृतीचा धिक्कार अधिक स्पष्ट व अधिक सविनय रीतीनें धर्माच्या तोंडीं सजेल अशा शब्दांनीं याहून अधिक चांगला कोणाला करतां येणार नाहीं. धर्माला या गोष्टीचा इतका खेद वाटला कीं त्याला वनवास किंवा संन्यास बरा वाटला. त्यावरून धर्माचा अर्जुनादिकांशीं झालेला संवाद फार सरस आहे. व्यासांचा जरा विस्तृत आहे. तसा पंतांचा नाहीं. एवढाच फरक आहे.

अर्जुन धर्मास म्हणाला—

### व्यास

क्लीबस्य हि कुतो राज्यं दीर्घसूत्रस्य वा पुनः ॥५॥
( शा. अ. ८ )

### पंत

सत्य वदति कवि कैंचें राज्य क्लीबास दीर्घसूत्रास
पाहोनि विप्रशीला पतिला पावे अपारभू त्रास १८
( शां. अ. ३ )

दुसरा चरण पंतांचा यमकाकरतां घातलेला आहे. त्यावर धर्म म्हणाला—

### व्यास

हित्वा ग्राम्यसुखाचारं तप्यमानो महत्तपः ।
अरण्ये फलमूलाशी चरिष्यामि मृगैः सह ॥ ४ ॥
( म. शां. अ. ९ )

पंत

शिरले प्रवृत्तिमार्गी, विषयसुखातें भुलोनि नर कामीं।
तैसा होउनि जाऊं कां कळत कळत बळेंचि नर-
का मी ? ॥ २७ ॥

ही आर्या मुळांतील भावार्थाला धरून आहे.

यावर भीम पुढें होऊन म्हणाला—

क्षुधितें सदन्नपात्र त्यागावें जोडिलें करुनि यत्न।
कीं कामुकें त्यजावें जैसें निर्दोष कामिनीरत्न ॥३३॥

× × ×

तद्वत् तव कर्मनृपा ! लोकां तूं मूर्ख वाटसी. मज तों।
वाटे, मूढ तुजपरिस बहु आम्हीं, कीं अशा तुला
भजतों ॥ ३५ ॥

× × ×

जरि सर्वा कर्माच्या संन्यासेंकरुनि म्हणसि सर्व तरे।
व्हावेचि मुक्त राया ! तरि हे निःशेष वृक्षपर्वत
रे ॥ ३७ ॥

+ + +

तो धन्य, पूर्वजांहीं जें केलें तेंचि जो करी राया !
वेंची नृपा ! प्रजांच्या अवनीं, न वनीं, वृथा शरीरा
या ॥ ४० ॥

हें भीमाचें भाषण शूर शिपाई गड्याला साजेसें आहे व मुळाप्रमाणें आहे. वीरव्रताचें पालन करणाऱ्या अर्जुनानें गृहस्थाश्रमाचें अवलंबन कर, असें सांगितलें. पुढें नकुळ म्हणाला

" एकच करी तिघांचें, एकाचेंही तिघां नव्हे कार्य;
ऐसें तोलुनि वदला धाता म्हणतात सर्व ही आर्य
॥ ४५ ॥

एकच गृहस्थाश्रम दुसऱ्या तीन आश्रमांचें कार्य करतो; पण दुसऱ्या तिघां आश्रमांच्या हातून एका गृहस्थाश्रमाचें कार्य होत नाहीं. हा गृहस्थाश्रमाचा महिमा थोडक्यांत नकुळानें आणला आहे; तो मुळाप्रमाणेंच आहे. नकुळ पुढें म्हणाला—

ममकार, अहंकार त्यागुनि होसील मुक्त गेहींच
भव अपवर्ग, मम, न मम; हे दोघे नांदतात
देहींच ॥ ५१ ॥

"ममत्व व अहंपणा सोडून तूं घरांत राहूनच मुक्त होशील. अरे ! संसार व मुक्ति अशीं दोघें, हें माझें व हें माझें नाहीं, यांच्या रूपानें प्रत्येकाचे देहांतच नांदत असतात." नकुळाचें हे भाषण म्हणजे सुलभ करून सांगितलेला वेदान्तच होय. हा मुळाप्रमाणें आहे. नंतर व्यासांची धर्मज्ञ, धर्मदर्शिनी, अभिमानवती श्रीमती व पंतांची लाडकी द्रौपदी काय म्हणाली तें पहा.

मारूं सत्य करुनि निज पण ससहाया सुयोधनास रणीं
मग निःसपत्न होउनि भोगूं आम्हीं तुम्हीं सुखें
धरणी ॥ ६२ ॥

× × ×

ऐसें कीं द्वैतवनीं वदलां, दिधलीं अभीष्ट वरदानें
तीं अनृतें कां करितां ? परि पाळावें स्ववाक्य
वरदानें ॥ ६४ ॥

हृदयें वाट पहाती, मेघांची जेंवि करुनि आ शेतें
वंध्या करितां वत्सलवर्य तुम्हीं सुज्ञ कैंवि आशेतें
॥ ६५ ॥

× × ×

राज्यश्री, स्त्री, सुत हे क्लीबाला काय होय ? जो
धीर।
तोचि धरेतें भोगी विद्वान्, विख्यात, विक्रमी वीर
॥ ६७ ॥

बहु सुंदरहि अदण्ड क्षत्रिय जो तो सभेंत शोभेना
शोभे नारीसी भू, क्लीबा पतिला कधींहि लोभेना
॥ ६८ ॥

× × ×

तव उन्मादें भ्रमले भीमार्जुन भरतनायका ! यमही
सावध असते तरि तुज बांधुनि हे शासिते न
काय मही ? ॥ ७७ ॥

× × ×

झालासि वृथा विमना. पाळीं, त्यागीं कदा न वसुधेतें
ईतें सुरसा समुचित तूंचि; पर जसा न दानव
सुधेतें ॥ ८२ ॥

६५ व्या आर्येंत पंतांचें आवडतें यमक आलें आहे. ६७ व्या आर्येच्या शेवटीं वृत्यनुप्रास आला आहे. या सर्व आर्या अगदीं मुळाप्रमाणें आहेत.

नंतर अर्जुन पुढें येऊन त्यानें धर्माला दण्ड-माहात्म्य एका अध्यायांत स्पष्ट करून सांगितलें. तें पंतांनीं तीन आर्यांत पुरें केलें आहे. तें मुळावरून वाचण्यासारखें आहे. छडी वाजे छम् छम् विद्या येई घम् घम् याचा मूळश्लोक. म. शा. अ. १५ येथें आहे.

न विद्यां प्राप्नुयात् कश्चित् यदि दण्डो न पालयेत्
|| ४० ||

य एव देवा हन्तारस्तान् लोकोऽर्चयते भृशम् ||१६||

हा श्लोक याच अध्यायांत आहे. त्याच अर्थाचें एक वाक्य प्रसिद्ध वक्ता एड्मण्ड बर्क याचे तोंडून एकदां निघालें होतें. तें असें The harder the Bhavani strikes the greater the ardour of her devotees becomes. अर्थः- जशी जशी भवानी देवी सांथी वगैरे उत्पन्न करून तडाके मारते तशी तशी तिच्या भक्तांची तिच्यावरील भक्ति वाढत जाते. उत्पत्तिकारक ब्रह्मदेवासारख्यांना लोक भजत नाहींत पण लयकारक शंकरासारख्यांना भजतात. पुढें पंतांनीं सात अध्याय सोडले आहेत. त्यांतील एकांत प्रसिद्ध विदेही व तत्त्वज्ञ असा जीवन्मुक्त राजा जनक याच्या तोंडचें भीमानें धर्माला कथन केलेलें अमर झालेलें वाक्य आहे. तें असें —

अनन्तं बत मे वित्तं यस्य मे नास्ति किं चन ।
मिथिलायां प्रदीप्तायां न मे दह्यति किंचन ||१९||
(म. शा. अ. १७)

(भावार्थ) माझें वित्त पहा. तें देश, काल व वस्तु यांनीं ( यांच्या मापानें ) अपरिछिन्न आहे ( मोजतां येण्यासारखें नाहीं ) त्यांत माझें असें कांहीं नाहीं. मिथिला नगरीला आग लागली तरी माझें असें त्यांत जळणारे कांहीं नाहीं. रज्जूवर सर्प जसा मनःकल्पित असतो, तसें हें वित्त माझें असें मनःकल्पित आहे. ठणठणीत कोरडया मरुभूमीवर मृगजलाचा आभास असतो व तो मृगाला खरा वाटतोहि पण त्यानें त्या भूमीला आर्द्रता थोडीच येणारी आहे ! नंतर व्यासांनीं कांहीं राजधर्म सांगितला. धर्मानें आणखी सांगण्याविषयीं व्यासांस विनंति केल्यावरून व्यास म्हणाले, तूं भीष्माकडे जा तो तुला नीट सांगेल.

धर्मराजाची स्वारी मग मोठया थाटानें हस्तिना-पुरास गेली तीविषयीं व्यास म्हणतात

ततो वैतालिकैः सूतैर्मागधैश्च सुभाषितैः ।
स्तूयमानो ययौ राजा नगरं नागसाह्वयम् ४३
( म. शां. अ. ३७ )

गृहाणि राजमार्गेषु रत्नवन्ति महान्तिच ।
प्राकम्पन्तीव भारेण स्त्रीणां पूर्णानि भारत || ३ ||
( म. शा. अ. ३८ )

या श्लोकाचें सार पंतांनीं एका आर्येत आणलें आहे, तें प्रशस्यच आहे.

स्वर्गीं गोचर झाला, देवांच्या धर्मवंदिरव राजा ।
तें तें गमे खचेल, व्यापी स्त्रीवृंद मंदिरवरा ज्या
|| ९ ||
( शां. अ. ५ )

येथें भाषांतराकरतां ऐवजाची निवड करण्यांत जशी पंतांची कुशलता दृष्टीस पडते, तशी ठाकठीक रीतीनें त्याची मांडणी करण्यांतही ती दृष्टीस पडते. कधीं कधीं मुळावर ताण करण्यांतही पंत आपली कुशलता दाखवितात.

पंत पुढें म्हणतात—

ये बहु शोभा अंतःशून्यत्वासहि धरूनि आगारा
|| १० ||

अंतःपूर शून्य झालें व शोभलें या म्हणण्यांत विरोध दिसतो. पण स्वारी पहाण्याच्या हौसेनें एकूण एक स्त्री माडीकडे निघून जावी व अंतःपूर शून्य व्हावें यांतच त्याची शोभा आहे. असें कळल्यावर वरील विरोध केवळ आभास ठरतो. म्हणून येथें विरोधाभास अलंकार साधला आहे.

धर्मानें राजवेश्मीं प्रवेश केला त्याविषयीं पंत म्हणतात:—

धर्में कुरुपुर पावे, बहु अर्कें जेंवि तोंख राजीव।
करितां प्रवेश, वाटे तें नृप-गृह देह, तो खरा जीव ॥ १६ ॥

पहिल्या चरणांत धर्म हा जीव वाटला, व पुरी देह वाटली. ही उत्प्रेक्षा जितकी साधी तितकी सुन्दर आहे. शिवाय या आर्येंत पांच अक्षरांचें यमक आहे. पुढें धर्माला राज्याभिषेक झाला व त्यानें आपल्या अधिकाऱ्यांच्या नेमणुका केल्या व तो भीष्माकडे कृष्णासह गेला. तेथें भीष्मांनीं त्याला राजधर्म सांगितला. त्यांत मुख्यतः गुरुजनांचें अभिहनन महायुद्धांत हातून घडल्यामुळें धर्माला जी उद्विग्नता प्राप्त झाली होती, ती घालवून त्याचें मन शान्त होण्याकरतां भीष्मांनीं सांगितलें कीं,

ब्राह्मणानां यथा धर्मो दानमध्ययनं तपः
क्षत्रियाणां तथा कृष्ण समरे देहपातनम् १४
( म. शा. अ. ५५ )

भावार्थः—ब्राह्मणांचा दानअध्ययनादि हा जसा मुख्य धर्म तसा क्षत्रियांचा रणात देहपतन हा होय. या प्रकरणांत मुळांत कांहीं वाचनीय श्लोक आहेत, त्यांतील एकदोन दिले आहेत.

न कोशः परमोऽन्योऽस्ति राज्ञां पुरुषसंचयात् ।३४।
( म. शा. अ. ५६ )

(भावार्थ) पुरुषांच्या संग्रहाशिवाय दुसरा कोश ( द्रव्यसंग्रह ) राजांचा नसतो.

भवितव्यं सदा राज्ञा गर्भिणीसहधर्मिणा ।
कारणं च महाराज श्रुणु येनेदमिष्यते ॥ ४४ ॥
यथा हि गर्भिणी हित्वा स्वप्रियं मनसोऽनुगम्
गर्भस्य हितमाधत्ते तथा राज्ञाप्यसंशयम् ॥ ४५ ॥

( भावार्थ ) राजानें सर्वदा गर्भिणीप्रमाणें पथ्य पाळावें. त्याचें कारण हे महाराजा ! तूं ऐक. जशी गर्भिणी स्त्री एकादी गोष्ट तिच्या मनासारखी म्हणून प्रिय असूनहि तिचा त्याग आपण होऊन करते व गर्भाचें हित साधते, त्याप्रमाणें राजानें आपल्या मनासारख्या म्हणून प्रिय असलेल्या गोष्टींचा त्याग करावा, व प्रजेचें हित साधावें, यांत संशय नाहीं.

हें पर्व नेहमींप्रमाणें रामपदीं अर्पण केलें आहे.

## अनुशासनपर्व

भीष्मांच्या आज्ञेवरुन कृष्णानें शिवयश धर्मराजाला सांगण्यास आरंभ केला.

प्रक्षाळुनि करचरण, स्वच्छें उदकेंकरूनि आचमना
शिवयश सांगे, सुखवी ज्याचा पहिलाचि बहु उवाच मना ॥ ५ ॥
( अनु. अ. १ )

येथें "उवाच" शब्द लक्षांत ठेवण्यासारखा आहे. "उवाच" हें वच् या धातूचें तृतीय पुरुषीं एकवचनी भूतकाळाचें रूप आहे. त्याचा येथें उपयोग आरंभ या अर्थी नामासारखा केलेला आहे; कारण महाभारतांत कोणाचें बोलणें द्यावयाचें झालें कीं त्याच्या आरंभीं असुकः उवाच असें लिहिलेलें असतें. या पर्वांतील उपमन्यूचें उपाख्यान फार सरस आहे. शिवमहिम्याचें वर्णन करतांनां उपमन्यूनें आपल्या बाळपणची एक कथा कृष्णाला सांगितली आहे. अन्यत्र गाईचें दूध काढतांना पाहून उपमन्यूनें घरीं आल्यावर 'मला दूध दे' अशी आईजवळ मागणी केली. पाण्यांत पीठ कालवून तें शिजवून तें दूध म्हणून आई त्याला नित्य वाढीत गेली. पुढें संधि येतांच मुलाला दूध प्यावयास मिळावें म्हणून पित्यानें त्याला एका यज्ञसभारंभास नेलें. सुरभीचें दुग्ध तेथें प्राशन करून घरीं आल्यावर त्यानें आईचें कपट तिला कळविलें. पण खरें दूध तापसांना कोठलें असें सांगून तिनें त्यास शंकराची आराधना करावयास सांगितली, व शंकर प्रभूनें त्याला कसें तारिलें तें पुढें वर्णन आहे.

कथितों सविस्तर प्रभु तारी मज परम मुग्ध भक्ता तें
पाहें बाळक मी ऋषिशिशुभक्षित रम्य दुग्धभक्ता तें ॥ २ ॥
( अनु. अ. २ )

मातेसि म्हणे तेव्हां दुग्धौदन मज यथेष्ट दे खाया ।
बहु दुःखभरें उघडुनि दृष्टि न शकली मदास्य
देखाया ॥ ३ ॥

मग माझी ती माता पिष्ट जळीं कालवूनि तें कढवी।
ठकवी किति दिवस असें दारिद्र्यचि कपट तीस तें
पढवी ॥ ४ ॥

× + ×

झांकी जी दुग्धकपट, बा ! करि उघडेंचि तीच
ममता तें
ज्ञातिकुळीं यज्ञातें जातां नेलें मलाहि मम तातें ॥५॥
घडलें तेथें कृष्णा ! दिव्यसुरभिदुग्धपान; रस मजला।
समजे सत्यानृत, गुरुभक्त जसा काय बा नर
समजला ॥ ७ ॥

सेवविला मातेनें श्रुतिनें जो सेव्य म्हणुनि विष्टरसा
विषया ब्रह्म,तसा भुललों दुग्धज्ञ मी न पिष्टरसा॥८॥
मधुवीस ! बाळपणें ऐसें उपमन्यु हा वदे तीस
माते ! क्षीर नव्हे हें; नलगे ! ठेवूनि नांव देतीस॥९॥
या मद्वचनें कृष्णा ! अंबा बहु गहिंवरे, असुख
पावे ।
वाटे तीस असें कीं, जन्म विफळ, आपुले असु
खपावे ॥ १० ॥

कृष्णा ! मज आलिंगुनि मस्तक हुंगुनि, असें म्हणे
माता ।
मागसि तें दुग्धौदन कैंचें या तापसाजना ? ताता !
॥ ११ ॥

वाताहार करावा, प्यावें जळ, शाकमूळफळ खावें
सुखभोगविहीनत्वें बा ! आम्हां तापसांसि वळ-
खावें ! ॥ १२ ॥

वा ! आम्हां ऐशांची परमा गति शिव ! तया
सदाराध्या ।
क्षीरौदन किति ? पुरविल सकळेप्सित, ईश्वर
सदाराध्या ! १३

तिसऱ्या आर्येतील दुसरी ओळ ही "दुःखिता जननी" एवढ्या मुळाचा सुंदर विस्तार आहे. "मग माझी ती जननी" या शब्दांत झालेला चवथ्या आर्येचा आरंभ उपमन्यूच्या जननीची असहाय स्थिति व तशा स्थितींत मुला विषयींचा तिचा कळवळा फार सरस रीतीनें दाखवीत आहे. सहाव्या आर्येचा पहिला चरण पंतांचा स्वतंत्र आहे. आईच्या हातून दुग्धकपट होण्याला कारण जी ममता झाली, तीच ममता तें कपट उघड करण्याला कारण झाली. कशी ? तर मला खरें दूध प्यावयाला मिळावें म्हणून यज्ञगृहीं मला नेण्याची इच्छा आईच्या त्याच ममतेनें झाली, व तेथें खरें दुध कसें असतें तें कळलें व आईनें कपट कसें केलें तेंही कळलें. अकराव्या आर्येंतील तापसजनांचें संक्षिप्त वर्णन सरस आहे. उपमन्यूनें मातेच्या सांगण्याप्रमाणें शंकराची आराधना केली. शंकरानें दर्शन दिलें. नंदीचें वर्णन मुळांत सुन्दर आहे, पण त्यांत उदात्तपणाची भर घालण्यास पंतांनीं एक स्वतंत्र आर्या रचिली आहे.

बहुत गुणेंकरुनि उणें भासविलें अमृत, वासवा,
फेनें ।
यद्वचनाच्या, केला, जित सुरतरुकुसुमवास
वाफेनें ॥ ६० (अनु. अ. ३)

( भावार्थ ) ज्याच्या वदनाच्या फेनें ( फेसानें ) आपल्या अंगच्या बहुत गुणेंकरून वासवा ( इंद्राला ) अमृत उणें ( कमी ) भासविलें. तसेंच ज्याच्या वदनाच्या आंतून निघणाऱ्या वाफेनें कल्पवृक्षाच्या वासाला उणें भासविलें; हें वर्णन उदात्त आहे. शंकराचें तेजोमय रूप दुर्निरीक्ष्य होतें.

प्रभुच्या दीप्तिपुढें किति अचिरभावृष्टि तरळलीला जे
मुग्धा पतिस पहाया तसि माझी दृष्टि तरळली
लाजे ॥ ६३ ॥

पहिला चरण मुळाला धरून आहे. दुसरा पंतांचा स्वतंत्र आहे. शिवाच्या दीप्तिपुढें अचिराभावृष्टि ( चंचल प्रकाशाची वृष्टि करणारी ) तरळलीला (अस्थिर लीला) दाखविणारी जे ( जी ) वीज ती किति टिकेल ? माझी मात्र चंचल दृष्टि, जशी मुग्धा वधू पतिला पहावयास लाजते, तशी त्या दीप्तिपुढें लाजली. ही उपमा फार सरस आहे.

आलम्बायनानें शंकराजवळ तप करून सामान्यतः गुणी पण, विशेषतः लक्षायु शंभर पुत्र मागून घेतले त्याबद्दल पंतांनीं एक आर्या घालून अल्पायु मुलें प्राप्त झालीं असतां पित्याची कशी काय स्थिति होते, तें चांगलें दाखविलें आहे.

झाले प्राप्त विपुलगुण सुत; तत्संबंधयोग परि टांचा
तो तैसा लज्जाकर, जैंवि परपटोपभोग परिटांचा १४
( अनु. अ. ६ )

विपुलगुणांचे मुलगे प्राप्त झाले, पण त्यांच्याशीं असणारा पित्याचा संबंध ( संयोग ) जर टांचा ( अल्प कालिक ) असला तर तो लज्जाकारकच होतो. जसा परिटाचा पराच्या ( दुसऱ्यांच्या ) धुवावयास आणलेल्या पटांचा–वस्त्रांचा–उपभोग ( डौलाचा वापर ) लज्जाकर होतो तसा. ही यमकाकरतां घातलेली उपमा अनपेक्षित असल्यामुळें अधिकच आश्चर्य व आनंद देणारी आहे.

शंकरप्रसादानें काय प्राप्त झालें, तें सांगतांना गृत्समद म्हणाला—

बापा ! धर्मा ! कोणी विद्येनें मजअसा कवी नाहीं ।
प्राचीनांहीं जैसे, तैसे कर जोडिले नवीनांहीं ॥ ४१

पहिलाचरण मुळाप्रमाणें, दुसरा अगदीं नवीन, पण वर्णनाच्या साधेपणामुळें अमर होण्यास योग्य आहे. शिवाचा महिमा वर्णन करतांना पुन्हां कृष्ण म्हणाला

भगवान् प्रसन्न होउनि, भेटुनि, मज बहुत आदरि द्रवुनि ।
सुख पावलीं प्रसादीं, हेमन्तीं जेंवि ! बा दरिद्र उनीं॥४६

थंडीच्या दिवसांत दरिद्री जनांला उन्हांत पटाभावें काय व किति सुख होतें तें प्रमाणभूत घेऊन पंतांनीं जी स्वतंत्र उपमा योजिली आहे, ती सरस आहे.

" ब्राह्मणांची पूजा करण्यांत काय फळ आहे ?" असें प्रद्युम्नानें एकदां कृष्णास विचारलें. तेव्हां कृष्ण म्हणाला—

ज्या प्रेमें स्वापत्या, त्या प्रेमें ब्राह्मणांसि पोसावें ।
कल्याणार्थ सुनेनें सासूचें जेंवि तेंवि सोसावें ॥ १८
( अनु. अ. ७ )

ही आर्या पंतांची स्वतंत्र आहे. दुसरा चरण अमर झाला आहे. हल्लीं विडम्बनात्मक काव्य वरचेवर दृष्टीस पडतें. तो प्रकार नवीन आहे कीं काय असा प्रश्न उपस्थित होतो. पण पुष्कळ वृद्धांचे तोंडीं या सासूविषयक चरणाचें विडंबन झालेलें ऐकूं येतें तें असें

कल्याणार्थ सुनेचें सासूनें जेंवि तेंवि सोसावें ।

या अध्यायांत दुर्वासानें कृष्णाचें सत्त्व पाहिल्याची कथा आहे. तींत मूळ ५६ श्लोकांबद्दल पंतांनीं १०७ आर्या घातल्या आहेत, व बरीच अर्थचमत्कृति दाखविली आहे. कृष्ण व रुक्मिणी या दोघांना रथाला जोडून आंत बसून रथ हांकीत दुर्वास निघाले. त्यांच्या स्वारीचें वर्णन स्वतंत्रपणें पंतांनीं केलें आहे. हा देखावा पाहून पौरजन अस्वस्थ दिसले. कृष्ण प्रद्युम्नाला ही कथा सांगतांनां म्हणाला—

मी नाकावरि ठेवीं वाराया लोक, अंगुलीलाच ।
धरिलीं तापभरानें सर्वं जनें स्पष्ट पंगुलीलाच ॥ ५७ ॥

झाले चित्रचि पाहुनि पौरांचे वाटसुर थवे गा ! तें; ।
देती मुनिच्या धाकें राजपथीं वाट सुरथवेगातें ॥ ५८ ॥

लोकांनां वाराया ( आंवरून धरण्यास ) नाकावर अंगुली ( बोट ) ठेवीं ( ठेविलें ) म्हणजे पर्यायानें त्यांस चूप बसावयास सांगितलें व लोकांनीं पंगूची वृत्ति धरिली. वाटसरू लोकांनीं चित्राप्रमाणें स्तब्ध होऊन वेगानें जाणाऱ्या रथाला वाट दिली. तरी रुक्मिणी वाटेंत पतन पावली. दुर्वास रागावला,

तो मुनि कोपोनि म्हणे, तरते सिंधूंत जे नदा भणगा ।
दुस्तर म्हणति, तयांचें हृदय सदुपदेश जेन दाभण गा ? ॥ ६२ ॥

स्खलन समीं राजपथीं पावतसे बायको समजला हे ।
आशय; आली घेऊनि एक तऱ्ही काय कोस मजला हे ? ॥ ६३ ॥

जे सिंधूंत ( समुद्रांत ) तरते ( तरून जाण्यास समर्थ असतात ते भणगा(शूद्र)नदा(ओढयाला)दुस्तर म्हणतात. त्यांचें हृदय व त्यांस केलेला सदुपदेश यांस अनुक्रमें जेन ( बुर्णुस ) व दाभण गा (म्हणा.) यांचें हृदय कसें आहे तर बुर्णुसासारखें आहे. त्यांस केलेला उपदेश कसा आहे तर दाभणासारखा आहे. बुर्णुसाला दाभण बोंचला तर भोंक पडतें; पण तो बाहेर काढतांक्षणींच पूर्वस्थिति त्याला प्राप्त होते. तद्‌वत् यांच्या हृदयावर सदुपदेश अपरिणाम-कारक होतो.

भीष्मनिर्याणाच्या प्रसंगाचें वर्णन जितकें भागवत-कारांचें आहे तितकें व्यासांचें सरस नाहीं.

( पहा भागवत स्कं. १ अ. ९ )
श्लोक ३२-४२

भीष्मांनीं कृष्णाचें नामस्मरण केलें. त्याबद्दल पंतांनीं कांहीं आर्या घातल्या आहेत, त्यांत एक अशी आहे.

हा घेतो जेणें तव नाम, पर मुख न वासु देवातें
मागेन भजन सोडुनि, दुसरें तुज सुख न वासुदेवातें ॥ ३८ ॥
( अनु. अ. ८ )

हा भीष्म जेणें ज्या मुखानें तुझें नाम घेतो तें मुख परा ( दुसऱ्या ) देवापुढें न वासु ( वासलें जावो ). तुज वासुदेवाचें भजन सोडून दुसरें सुख मी न मागेन. यांत भक्तिरस सरळपणें साधला आहे. हें पर्व रावबण्याबद्दल सज्जनांचे आभार मानून तें पंतांनीं पुरें केलें आहे.

## अश्वमेध पर्व

अभिमन्यूच्या विरहानें हस्तिनापुरांत कोणाला शान्ति वाटेना. " त्यांतून उत्तरा बहु दिवस जेवली नाहीं. म्हणून फारच करुणस्थिति उद्भवली. तिचा गर्भ जिरूं लागला. " एवढें वर्णन व्यासांनीं दोन श्लोकांत आणलें आहे. त्याविषयीं दोन आर्या पंतांनीं घातल्या आहेत, त्या हृदयद्रावक आहेत.

सर्वांत उत्तरा बहुशोकार्ता सुबहुदिवस जेवीना ।
ठेवीना गर्भीही दृष्टिस ती, नीट जंळहि सेवीना ॥८॥
शोकें, जागरणें, उपवासें घडला जसा चिरायास ।
पोटांत गर्भ हळु हळु तत्तापें लागला जिरायास ॥९॥
(अश्वमे. अ. ४)

पुढें उत्तरा प्रसूत झाली. सुत झाला पण तो सजीव नव्हता. कुन्ती कृष्णाला म्हणाली आम्हांला सर्वांना वांचीव. उत्तरेविषयीं केलेल्या विनंतीविषयीं पंत म्हणतात

आधींच उत्तरा बहु विकळा चित्तीं, स्मरोनि चप लाक्षा;।
वांचेल पुत्रशोकीं हे, तरि दहनीं करूनितप लाक्षा ॥१३॥

भावार्थ, उत्तरा या पुत्रशोकांतून वांचणार नाहीं असें नाहीं. वांचेल, जर तप करून लाक्षा ( लाख ) अग्नींत जळून जाणार नाहीं तर. येथें असंभावना अलंकार योजून पंतांनीं उत्तरेविषयींची कुन्तीच्या मनांतील काळजी मार्मिकपणानें वर्णन केली आहे. यमक साधलें आहे, तें निराळें.

सुभद्रा मात्र अगदीं निकरावर येऊन म्हणाली

अभिमन्योः सुतोवीर न संजीवति यद्ययम् ।
जीवति त्वयि दुर्धर्ष किं करिष्याम्यहं त्वया ॥ १४॥
( म. अश्वमे. अ. ६७ ॥

उठवुनि पौत्रातें जरि न सुखविसिल वृष्णिनायका ! मातें ।
व्हावास तरी कशास भ्राता, येशील काय कामातें ? ॥ ४१ ॥
(अश्वमेध अ. ४)

येथें व्यासाची सफाई पंतांनीं कायम ठेवली आहे.

कृष्ण नंतर जन्मवेश्माकडे निघाले. जन्मवेश्माचें वर्णन करण्यांत व्यासांनीं पांच श्लोक लाविले आहेत. तें पंतांनीं संक्षिप्त करून एका आर्येंत आणलें आहे. तरी प्रसूतिगृहाची यथाशास्त्र रचना व तिचें पवित्र, मंगल पण गंभीर स्वरूप जसेंच्या तसें कायम राहिलें आहे.

वृद्धांगना चिकित्सक, सित माल्यें, दीप, कलश जलपूर्ण ।
प्रभु " साधु साधु " बोले पाहुनि त्या सूतिका गृहीं तूर्ण ॥ ४७ ॥

आहे. ती उचित म्हणून पंतांनीं राखली आहे.आपलेंच घोडें पुढें दामटण्याची हौस पंतांनां नव्हती असें असल्या अनेक उदाहरणांवरून दाखवितां येईल. मुळांत अश्रू आंवरून असें पुढें आहे. तेथें " निर्भर नयनांत नीर आणोनी " म्हणजे खूपसें रडून पुढें बोलण्यास घसा साफ केला, असें पंतांनीं म्हटलें आहे. शिवाय या शब्दसमुच्चयातील मृदु अक्षरें ओळीला माधुर्य आणीत आहेत. ४९ व्या आर्येत उत्तरा म्हणते 'प्रभुजी ! मला सुत झाला तो सजीव नाहीं ऐसें ऐकून उमा ही आपला पति जो शंकर तो सदैव आपलें वचन पाळतो, तसा रमेचा पति कृष्ण पाळीत नाहीं. उदाहरणार्थ, तुझ्या उपजत मेलेल्या पुत्रास उठवीन हें जें तुम्हीं वचन दिलें होतें तें अद्यापि पुरें केलेलें नाहीं, म्हणून तिला ( रमेला ) लाजेनें खालीं दृष्टि लावावयाला भाग पाडील.' हें उपालंभपूर्वक भाषण मुळांत नाहीं. ५० व्या आर्येच्या पहिल्या चरणास मुळात आधार नाहीं. दुसऱ्या चरणातील उत्प्रेक्षा पंताची आहे. ५१ वी आर्या मुळाप्रमाणें आहे. हृषीकेची दिशा फिरवून माझे देहावर ती अन्यत्र लावून दिली असतीत, तर काय झालें असतें तें वृत्त ५२ वी आर्या स्वतंत्र पणें रचून पंत अनुमानानें सांगत आहेत. ५३ व्या आर्येतील " अंकीं रत्न हें न खेळविलें " हे वात्सल्ययुक्त शब्द पंताचे स्वतंत्र आहेत. बाकीची आर्या मुळाप्रमाणें आहे. ५४ ते ५६ आर्या मुळाप्रमाणें आहेत. ५६ व्या आर्येच्या दुसऱ्या चरणातील दृष्टान्त पंताच्या पदरचा आहे. ५७ वी आर्या अर्थचमत्कार दाखवीत आहे. " येईन सह " असें वचन मी चपलाक्षाला ( अभिमन्यूला ) एकान्तांत दिलें त्यावेळेस एक साक्षी होता. कोण तर खोली. ती आता नाही. असती तर ती आपली सर्व खोली ( गांभीर्य ) सोडून मला ' छी ' म्हणती. ही खोलीची व ह्या शब्दावरील श्लेषाची कल्पना पंताची आहे. ५८ व्या आर्येत उत्तरा पुढें म्हणते, " चपलाक्षमति ( अभिमन्यूचें मन ) सुमृदु ( चांगलेंच मऊ ) आहे. तरी काय झालें ? माझें असें अविश्वास्थ वर्तन पाहून ( मी सह आलें नाहीं हें पाहून ) त्यालाहि दुष्ट कोप कां विघडविणार नाहीं ! आता मीं गेलें असें समजा. पण त्याची समजूत कशी घालूं ? " आतां उत्तरेला मूर्च्छा आली. म्हणून इतका वेळ धक् धक् पेटत असलेल्या शोकवह्नि कांहीं काळ शमलासा दिसला. ती सावध होताच तो अधिक वेगानें पेट घेईल हें अपेक्षितच होतें. पण दरम्यानची अवस्था व्यासांनीं फारच हृदयद्रावक रीतीने वर्णन केली आहे.

तां तु दृष्ट्वा निपतितां हतपुत्रपरिच्छदाम् ।
चुक्रोश कुन्ती दुःखार्ता सर्वाश्च भरतस्त्रियः ॥२॥
मुहूर्तमेव राजेन्द्र पाण्डवानां निवेशनम्
अप्रेक्षणीयमभवदार्तस्वननिनादितम् ॥ ३ ॥
( म. आश्वमेधिक. अ. ६९ )

( भावार्थ ) हतपुत्राच्या शोकानें व्याप्त होऊन उत्तरेला मूर्च्छा आलेली पाहून दुःखार्त कुन्ती शोक करूं लागली. तशाच दुसऱ्या भरतस्त्रियाही शोक करूं लागल्या. हे राजा ! एक मुहूर्तपर्यंत तें पाण्डवांचें घर आर्तस्वरानें निनादित झालें, व त्याकडे पाहवेनासें झालें. ६० व ६१ या आर्या व ६२ वीचा पहिला चरण ही मुळाप्रमाणें आहेत, त्यातील ' तूं डोळे उघडून पहा ' ही उत्तरेची विनवणी हृदयाला घरें पाडणारी आहे. ६३ वी आर्या मुळाप्रमाणें आहे. मामाभाच्याचे चेहरे सारखे असण्याचा संभव असतो व या ठिकाणी ते तसे होते. म्हणून उत्तरा म्हणते तुझा बाप कसा होता, हें तुला कळावयाला हवें असेल तर तूं मामाकडे ( कृष्णाकडे ) पहा. हा उत्तरा-विलाप कालिदासकृत अजविलाप व रतिविलाप यांच्या तोडीचा आहे, यांत संशय नाहीं. यांत एकच आर्या दूषित आहे ती ६५ वी होय. तिचा पहिला चरण दुर्बोध आहे. तो समजावयाला कांहीं बाहेरच्या गोष्टींचें ज्ञान असावें लागतें. तें होई तो रसौघ प्रतिहत राहतो. नुसत्या अलंकारांनींही तेथें अडथ-

ळाच होता, तेव्हां असले विलाप जितके अनलंकृत म्हणजे स्वाभाविक भाषेंत स्वभावोक्तीला धरून असतील, तितके ते अधिक प्रशस्त होत.

युद्धांत घडलेल्या हत्येच्या पापाचें निरसन होण्या-करतां धर्मानें अश्वमेध केला. अर्जुन अश्व घेऊन पर्यटणास निघाला. वाटेंत मणिपूर लागलें. तेथील राजा बभ्रुवाहन हा उलुपीनामक नागकन्येचा अर्जुना-पासून झालेला मुलगा होता. तात येतो, असें समज-तांच तो अश्वास पकडून युद्धास उभा न राहतां विनयानें सामाकरितां अर्जुनापुढें उभा राहिला. तेव्हां तें अर्जुनाला न आवडून तो म्हणाला—

भेटसि भीरु स्त्रीसा; करिसी, जोडूनि हात सामातें।
परकृत अपमान जसा, स्वत्कृत बहुमान हा तसा मातें ॥ ४८ ॥

आयुध धरूनि आलों? किंवा मी करूनि आयुध-न्यास?
वद, रे! रुचे यशस्कर? कीं अयशस्करहि आयु-धन्यास? ॥

या समयीं साडावे शर, तें न करुनि, जोडिसी हात ॥ ४९ ॥

घात यशाचा केला, होइन कैसा प्रसन्न मी तात! ॥ ५० ॥

(अश्वमेध अ. ५)

४८ व ४९ या आर्येंतील पहिले चरण मुळाप्रमाणें आहेत. दुसरे पंतांचें स्वतंत्र आहेत. ते यमकाकरतां घातलेले आहेत. तूं केलेला बहुमान हा माझा मान नसून शत्रूनें केलेल्या अपमानाप्रमाणें आहे. हा विरोधाभास अलंकार सुन्दर आहे. ४९व्या आर्येंतील दुसऱ्या चरणांत प्रश्न विचारून वाचकाकडून पंतांनीं आपलें तेंच निश्चित मत काढून घेऊन प्रश्नालंकार साधला आहे. तोच अलंकार पुन्हां पन्नासाव्या आर्येंत आहे.

पुढें बभ्रुवाहनानें आपला पराक्रम दाखविला. याला यज्ञाचें निमंत्रण देऊन अर्जुन पुढें गेला.

इकडे यज्ञाचें काम सुरू होतेंच, ब्राह्मणभोजनें सारखीं चालू होतीं. त्यांच्या मोजदादीविषयीं व्यासांनीं एक सुरेख श्लोक रचिला आहे.

पूर्णे शतसहस्रेतु विप्राणां तत्र भुञ्जताम्।
दुन्दुभिर्मेघनिर्घोषो मुहुर्मुहुरताड्यत ॥ ३६ ॥

(म. अश्व. अ. ८६)

याच्याबद्दल पंतांनीं दोन आर्या घातल्या आहेत.

लक्षब्राह्मणभोजन होतां, सांगुनि निराप धाडावा,
तेव्हांचि वादकानें गुरुदुंदुभि एकवार ताडावा ११
केली मर्यादा त्या यज्ञीं जनमेजया! नरवरा! हे।
होतां द्विजभोजनभर, दुंदुभिचा तोहि पळ न रव राहे ॥ १२ ॥

(अश्वमेध अ. ६)

यात अतिशयोक्तिमिश्रित ऋद्धिचरितें वर्णन कर-णारा उदात्त अलंकार साधला आहे.

कृष्णानें धर्माला कळविलें कीं अर्जुनाकडून निरोप आला आहे. तेव्हां धर्म म्हणाला "काय तो मला कळवा." इतकाच अर्थ मुळांत आहे. त्याचा विस्तार यमकाकरतां पंतांनीं चांगला केला आहे.

हर्पे धर्म म्हणे बा सांग मज निरोप काय वत्साचा।
प्रिय आत्मवत् सखा तव मजला, मी जाण काय-वत् साचा ॥ १५ ॥

अर्जुन माझा प्राणच आहे, असें धर्मानें पर्यायानें सांगितलें आहे.

अर्जुनाची स्वारी विजय मिळवून परत आली तेव्हां जो लोकांस हर्ष झाला त्याचें पंतांनीं एका स्वतंत्र आर्येंत वर्णन केलें आहे, तें असें—

दुसरे दिवशीं येतां भगवत्सख, साहुकार यादवही
पौरस्त्रिया अलंकृति विसरति, ते आपणास यादवही २८॥

धर्मराजाचा हा यज्ञ फार मोठ्या प्रमाणावर केलेला होता. व्यास म्हणतात.

एवं बभूव यज्ञः स धर्मराजस्य धीमतः
बह्वन्नधनरत्नौघः सुरामैरेयसागरः ॥ ३९ ॥

सर्पिःपङ्का ऱ्हदा यत्र बभूवुश्चान्नपर्वताः ।
रसालाकर्दमा नद्यो बभूवुर्भरतर्षभ ॥ ४०
भक्ष्यखाण्डवरागाणां क्रियतां भुज्यतां तथा ।
पशूनां वध्यतां चैव नान्तं ददृशिरे जनाः ४१
( म. अश्व.अ. ८९ )

त्यांत धनाचे व रत्नांचे ढीग पडले होते; सुरेचे सागर होते; तुपाचीं तर तळीं तुंबलीं होतीं; अन्नांचे पर्वत होते, नद्या तर रसांनीं वाहत होत्या, व पशु-वधाचा जनांला अंत दिसला नाहीं. हें वर्णन पंतांनीं सोडलें आहे. पण आहूत जनांचा आदर कसा झाला तें थोडक्या आधारावरून पंतांनीं चांगलें वर्णिलें आहे.

माता जसि कन्येतें, ती जनता, धर्म बोळवी तीतें
बहु हितकर भूतादर सन्मतितें जेंवि बोळ वीतीतें ॥७७

भावार्थः—माता जशी कन्येची बोळवणी (पाठवणी) सासरीं जातांना मायेनें करते तशी धर्मानें बोळवणी केली. त्याची मति शुद्ध होती म्हणून प्राणिमात्रा-विषयीं त्याला वाटत असलेला आदर त्याना हितावह झाला, जसा बोळ ( औषधविशेष ) बाळंतिणीला हितप्रद असतो तसा.

इतकी सामग्री व इतकें अगम्य असूनहि या धर्म-राजाच्या यज्ञाला दोष देणारें पण ज्ञानधर्माचें खरें तत्त्व सांगणारें या पर्वांत एक नकुलाख्यान आहे त्याचा उल्लेख केल्याशिवाय हें पर्व पुरें होणार नाहीं. धर्मराजावर त्याच्या औदार्याबद्दल सर्वतः पुष्पवृष्टि होत असतां तेथें एक मुंगूस येऊन मनुष्यवाणीनें म्हणालें " राजे हो ! हा यज्ञ कांहीं सक्थुप्रस्थ यज्ञाच्या बरोबरीचा नाहीं. " " तो कसा ? " असें विचारतांच मुंगूस म्हणालें.

होता कपोतवृत्ति स्त्रीपुत्रवधूसवें कुरुक्षेत्रीं
त्या सकुटुंबाचे असु दुष्काळीं सर्व राहिले नेत्रीं ॥७॥
( अश्वमेध अ. ७ )

ही आर्या मुळाप्रमाणें आहे. कपोताप्रमाणें शेता बाहेर पडलेला एकएक दाणा टिपून प्राणयात्रा करणारें हें कुटुंब उंछवृत्तीनें कुरुक्षेत्रीं राहतसे. दुष्काळीं ही वृत्तिहि चालत नाहींशी झाली. कसाबसा निर्वाह करीत असतां एक दिवस एक क्षुधार्थ अतिथि आला. त्याची क्षुधा शमविण्यास सर्वांनीं आपआपला भाग त्याला अर्पण केला. या पुण्याईनें तें कुटुंब मुक्त झालें. तें जाणून मीही बिळांतून निघून तेथें गेलों, तेव्हां सक्तुगंधानें,तेथील सलिलस्पर्शानें,ब्राह्मणाच्या तपानें, माझें मस्तक व अर्धें शरीर सुवर्णमय झालें. आतां शेष शरीर सुवर्णमय होईल, या आशेनें धर्माच्या यज्ञाची वार्ता ऐकून येथें आलों; पण माझें शरीर सुवर्णमय झालें नाहीं. म्हणून या यज्ञाला सक्थुप्रस्थ यज्ञाची सर नाहीं." यांतील तात्पर्य असें आहे कीं दानाचें द्रव्य न्यायलब्ध पाहिजे (लूट करून आणलेलें नको ). भूतदया धारण केली पाहिजे ( पशुहत्या नको ). सत्यधृतिक्षमा तप इ० सनातन धर्माचीं मूळ-तत्वें मुंगुसाच्या तोंडीं घातलेलीं आहेत.

नित्याप्रमाणें या पर्वाची समाप्ति तें रामपदीं अर्पण करून पंतांनीं केली आहे.

## आश्रमवासिक पर्व

पाण्डव, विशेषतः धर्मराज व पाण्डवस्त्रिया यांनीं धृतराष्ट्र व गान्धारी यांस कसें वागविलें तें सांगताना पंतांनीं जे यमकाकरतां अलंकार योजिले आहेत, त्यांनीं मुळांतील करुणरस वाढविला आहे. पाण्डवस्त्रियांनीं या सासूसासऱ्यांशीं समवृत्ति दाखविली असें मुळांत आहे. त्याविषयीं पंत म्हणतात.

गांधारीची होय व्यवहारीं दृक् , पडों न दे गुंती
तीस गमे स्व च्छाया, स्वच्छा यापरि भजे सदा कुंती ॥ ५ ॥
( आ. अ. १ )

" गान्धारीची दृष्टि पंतांनीं व्यवहारांत इतकी गुंतवली आहे कीं ती कोणतीच अडचण पडूं देत नसे." याला मुळांत आधार नाहीं. मोठेंसे यमक साधण्याकरतां तिचें चित्र पंतांनीं असें रंगविलें म्हणावें तर यमक एकाक्षरीच आहे. 'पण कुन्तीचें चित्र याहून सुन्दर काढलेलें आहे. पंत म्हणतात ती

स्वच्छ पुण्यशील कुन्ती छायेप्रमाणें गान्धारीला अनुसरली. तसेंच सुभद्रेविषयीं पंत म्हणतात,

प्रभुची अनुजाहि जपे श्वश्रूच्या सर्व काळ सेवेला।
की फळपात्र नव्हे कर जो सिंचायासि आळसे
वेला ॥ ७ ॥

येथें सुभद्रा सासूला जपली कां याला जें कारण पतांनीं दिलें आहे कीं जो कर वेलाला सिंचावयासीं आळसे ( आळस करितो ) तो फळपात्र ( फळ चाखावयास योग्य ) नव्हे. यांतून असा ध्वनि निघतो कीं सुभद्रेची सेवा सहेतुक होती. यानें तिची सेवापरायणता सदोष होते. या वृद्ध हतपुत्र जोडप्याची सेवा धर्मादिकांनीं जी चालविली होती, ती त्याच्या करूण स्थितीकडे लक्ष देऊन चालविली होती. त्यांत स्वार्थ नव्हता. धर्माचा स्वतांचा जो हेतु होता तो पंतानीं स्वतंत्रपणें वर्णन केला आहे, व तो निर्दोष आहे.

सर्वांते धर्म म्हणे, पहिली जी नीट वाट वाहो ती।
स्वश्री " आहेच " असें या रायाला न वाटवा
" होती " ॥ ९ ॥

धर्मानें सर्वांना बजाविलें कीं धृतराष्ट्र राज्यारूढ असतां त्याचा जसा मान होता तसाच आतां ठेवा. पूर्वीची धडक वहिवाट चालू असूं द्या. राज्यश्री अजून आहे असें त्याला वाटूं द्या. " होती " असें त्याला न वाटवा. ज्या आपत्तींत धृतराष्ट्र पडला होता, तींत पडलेल्या मनुष्याशीं धर्मासारखा भला मनुष्य असेंच वागता. पंतांच्या या पर्वांत एक विशेष आढळतो तो असा कीं व्यासांचा काव्यौघ व पंतांचा काव्यौघ मिसळून एका पथानें वाहत आहेत असें वाटतें. पंतांचा निराळा असें ओळखण्यास त्यांचें यमकच उपयोगी पडतें. उदाहरणार्थ, अप्रकाशितपणें भीमानें धृतराष्ट्राला लागून बोलावयाचा क्रम ठेविला होता. तें त्याला सहन न होऊन धृतराष्ट्र वनांत जावयास निघाला, तेव्हां धर्म म्हणाला--

**व्यास**

भवान् पिता, भवान्माता, भवान्नः परमो गुरुः ।
भवता विप्रहीणा वै क्वनु तिष्ठामहे वयम् ॥ ४६ ॥
( म. आश्रम. अ ३ )

**पंत**

तूं आमचा पिता, तूं माता, तूं परम गुरु, अगा,
राया !
कोठें कसें वसावें ? त्वां जातां, त्यजुनियां अगार
या ॥ ५८ ॥
( आश्रम. अ. १ )

या दोन्ही कवनांत भाषेच्या दृष्टीनें एक संस्कृतांत रचलेलें, एक मराठींत रचलेले या दृष्टीनें द्वैत असून अर्थाच्या दृष्टीनें पूर्ण अद्वैत आहे. पंतांचें अनन्यभोज्य यमक तेवढें दोघांतील पृथक्पणा दाखवीत आहे. पुढें धर्म म्हणाला " मी अनुज्ञा देणारा कोण ?"

**व्यास**

नाहं राजा, भवान् राजा, भवतः परवानहम् ।
कथं गुरुं त्वां धर्मज्ञमनुज्ञातुमिहोत्सहे ॥ ४९ ॥

**पंत**

राजा तूं, मी सेवक, वद आहें की अधीन मी
नाहीं ? ।
दासें धन्यास आज्ञा दिधली डोहा कधीं न मी-
नाहीं ॥ ६१ ॥

वरप्रमाणें या आर्येंत यमक व पंतांनीं दिलेला या आर्येच्या दुसऱ्या ओळींतील स्वतंत्र दृष्टान्त हीं दोन पृथक्पणा दाखवीत आहेत.

धर्माच्या या अभिजात विनयानें तर धृतराष्ट्र अगदीं कोसळून गेला. बोलण्याचेंही श्रम त्याला सोसतना.

**व्यास**

ग्लायते मे मनो हीदं मुखं च परिशुष्यति ।
वयसा च प्रकृष्टेन वाग्व्यायामेन चैवह ॥६०॥
इत्युक्त्वा स तु धर्मात्मा वृद्धो राजा कुरूद्वहः ।
गान्धारीं शिश्रिये धीमान् सहसैव गतासुवत् ॥६१

### पंत

वाग्व्यायामें या, बहुवृद्धपणें, न वदवे; वदन सुकलें !
झालें म्लान मन, जसें वृकविपिनामाजि वांसरूं चुकलें
॥ ७३ ॥

ऐसें बोलुनि, आश्रय गान्धारीचा करी बहु श्रमला ।
नृप राहिला उगाचि, प्राणरहितसाचि तेधवां गमला
॥ ७४ ॥

७३ व्या आर्येत तर पंतांनीं व्यासांचा वाग्व्यायाम हा शब्द तसाच ठेवला आहे. त्या आर्येच्या दुसऱ्या चरणाच्या शेवटीं जी लहानशी उपमा दिली आहे, तीच तेवढी पृथक्पणा दाखवीत आहे.

धर्मानें व्यासाच्या उपदेशानें तपोवनांत जावयास संमति देताच धृतराष्ट्र उत्साहानें उठला पण अशक्तपणामुळें त्याचें शरीर तितक्याच उत्साहानें अनुसरलें नाहीं.

### व्यास

मन्दप्राणगतिर्धीमान् कृच्छ्रादिव समुद्वहन् ।
पदातिः स महीपालो जीर्णो गजपतिर्यथा ॥ २ ॥
( म. आश्रम.अ. ५ )

### पंत

आज्ञा युधिष्ठिरानें देतांचि तपोवनासि जायास ।
उठला विप्र विवाहा जाणों,पावुनि धना,सजायास ॥१९
जातां गृहात मार्गीं करि जीर्णकरींद्रसा पदन्यास
जें सुख, जें दुःख तया, आलेंचि नसेल तें तदन्यास
( आश्रम अ. २ ) ॥ २०

या भाषांतरांतील पृथक्पणा दाखविणारी १९व्या आर्येत एक उपमा आहे. ती पंतांची स्वतंत्र आहे. दरिद्री ब्राह्मणांच्या लग्नाला द्रव्यसाहाय्य करणें हा एक दानधर्माचा प्रशस्त प्रकार समजला जात असे. पण तेंही अडचणीचें असे. म्हणून मुख्य अडचण जी द्रव्याची ती दूर होतांच ब्राह्मण जसा उत्साहानें लग्नांतील सजण्याचा थाटमाट करावयास उठतो तसा धृतराष्ट्र तपोवनास जावयास संमति मिळतांच उत्साहानें उठला. ही उपमा उचित असून कसरत करणाऱ्या इसमानें घेतलेल्या अनपेक्षित उडीप्रमाणें सुखकारक आहे. वनास जातेवेळेस धृतराष्ट्रानें धर्माला उपदेश केला त्याकडे व्यासांनीं दोनतीन अध्याय ( ५ ते ७ ) लावले आहेत. त्याकडे पंतांनी ५ आर्या लावल्या आहेत त्या मुळावरूनच वांचण्यासारख्या आहेत.

त्यांतील नमुन्याला एक दिली आहे. तींत संक्षेपाची कुशलता चांगली दिसून येत आहे.

आत्मा संरक्षावा, मंत्र करावा नृपोत्तमा ! गूढ !
सुज्ञ पुरुष एकहि बहु राजा ! न बरे सहस्रही मूढ॥२५

प्रजेचा निरोप घेतांना धृतराष्ट्र म्हणाला "अरण्यगमनबुद्धि" मला झाली आहे. एवढ्या मुळाच्या आधारावर पंतांनीं धृतराष्ट्राच्या इच्छेची तीव्रता वर्णन केली आहे. पंत म्हणतात.—

जें आप्त हो ! वदत असें हें माझें वचन
आयकोनि करा; ।
आली मति वनिं जाया, माहेरीं जेविं बायको
निकरा ! ॥ ३८ ॥

दुसऱ्या ओळींतील माहेरीं जावयास निकरावर आलेल्या बायकोची उपमा अगदीं स्त्रीस्वभावोक्त आहे. पंतांचें स्त्रियांच्या स्वभावाचें निरीक्षण परिपूर्ण होतें. असें ही व इतर जागोजाग दाखवून दिलेल्या उपमा सिद्ध करतात.

"कां अरण्यांत जातों" याचें कारण धृतराष्ट्रानें फारच करुणवाणीनें सांगितलें आहे.

### व्यास

शान्तोऽस्मि वयसाऽनेन तथा पुत्रविनाकृतः ।
उपवासकृशश्चास्मि गान्धारीसहितोऽनघाः ॥ २० ॥
× × ×
ऋते वनं महाभागास्तस्मान् माऽनुज्ञातुमर्हथ ॥२२॥
(म. आश्रम. अ. ८)

### पंत

आहें सुतविरहाकुळ, उपवासक्षीण, या वयें श्रान्त ।
भ्रांत नसें झालों जों, तों मी पाहीन आपुला
प्रान्त ॥ ४२ ॥
( आश्रम. अ. २ )

व्यासांनीं धृतराष्ट्राच्या करुणस्थितीचें काढावयास घेतलेलें चित्र " अशा स्थितींत मला भ्रम झाला नाहीं तोंच माझें योग्य स्थळ जें तपोवन तें गांठूं द्या " असें धृतराष्ट्राच्या तोंडीं घालून पंतांनीं पुरें केलें. या वाक्याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. सर्वांच्या मनांत पूर्ण सहानुभूति उत्पन्न झाली. ती इतकी कीं कोणाला बोलवेना, सर्वांना गहिंवर आला.

**व्यास**

तस्य तद्वचनं श्रुत्वा सर्वे ते कुरुजांगलाः।
बाष्पसंदिग्धया वाचा रुरुदुर्भरतर्षभ ॥ २३ ॥
( म. आश्रम. अ. ८ )

**पंत**

ऐसें आज्ञे करितां बहु विनयें विनविलें महिवरानें।
कोणी किमपि न देती उत्तर बहु दाटले गहिं—
वरानें ॥ ४७ ॥
( आश्रम अ. २ )

पुन्हां धृतराष्ट्र अंजलि जोडून बोलूं लागला; त्यावर यमकाकरतां एक स्वानुभविक तत्त्व धृतराष्ट्राच्या तोंडीं पंतांनीं घातलें आहे.

अपराध सर्व माझा, यास्तव केला तुम्हांस अंजलि
हो।
वंध्यत्व लिहो भाळीं विधिचें, कदपत्य न, करकंज
लिहो ॥ ५३ ॥

विधीच्या करकमलानें कोणाच्याही भाळीं वंध्यत्व लिहिलेलें पतकरेल, पण कदपत्यत्व लिहिलेलें पतकरणार नाहीं !!!

वनांत जाण्यापूर्वी आप्तेष्टांचें श्राद्धकर्म करावें, असें धृतराष्ट्रानें मनांत घेऊन त्यापुरेसें द्रव्य पाण्डवांजवळून मागून घे असें विदुरास विनविलें.विदुर म्हणाला, कालविपर्यय मनांत घेतां द्रव्य देणें उचित आहे. भीम विरुद्ध होता. त्याची समजूत घालण्यास अर्जुन म्हणाला—

**व्यास**

न स्मरन्त्यपराद्धानि स्मरन्ति सुकृतान्यपि ॥ २ ॥
( म, आश्रम,अ. १२ )

**पंत**

विसरति अपकारांतें उपकारांतेंचि साधु आठ-
विती।
बा ! सोसितां न सा विति होय वपु, न सोसितां
न आठ विती ॥ १०८ ॥
( अ. २ )

यांत पर्यायोक्त अलंकार चांगला साधला आहे. व्यासांची ओळ पंत स्पष्ट करून सांगतांना म्हणतात, अपराध सोसलास तर तुझा सात वितींचा ( साडेतीन हात देह ) झिजून सा (सहा)विती होणार नाहीं. बरें न सोसलास तर वाढून सातांचा आठ विती होणार नाहीं. यमकाकरतां पंतांनीं अर्थाला फारच गोडी आणली आहे.

धृतराष्ट्र, गान्धारी, कुन्ती व विदुर हीं तपोवनांत गेल्यावर धर्मादिकांना चैन पडत नाहींसें झालें, त्यांना भेटावयास पाण्डव तिकडेच गेले. तेथील मण्डळींत विदुर दिसला नाहीं. तेव्हां विदुर कोठें आहे ? तो कुशल आहे ना ? असें धर्मानें धृतराष्ट्राला विचारिलें, तो 'अनशनव्रत व घोर तप करतो' असें धृतराष्ट्रानें सांगितलें. एवढयाच मुळावर पंतांनी दोन आर्या रचिल्या आहेत.

भूप म्हणे कुशल असे विदुर, वनीं तापमासिं आढळतो।
घोर तप अनशनव्रत करितो, बहु ज्यांत करुनि
'आ' ढळतो ॥ ३८
कविस रुचे घालावें विषयसुख,करुनि घोर तप डावें।
मूढासि आवडे बहु, जेउनि सस्त्रीक घोरत पडावें!॥३९
( आ. अश्रम अ.४ )

३८ वी आर्या मुळास धरून आहे. शेवटल्या चरणार्धांत पंतांनीं स्वतंत्रपणें अनशनव्रत किती कठीण आहे तें वर्णिलें आहे. पंत म्हणतात " बहुजन ( बहुतेक लोक तें व्रत करूं लागले म्हणजे " आ " वासून त्या व्रतापासून ढळतात—च्युत होतात. ३९ वी आर्या अगदीं स्वतंत्र आहे. अमर होण्यास योग्य आहे. पंत म्हणतात, घोर तप करून विषयसुख डावें घालावें ( बाजूला सारावें. ) अशी कृति कविस

( सुज्ञ मनुष्याला ) रुचे ( आवडते ) त्याच्या उलट विषयसुखांतच सस्त्रीक घारत पडावें, ही कृति मूर्खाला फार आवडते. यांत अप्रस्तुतप्रशंसा अलंकार चांगला साधला आहे.

पुढें व्यासानीं सर्वांस दर्शन दिलें. तेव्हां आपल्या मनाला शान्ति कशी नाहीं, तें धृतराष्ट्रानें व्यासांना सांगितलें. तिकडे व्यासांनीं दहा श्लोक लाविले आहेत. पंतांनीं पांच आर्या लाविल्या आहेत. त्यांतील एक अशी आहे.

मारविले बहु, पडलें मंदिर कोणा न ओस रायाचें ?।
जन्मांतरींहि हें या न मनांतुनि दुःख ओसरायाचें॥२४
( आश्रम. अ. ५ )

संक्षेप हाच या आर्येची शोभा आहे.

धृतराष्ट्र व गान्धारी मृतपुत्रास पहाण्यास उत्सुक होतीं. उत्तरा मृत पतीस पहावयास उत्सुक होती. कुन्तीनें कर्णाला पहावयाची इच्छा दर्शविली. तिनें कर्णाची जन्मकथा करुणवाणीनें सांगितली. दुर्वासानें दिलेल्या मंत्रानें रवीला आव्हान केल्यावर रवीनें जवळजवळ बळाचा उपयोग कसा केला तें सांगितलें. तेव्हां व्यास तिचें निर्दोषत्व प्रतिपादन करतांना म्हणाले—

सर्वं बलवतां पथ्यं सर्वं बलवतां शुचि ।
सर्वं बलवतां धर्मः सर्वं बलवतां स्वकम् ॥ २४ ॥
( म. आश्रम. अ. ३० )

"यांत बळी तो कान पिळी" अथवा Might is right हें तत्त्व स्पष्ट करून सांगितलें आहे. हा श्लोक पंतांनीं कर्णजन्मकथेबरोबरच सोडून दिला आहे.

नंतर सर्वांस दिव्य दृष्टि देऊन व्यासांनीं मृतवीरांचें दर्शन गंगातीरावर " पटगत चित्रां " प्रमाणें करविलें सर्व मृत पुरुष गेल्यावर धृतराष्ट्रादिक आश्रमांत परत आले. मग धृतराष्ट्रानें धर्मादिकांस परत जावयास सांगितलें. निरोप घेतांना सर्वांचा जीव कळवळला. हें सर्व वर्णन सरस आहे. मासल्याकरतां एक आर्या दिली आहे.

सोडी गळा पृथेचा धेनूची धरुनि जेंवि सास्ना न।
भिजला अश्रुभरानें केला गंगेंत तो जसा स्नान
॥ ६२ ॥
( आश्रम. अ. ६ )

व्यासांनीं वत्स शब्द साधारणतः सर्वांसच लावला आहे. तो पंतांनीं फक्त येथें नकुळासच लावलेला आहे. परत आल्यावर धर्माच्या मनाची स्थिति कशी काय झाली तिचें वर्णन पंतांनीं स्वतंत्रपणें सरस प्रकारें वर्णिलें आहे.

आला पुरासि देहें, परि चित्तें आश्रमींच तो वसला
नृप, बद्धवत्स गोष्टीं, नगरीं सिंहासनीं तसा बसला
॥ ६६ ॥

पुढें दोन वर्षें गेल्यावर नानादेशांत पर्यटन करणारा नारदमुनि प्राप्त झाला. धर्मानें विचारल्यावरून धृतराष्ट्रादिकांचें वृत्त कळवितांना नारद म्हणाला, "ही सर्वमण्डळी व्रतनियमांनीं हालचाल करण्यास अशक्त झाल्यावर गंगातीरीं असतांच एकदां अग्नि पेटला व वायूनें तो पसरविला ! त्यांनीं पळून जीव वाचविण्याची आज्ञा संजयास केली, व स्वतां इंद्रियनिग्रह करून अग्निसन्मुख बसून त्यांत काष्ठाप्रमाणें जळून गेलीं. तें ऐकून वाड्यांत व पुरांत हलकल्लोळ झाला.

ऐसें ऐकुनि सांतःपुरपाण्डव शोकसागरीं पडले; ।
परम प्रबुद्ध परि ते सर्वहि चिरकाळ बाळसे रडले॥२५

धर्मानें फार शोक केला.

होय व्याकुळ जळतां, सर्वस्व वह्नी मनांत साव जसा ।
धर्म म्हणे हा ! हा ! प्रभु व्यर्थ जळाला वनांत
सावजसा. ॥ २६

केला भस्म पृथेचा देह वनीं वाळला जसा पाला; ।
तुजहि नसे ! जसि होतां दुग्धप्रदकाळ लाज सापाला॥२८
विजया ! जो वांचविला तोचि तुझी माय खाय हा
कशि रे ।
सहदेवा ! तव कानीं कां नीट निघुनि तिची न
हांक शिरे ! ॥ ३०

भीमा! दहनार्सि दिलें कैसें होउनि सहाय बळ वातें ?।
नकुळा ! दैवत कोठें, ज्याला जाया स्वदुःख कळवा तें ?। ३१

गांधारी प्रेतांहीं वंध्या झाली असोनि हीनांही,।
कुन्तीस पांच पण्डित, पुत्र परम पटु, असोनिही नाहीं ! ॥ ३२॥

वेंचिति रक्त स्तन्यें, काळजिनें व्यर्थ बायका मास।
सुज्ञ समर्थ असोनिहि, आलों आम्हींच काय कामास ?॥ ३३ ॥

मज हेंचि दुःख वाटे, या यावज्जीव पूजिलें दहना !
तोहि न कामा आला; हा कर्मा ! गति तुझी महागहना ! ॥ ३४ ॥

मुळांत धृतराष्ट्र नागायुतबल असून अग्नींत जळाला"व

यं पुरा पर्यवीजन्त तालवृन्तैर्वरस्त्रियः।
तं गृध्राः पर्यवीजन्त दावाग्निपरिकालितम् ॥ ४ ॥
सूतमागधसंघैश्च शयानो यः प्रबोध्यते।
धरण्यां स नृपः शेते पापस्य ममकर्मभिः ॥ ५ ॥
म. आश्रम. अ. ३८

इत्यादि धृतराष्ट्रविषयक धर्माचा व्यासनिर्मित शोक रसभरित असून पंतांनीं त्यास फांटा देऊन त्याबद्दल एक स्वतंत्र आर्या ( २६ वी ) घातली आहे. तीही रसपोषक आहे. तींतील यमक व सावकाराच्या वहीची व अशरणपणें वणव्यांत जळालेल्या सावजाची, अशा दोन उपमा दावदग्ध धृतराष्ट्राला दिलेल्या मनोवेधक आहेत. हतपुत्र गान्धारी विषयीं शोक करीत नाहीं. असें मुळांत आहे; परंतु तिचे पुत्र हीन ( दुष्ट ) निघाले म्हणून ती शतपुत्र असून वंध्या झाली असें सांगणारा ३२ व्या आर्येचा पहिला चरण पंतांचा स्वतंत्र असून सरस वठला आहे. " पण आम्हीं पृथेला उत्तम पांच मुलगे असून काय उपयोग झाला या अर्थाचा त्याच आर्येचा दुसरा चरण फार बहारीचा आहे. त्याचें मूळ असें आहे.

युधिष्ठिरस्य जननी भीमस्य विजयस्य च।
अनाथवत्कथं दग्धा इति मुह्यामि चिन्तयन् ॥ १० ॥
( म. आश्रम. अ. ३८ )

३० व्या आर्येच्या पहिल्या चरणांत अर्जुनानें अग्नीला खाण्डववन क्षुधाशमनार्थ अर्पण केलेलें अग्नि स्मरला नाहीं व कृतघ्नपणें त्याच्या आईलाच भक्षिता झाला, अशी कोटी केली आहे. ती मुळाप्रमाणें आहे. तिची पद्धत उचलून प्रत्येक पाण्डवाविषयीं पंतांनीं धर्माच्या मुखीं एक एक नवीन कोटी घातली आहे. तींत प्रत्येक पाण्डव पराक्रमी असून तो कसा व्यर्थ गेला, हें दाखविलें आहे. ३० व्या आर्येच्या दुसऱ्या चरणांत सहदेवाला उद्देशून धर्म म्हणाला आहे, " तुला पृथेची हांक कशी ऐकावयास आली नाहीं ?" पण तिची हांक ऐकूं येण्याला जें कारण मुळांत दिलें आहे, कीं 'सहदेवः प्रियस्तस्याः पुत्रेभ्योऽधिक एव तु' तें पंतांनीं वगळल्यामुळें हा चरण बुच्चा दिसतो. एकतिसाव्या आर्येतील कोट्या ठीक आहेत. भीम हा वायूचा अंश आहे, तेव्हां भीमा ! वायूनें अग्नीला कशी मदत केली, हा प्रश्न उचितच आहे. त्याच्याप्रमाणें नकुळ हा अश्विनीकुमारांचा अंश असल्यामुळें. 'बा ! तुझें तें दैवत जें वैद्य, ज्यास दुखणें काय तें कळवावें, तें काय झालें ? हाही प्रश्न उचितच आहे. मातेचा महिमा गाणारी आर्या स्वतंत्र असून अमर होण्यास लायक आहे. ३४ वीचा दुसरा चरण मुळाप्रमाणें आहे.

पुढें धर्मानें सर्वांची उदकक्रिया केली.

नित्याप्रमाणें हें पर्व रामपदीं अर्पण केलें आहे.

## मौसलपर्व

भारतीय युद्धांत पंचाल, चेदि, मत्स्यादि सर्व क्षत्रियांचा नाश होऊन धर्माला मही रिती वाटूं लागली. वृष्णिचक्र ( यादव ) तेवढे वासुदेवपरिग्रहानें शिल्लक होते. त्यांवर लक्ष्य देऊन धर्म काल क्रमीत होता.

परंतु तेही यादव नाश पावले. सांब नांवाच्या कृष्णाच्या पुत्राला गर्भवती स्त्रीचें सोंग देऊन हिला कन्या होईल कीं पुत्र होईल, हा प्रश्न त्याला मुनींपुढें उभें करून कांहीं यादवांनीं विचारला. मुनींनीं कपट जाणून त्याला शाप दिला कीं, त्याला मुसळ होईल, व तेंच मुसळ यादवांच्या नाशाला कारण होईल. तें सर्व वृत्त या पर्वांत आल्यामुळें याला मौसल पर्व असें नांव दिलेलें आहे. ही कुचेष्टाप्रियता अद्यापिही इकडील लोकांत दिसून येते. पुरुषाला गर्भारीचें सोंग देऊन नुकत्याच उपजलेल्या बालकाप्रमाणें शब्द काढून पोटांतलें मूल बोलत आहे, असा बहाणा करून व 'सोंग घेणाऱ्याला मिशा कुठून आल्या रे' असें विचारतां त्याही पोटांतील मुलाच्याच आहेत, असें सांगून भीक मागण्याचा धंदा करणारे कुचेष्टेखोर बहुरूपी अजूनही आढळतात.

जनमेजयाच्या सर्पसत्राला कारण मुनीच्या गळ्यांत मृत सर्प अडकवून परीक्षितीनें जी कुचेष्टा केली, ती परीक्षितीस सर्पदंशानें मृत्यु येऊन भोंवली व सर्पास जनमेजयकृत सत्रानें भोंवली. शाप दिल्याप्रमाणें-

दुसरेचि दिनीं सांब प्रसवे बहु घोर मुसल, लाजाया
अण्डाबाहेर विषानळसा वृत्तांत उसळला जाया॥१८॥
(म. मौ. अ. १)

या आर्येतील दुसरा चरण पंतांचा स्वतंत्र आहे. त्यांत यमकाकरितां स्वभावोक्ति अलंकार साधला आहे. तो हा कीं, सांबाला मुसळ झाल्याचा वृत्तांत ब्रह्माण्डाबाहेर जावयास विषारी अग्नीप्रमाणें उसळला. हें वृत्त राजाला कळतांच त्यानें त्याची प्रथम वाट लाविली.

करवूनि उग्रसेनें मुसलाचें सूक्ष्म पिष्टसें चूर्ण ।
निःशेष स्वाप्तकरें टाकविलें दूर सागरीं तूर्ण ॥१९॥

शिवाय कोणींही मद्य पिऊं नये, अशी घोषणा केली. नंतर जिकडेतिकडे उत्पात झाले. त्याची रीति पंतांनीं वर्णिली आहे.

उत्पातरीति परिसा, सुश्रोते हो क्षमा करा लघुशी, ।
आखु श्मश्रुहि खाती, मार्गी खणिती क्षमा कराल
घुशी ॥ २५ ॥

असे उत्पात बरेच झाले. त्यांतील पंतांनीं कांहीं निवडून घेतले.

व्यास—

गुरूंश्चाप्यवमन्यन्ते न तुरामजनार्दनौ ।
पत्न्यः पतीनुच्चरन्त पत्नीश्च पतयस्तथा ॥११॥
नदन्तं पाञ्चजन्यं च वृष्ण्यन्धकनिवेशने ।
समन्तात्पर्यवाशन्त रासभा दारुणस्वराः ॥ १२
( म. मौ. अ. २ )

या दोन श्लोकांबद्दल पंतांनीं एकच आर्या घातली आहे.

परिसोनि पाञ्चजन्यध्वनितें गर्जति पुरींत रासभ जे ।
गुरुस च्छात्र, पतीस स्त्री, स्वस्वामीसही न दास भजे
॥ २७ ॥ ( मो. अ. १ )

येथें असें आढळेल कीं पंतांनीं १७ वा श्लोक आधीं उचलून त्याचा ११ व्या आर्येचा पहिला चरण त्यांनीं बनविला आहे व ११ वा श्लोक नंतर घेऊन त्याचा त्याच आर्येचा दुसरा चरण बनविला आहे व ही उलटापालट करून सुंदर यमक साधलें आहे म्हणून पंतांचें जितकें अर्थावर प्रेम होतें तितकेंच यमकावर होतें असें दिसतें.

कृष्णालाहि हा कालविपर्यय ओळखला.
श्रीकृष्ण म्हणे तेरा दिवसांचा भारतीरणीं पक्ष
आला, तसेंचि आतां वीरांचें संहरील हा लक्ष
॥ ३० ॥

त्याला गान्धारीच्या शापाची आठवण झाली. त्यानें समुद्रतीरावर यात्रेला सर्व यादव जमविले. ते मद्य पिऊन एकमेकांचें उणें काढून युद्ध खेळूं लागले.

लव्हाळे हातांत घेत त्यांचीं मुसळें होत. या प्रकारें सर्व यादवांचा नाश झाला. " यादवी " हा एक देशादेशांत राष्ट्राराष्ट्रांत अपरिहार्य विनाशकाल मधून मधून येणारा असतो असें एक मोठें तत्त्व या पर्वात व्यासांनीं सांगून ठेवलें आहे. तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

यादवांचा नाश झाल्यावर कृष्ण दारुकाला म्हणाला, " हें वृत्त पार्थाला जाऊन कळीव. " एवढ्या मुळावर पंतांची एक सुन्दर आर्या आहे ती ही—

प्रभु दारुकासि सांगे नागपुरीं नाश हा कळिव राजा ! ।
आलें भागा, पञ्नें विष द्यावें, मधु दिलें अलिवरा ज्या ॥ ६७ ॥

दुसऱ्या ओळींतला दृष्टान्त पंतांचा स्वतंत्र आहे व फार सुन्दर आहे. यादवकुळांतील स्त्रियांचें रक्षण कृष्णानें अर्जुनाकडे सोंपविलें व

**व्यास**

मेने ततः संक्रमणस्य कालम् ।
ततश्चकारेन्द्रियसन्निरोधम् ॥
तथाच लोकत्रयपालनार्थम् ।
आत्रेयवाक्यप्रतिपालनाय ॥ २० ॥
देवोऽपि सन् देहविमोक्षहेतो :
निर्णीतमैच्छत् सकलार्थतत्त्ववित् ॥
स सन्निरुद्धेन्द्रियवाङ्मनास्तु ।
शिश्ये महायोगमुपेत्य कृष्णः ॥ २१ ॥
(म. मौ. अ. ४)

**पंत**

शून्य वनीं बसुनि, मनीं अवसानींचा स्वयोग आणूनी ।
निद्रा क्षितिवरि केली, झालें अवतारकृत्य जाणूनी ॥ ८९ ॥
( मौ. अ. १ )

तत्त्वार्थवित् श्रीकृष्णानें देह सोडण्याची तयारी केली, त्यांतील तत्त्व काय तें पंतांनीं फार चोख रीतीनें सांगितलें आहे. तें असें कीं ज्याचें अवतारकार्य संपलें, त्यानें जाण्याची तयारी करावी. हें तत्त्व फार मोठें व अनुभवसिद्ध अशा स्वरूपाचें आहे. मोठमोठ्या अवतारी पुरुषांचें शेवटीं कांहीं चालत नाहींसें होतें, तेव्हां ते म्हणतात, " आम्ही जातों, आमचें अवतारकार्य आतां संपलें. " हें भव्य तत्त्व वरील तत्त्वाप्रमाणेंच कुटुंबांतील, राज्यांतील, देशांतील अवतारी पुरुषांना लागू आहे.

८९ व्या आर्येंत वर्णिलेल्या स्थितींत श्रीकृष्ण असतां मृगशंकेनें एका व्याधानें बाण मारून त्याचा प्राण घेतला. पुढें कृष्णाज्ञेप्रमाणें अर्जुन येऊन यादवस्त्रियांना घेऊन इंद्रप्रस्थास निघाला. वाटेंत दस्यूनीं त्यांस गांठलें. अर्जुनाचें गान्डीव धनुष्यही चालेना. तो अगदीं हतबल झाला व त्यांनीं कृष्णस्त्रियांनां हरून नेलें. अशी झालेली अशरण स्थिति अर्जुनानें व्यासांनां सांगितली. तिचें वर्णन पंतांनीं फार सुरेख केलें आहे:—

असमर्थ बाहु झाला बा हा गाण्डीव चाप ओढाया ।
ज्या सिंधु सुतर, त्या दे दुस्तर होऊनि ताप ओढा या ॥७२
अक्षय सायक सरले, वृष्णिवधू म्हणति रक्ष रक्ष मला ।
बा एक आठवाया अस्त्राचें हा न अक्षर क्षमला ॥ ७३
धनु तेंच, तींच अस्त्रें, रथ हयही तेच, अन्य जन हा न, ।
तत्काल नष्ट झाले सर्वहि, अश्रोत्रियीं जसें दान ॥७४
× × ×
पाण्डव दीन, त्यजितां प्रभुच्या तेजें, विहीरहि अहीर
सागर झाले; जे रविवर्जित ते जेविं हीरहि अहीर ॥७६
( मौ. अ. २ )

७२ व्या आर्येतील पहिला चरण मुळाच्या आधारानें रचलेला आहे. दुसरा चरण स्वतंत्र आहे ७३ वी आर्या साधारणतः मूळार्थाला धरून आहे. पण ७४ वी आर्या पंतांची अगदीं स्वतंत्र आहे. ७६ व्या आर्येतील उपमा स्वतंत्र असून उत्तम आहे. प्रभूचें तेज नष्ट झालें कीं, पाण्डव दीन होतात. व त्याचा परिणाम असा होतो कीं, अहीर ( दस्यू ) विहिरीप्रमाणें अल्प असूनही सागराप्रमाणें मोठे होतात. मोठा चांगला उज्ज्वल हिरा आहे, त्याला प्रकाशावयास लावणारें रवीचें तेज नाहीं; मग त्याचा काय उपयोग ? तो हीर (हिरा) असून दगडच होय.

व्यासांनीं अर्जुनाची समजूत घातली—

अनुकूल काल होतो, तेव्हां बळ, बुद्धि, तेज, यश देतो;<br>
प्रतिकूल तोचि होउनि माघारें दत्त सर्वही घेतो ॥८४

या आर्येंत व्यासोक्तीचा सारांश सुन्दर रीतीनें आला आहे. रामपदीं पर्व अर्पण करण्याची नेहमींची वहिवाट सोडून या पर्वाच्या शेवटीं सर्वताप हरण करण्यास कृष्णघनाची प्रार्थना मयूरपंतांनीं केली आहे.

## महाप्रास्थानिक पर्व

हें पर्व फार लहान आहे. मुळांत तीन अध्याय व १०६ श्लोक आहेत. पंतांनीं त्याचे २ अध्याय व १०८ आर्या केल्या आहेत. कवीला विशेष स्फूर्तिदायक प्रकार या कथानकांत नाहीं. तथापि जेथें कल्पना लढवतां येईल, तेथें ती पंतांनीं लढविली आहे. यादवांचा क्षय झालेला ऐकून धर्माला स्वर्ग-प्रस्थानाची इच्छा झाली. ती त्यानें अर्जुनाला कळविली व तो म्हणाला,

कालः पचति भूतानि सर्वाण्येव महामते ।<br>
कालपाशमहं मन्ये त्वमपि द्रष्टुमर्हसि ॥ ३ ॥

( म. म. प्रा. अ. १ )

अर्जुन म्हणाला "कालः कालः" ( मृत्यु हा मृत्युच; तो आज नाहीं उद्यां तरी येणारच ) अशी अर्जुनाची संमति मिळतांच पाण्डवांनीं परीक्षितीला राज्यावर बसवून ते द्रौपदीला घेऊन गृहत्याग करून निघाले. सातवा त्यांचा कुत्रा बरोबर होता. एवढेंच मुळांत आहे. तेथें पंत म्हणतात—

सस्त्रीक पादचारें ते निघतां खेद वाटला विश्वा<br>
त्यांसीं लाडीगोडी तों, त्यांची धरुनि वाट,<br>
लावि श्वा ॥ १७ ॥

यांत कुत्र्याचा स्वभावोक्त विश्वासूपणा पंतांनीं यथार्थ-पणें दाखविला आहे.

पाण्डव निघाल्यावर पुढें कोण, मागें कोण हा नुसता क्रम व्यासांनीं दिला आहे. त्यांत द्रौपदीविषयीं व्यास विशेष प्रकारें म्हणतातः—

पृष्ठतस्तु वरारोहा श्यामा पद्मदलेक्षणा ।<br>
द्रौपदी योषितां श्रेष्ठा ययौ भरतसत्तम ॥ ३२ ॥

( म. म. प्रा. अ १ )

**पंत**

चाले पुढें युधिष्ठिर, त्यामागें भीमविजय, त्यां-<br>
पाठीं ।<br>
नकुळ, सहदेव, देवी कृष्णा धृतिची धरूनियां<br>
काठी ॥ २३ ॥

देवीमागुनि चाले, श्रम गमनीं जरि तथापि<br>
शुनक वनीं ।<br>
सत्संगा सोडीना, जैसा दूषणपथा पिशुन<br>
कवनीं ॥ २४ ॥

( म. प्रा. अ. १ )

पंतांचें द्रौपदीचें वर्णन अधिक मार्मिक आहे. कारण धृति हाच तिनें आरंभापासून शेवटपर्यंत दाखविलेला गुण होय, यांत संशय नाहीं. २४ व्या आर्येंत कुत्र्याची प्रशंसा पंतांनीं योग्य प्रकारें केली आहे व त्याबरोबर आपल्या काव्यदूषकांची हजेरी घेतली आहे. एकूण पंतांचे दूषक त्यांना शेवटपर्यंत पुरले म्हणावयाचे. मार्ग चालतां चालतां धर्मराज सर्वांपुढें चालणारा व श्वान सर्वांमागें चालणारा. हीं सोडून मधलीं सर्वजणें

द्रौपदीकडून उलट क्रमानें मार्गात देहविसर्जन करतीं झालीं. सदेह स्वर्गास जाण्यास तूंच योग्य आहेस, असें म्हणून इंद्र धर्माला स्वर्गाला नेऊं लागला. पण श्वानाला सोडून तो जावयास सिद्ध झाला नाहीं. धर्म म्हणाला " कृष्णेसह जिथें माझे बन्धू असतील, तेथें मला न्या. मग तेथें स्वर्ग नसला तरी चालेल.

प्रियदारबंधुरहिता मज नाक विष प्रभो ! नमो, राहो ।
विद्युद्रंजितमुदिरावांचूनि रुचे न भोग मोरा हो !॥६०

या आर्येला मूळाधार आहे. परंतु दुसरा चरण स्वतंत्र आहे. त्यांत माझ्या भ्रात्यांत चमकणारी द्रौपदी हिला मेघांत चमकणाऱ्या विजेची उपमा व त्या मेघांची अपेक्षा करणारा जो मोर त्याच्या नामसादृश्यानें आपलें स्वतःचें नांव सुचवून पंतांनीं फार बहार केली आहे.

## स्वर्गारोहण पर्व

इंद्रानें धर्मराजाला स्वर्गाला नेलें व तो तेथें जाऊन पाहतो, तों दुर्योधन श्रीजुष्ट अशा आसनावर बसलेला आहे व विभ्राजमान पुण्यकर्म देव सभोंवतीं आहेत, असें त्याला दिसलें व मोठें आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, "एवढया पाप्याला हें स्थान कसें मिळालें?"

परते युधिष्ठिर म्हणे या अपमानानळें न भाजावें, ।
भूविवरांत शिरावें, किंवा लंघुनि बळें नभा जावें ॥ ३
ज्या लोकांत खळांचा बहुमान, तयांत कोण राहील ?।
पाहेल बाळ केवळ अनुचित; अपमान दगड साहेल
( स्व. अ. १ ) ॥ ४ ॥

या आर्या पंतांच्या स्वतंत्र आहेत. पण तात्पर्य एकच आहे. नारदानें सांगितलें कीं, क्षात्रधर्माप्रमाणें लढाईत मरून दुर्योधनानें स्वर्ग मिळविलेला आहे. येथें कोणी वैराचें स्मरण करीत नाहीं. धर्म म्हणाला, माझे भ्राते असतील तेथें मला जावयाचें आहे. देवांनीं बरोबर दूत देऊन त्याला आज्ञा केली कीं, धर्माला वाटेल तेथें त्याला ने. वाटेंत त्याला नरकलोक लागला. त्यांत वसति करणाऱ्यांनीं त्याला विनंति केली कीं, तूं येथें जरा उभा रहा. तुझ्या येथें असण्यानें आम्हांला जरा बरें वाटतें. हे कोण अशी चौकशी करतां त्याला आढळलें कीं, मला पाहिजे आहेत तींच माणसें येथें आहेत. यांच्या हातून येथें येण्यासारखीं अशीं पापें केव्हां घडलीं ? बरें हीं येथें तर दुर्योधन स्वर्गात कसा ? असें म्हणून धर्मानें देवांना दोष दिला. त्याला वाटलें, आपल्याला भ्रम झाला आहे, किंवा पाहतों तें स्वप्न असावें. धर्म दूताला म्हणाला तूं ज्यांचा दूत आहेस, त्यांच्याकडे जा.

जाउनि सांग सुरांतें, येथें मी राहिलों नभा वातें ।
जेंवि, तसें भावानें सोडावें आपुल्या न भावातें
॥ २९ ॥

होतात सुखी नरकीं माझ्या पावोनि सन्निधानातें ।
मीहि निवालों, जैसा निर्धन लाधोनि सन्निधानातें
॥ ३० ॥ ( स्व. अ. १)

पहिल्या आर्येतील उपमा फार सुंदर असून स्वतंत्र आहे.

दूतानें तसा निरोप इन्द्राला कळविला. तेव्हा इंद्र धर्मराजाला भेटला व म्हणाला, हा व्याजनरक होता; खरा नव्हता. तेथें तुझे बन्धू दिसले, तेही खोटेच; मीं तुझी ही तिसरी जिज्ञासा ( परीक्षा ) केली.

१ अरणीहरणप्रसंगीं यक्षरूप घेऊन, ( २ ) महाप्रास्थानिक पर्वात श्वानाचें रूप घेऊन, (३) या व्याजनरकप्रसंगानें. तूं शुद्ध आहेस. मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें.

हीरातें जेंवि घनीं परीक्षितां; अग्निमाजि हेमातें ।
तूंतें छळीं. मिळाली अत्यन्त प्रीति हे मातें.
॥ ५२ ॥

हिऱ्याचें खरेपण घनाच्या घावानें कळतें, हेमाची शुद्धि अग्नीच्या तावानें कळते व सत्यक्षमादमादि तुझ्या अंगीं असणाऱ्या गुणांची परीक्षा छळानें कळून आली. येथें हा दीपक अलंकार चांगला

साधला आहे. ही धर्माच्या सत्वपरीक्षेची आर्या पंतांची स्वतंत्र आहे. स्वर्गारोहण करतां करतां पाण्डव एक एक ( धर्माशिवाय ) सर्व पडून गेले. पण पंतांची प्रतिभा भारताच्या शेवटल्या पर्वारोहणांतही धर्माप्रमाणें टिकली, असें ही आर्या सांगते.

नंतर धर्माकडून इन्द्रानें सुरगंगेचें स्नान करविलें, तेव्हां धर्मानें नरदेहाचा त्याग करून दिव्य देह धारण केला. तेव्हां इन्द्रानें धर्मराजाला कृष्णार्जुन, भीम इत्यादि बन्धू, द्रौपदी वगैरे सर्व स्वस्थानापन्न दाखविलीं.एवढेंच नव्हे, तर भारती युद्धांत भाग घेणारी यच्चयावत् मण्डळी जेथून आली, जी होती, तेथेंच जाऊन तीच झाली, असें दाखविलें. अशा उत्तम कथा जनमेजयाला वैशंपायनानें सांगितल्या असें सूत शौनकाला म्हणाला. जनमेजयानें सत्र पुरें केलें. आस्तिक तक्षकाचें ( भुजंगाचें ) रक्षण करून मुदित झाला असें मुळांत आहे. त्याविषयीं पंतांनीं एक उपमा योजून एक आर्या ( २७. अ. २ ) घातली आहे. ती त्यांची स्वतंत्र आहे. ती ऐकूनही न ऐकिली किंवा समजूनही न समजली असें कोणत्याही सभ्य स्त्रीनें अथवा पुरुषानें स्त्री-पुरुषांच्या मिश्रसमाजांत तरी दाखविलें पाहिजे, असा तिचा अर्थ आहे. असला प्रकार अन्यत्र कोठें आर्याभारतांत एकाद-दुसऱ्या उपेक्षणीय अपवादाशिवाय नसतां शेवटीं शेवटीं पंतांच्या हातून कसा झाला याचें आश्चर्य वाटतें. मग तक्षशिलेहून जनमेजय हस्तिनापुरास गेला. असो. महाभारताचा आरंभ जसा व्यासांनीं भव्य प्रकारानें केला आहे, तशाच भव्य प्रकारानें त्याची समाप्ति एक चतुःश्लोकी घालून केली आहे.

मातापितृसहस्राणि पुत्रदारशतानि च ।
संसारेष्वनुभूतानि यान्ति यास्यन्ति चापरे ॥ ६० ॥

हर्षस्थानसहस्राणि भयस्थान शतानिच ।
दिवसेदिवसे मूढमाविशन्ति न पण्डितम् ॥ ६१ ॥

ऊर्ध्वबाहुर्विरोम्येष न च कश्चित् शृणोति मे ।
धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थंन सेव्यते ॥ ६२ ॥

न जातु कामान्न भयान्न लोभात् ।
धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः ॥

नित्यो धर्मः सुखदुखे त्वनित्ये ।
जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥ ६३ ॥

( म. स्व. अ. ५ )

भावार्थः—या संसारांत मनुष्याला होऊन जाणाऱ्या माता, स्त्री, पुत्र इत्यादींपासून हर्ष होण्याचे, शोक अथवा दुःख प्राप्त होण्याचे, प्रसंग प्राप्त होतात. परंतु त्यांचा मूढावरच परिणाम होतो.

ज्ञाता पुरुष या भावनांपासून अलिप्तच राहतो व आपला कर्मयोग चालता ठेवतो. याकरितां मीं हात वर करून असा सारखा आक्रोश चालविला आहे “ बाबा ! धर्मापासून अर्थ व काम या दोन्ही पुरुषार्थाचा लाभ होतो. म्हणून त्याचें सेवन कां करीत नाहींस ? लोभास्तव, भयास्तव धर्माचा त्याग करूं नये; धर्म नित्य आहे. सुख, दुःख ज्यामध्यें मनुष्याला प्राप्त होतात, तो संसार अनित्य आहे; आत्मा नित्य आहे व देह अनित्य आहे.” या ठिकाणीं धर्म म्हणजे कर्म योग समजावा. या चतुःश्लोकीवरून असें वाटतें कीं, महाभारताचे कर्ते मोठे धर्मसंस्थापक असावेत व भारतांत सर्व प्रकारचे धर्म प्रसंगानुरूप कथन केलेले आहेत यावरून हें खरें दिसतें. तथापि कर्णपर्वासारखीं ओजस्वी पर्वें वाचलीं म्हणजे असें वाटतें कीं, महाभारताचा कर्ता मोठा वीर पुरुष असावा. ही कल्पना खरी धरली म्हणजे “ जय ” नामक जो मूळ महाभारत ग्रंथ समजला जातो तो वीरानें रचला असावा व मागून त्याचा विस्तार धर्मसंस्थापक कर्त्यांनीं रचला असावा. कसेंही असो, ही समाप्ति भव्य आहे. उज्ज्वल आहे; पण पंतांनीं ही उज्ज्वल व भव्य समाप्ति वगळली आहे. त्यांनीं आपल्या साहाय्यकारी मण्डळीचें आभार

प्रदर्शन करून मोठ्या विनयानें आपल्या काव्यांतील दोष मनांत घेऊं नको अशी वाचकांनां विनंति केली आहे.

श्रीगुरुपदपद्मार्पित हा ग्रंथ महाप्रसाद जाणावा।
सज्जन हो ! मज्जन हो ! यांत, मना दोष त्यांत नाणावा ॥ ५१ ॥

शेवटीं नित्याप्रमाणें आपली कृति रामपदीं पंतांनीं अर्पण केली आहे व अशी आशा प्रदर्शित केली आहे कीं,

ज्यांच्या वचनीं, चित्तीं, कर्मीं सर्वत्र भाव कुशल वसे।
या कृतिस तेंचि गातिल सुकृती वाल्मीकिकृतिस कुशलवसे ॥ ५७ ॥

अस्तु.-पंतांच्या हातून एक प्रचण्ड कामगिरी आर्याभारताची पार पडली. श्रीपाण्डवसहाय भगवान् अरविन्दाक्षाची कृपा झाली. पंतांनांही धन्यता वाटली व त्यांची कृति किती सरस वठली हें त्यांचें त्यांनींच मत देऊन ठेवलें आहे तें येथें देणें अगदीं उचित आहे. पंत आपल्या उपसंहारांत म्हणतात--

धन्य श्रीराम पिता, धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली।
आली सत्यवतीची, कीं भारतकीर्ति सुतमुखीं आली ४२ ॥ (स्व. अ. २)

या आर्येंत पंतांनीं आपल्या मातेला व्यासांच्या मातेची (सत्यवतीची) आली (सखी) म्हटलें आहे. कारण सत्यवतीसुतानें (व्यासानें) जी भारत-कीर्ति गाइली, ती लक्ष्मीसुताच्या मुखीं (पंतांच्या मुखीं) आली. ही गर्वोक्ति नाहीं. मोरोपंत कवि होते एवढेंच नव्हे, तर कवींचे नायक होते. प्रसिद्ध कवि विठोबाअण्णा दफ्तरदार पंतांची तारीफ करून प्रश्न करतात,

आर्याच्छंदें जोडुनि रामायण भारतादि आयकवि।
नायक वीर कवींचा ऐसा होईल अन्य काय कवि ?॥

या प्रश्नाचें उत्तर 'नाही' असें आहे. या विवेचनांत महाभारतांतील व आर्याभारतांतील सर्वच उत्कृष्ट स्थलें आलीं असें नाहीं. जीं आलीं. तीं नमन्यादाखलच दिलेलीं आहेत, असें
आर्याभारत यांचा परि

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥